शिवधर्मान्वयस्यास्य शिवज्ञानसमन्वयः ॥ ७२ ॥ ज्ञानान्वयवशात्पुंसः संसारे दोषदर्शनम् ॥ ततो विषयवैराग्यं वैराग्याद्भावसाधनम् ॥ ७३ ॥ भावसिद्ध्युपपन्नस्य ध्याने निष्ठा न कर्मणि ॥ ज्ञानध्यानाभियुक्तस्य पुंसो योगः प्रवर्तते ॥ ७४ ॥ योगेन तु परा भक्तिः प्रसादस्तदनन्तरम् ॥ प्रसादान्मुच्यते जन्तुर्मुक्तः शिवसमो भवेत् ॥ ७५ ॥ अनुग्रहप्रकारस्य क्रमोऽयमाविवक्षितः ॥ यादृशी योग्यता पुंसस्तस्य तादृगनुग्रहः ॥ ७६ ॥ गर्भस्थो मुच्यते कश्चिज्जायमानस्तथापरः ॥ बालो वा तरुणो वाथ वृद्धो वा मुच्यते परः ॥ ७७ ॥ तिर्यग्योनिगतः कश्चिन्मुच्यते नारकोऽपरः ॥ अपरस्तु पदं प्राप्तो

---

असणारा वंश मुख्य व शंभरपटीनें जास्त गुणकारक आहे. ह्या शिवधर्म वंशाला शिवज्ञानाची प्राप्ति होते. (७३) ज्ञानान्वय प्राप्त झाल्यामुळें पुरुषाला संसारांतील दोष समजून येतात. ते दोष समजून आले ह्मणजे प्राण्याला विषयसुखाविषयीं वैराग्य होतें. वैराग्य झाल्यामुळें भावसिद्धि होते. (७४) भावसिद्धि झालेल्या पुरुषाकडून ध्यान आणि निष्ठापूर्वक कोणतेंही कर्म होतें. ज्ञान असून ध्यान करणाऱ्या पुरुषाला योगसाधन करण्याची शक्ति येते. (७५) योगसाधनामुळें शिवाविषयीं उत्तम प्रकारची भक्ति होते, त्या भक्तीनंतर मग पुढें प्रसाद प्राप्त होतो. प्रसादामुळें प्राणी संसारांतून मुक्त होऊन शिवासारखा होतो. (७६) अनुग्रहाच्या प्रकाराचा हा क्रम ठरलेला आहे. पुरुषाच्या आंगीं जशी योग्यता असेल त्या मानानें त्यावर अनुग्रह होतो. (७७) कोणी जीव गर्भांत असतांनाच मुक्त होतो, दुसरा कोणी जन्मल्याबरोबर मुक्त होतो. लहानपणांत किंवा तरुणपणांत किंवा ह्मातारपणांत कोणी मुक्त होतो. (७८) कोणी पशुपक्ष्यांच्या जन्माला जाऊन मुक्त होतो, कोणी दुसरा तर नरकांत जाऊन मुक्त होतो. कोणी कोणी तर आपलें पद आपणास मिळालें

मुच्यते स्वपदक्षयात् ॥ ७८ ॥ कश्चित्क्षीणपदो भूत्वा पुनरावर्त्त्य मुच्यते ॥ कश्चिदूर्द्धगतस्तस्मिन्स्थित्वा स्थित्वा विमुच्यते ॥ ७९ ॥ तस्मान्नैकप्रकारेण नराणां मुक्तिरिष्यते ॥ ज्ञानभावानुरूपेण प्रसादेनैव निर्वृतिः ॥ ८० ॥ तस्मादस्य प्रसादार्थं वाङ्मनोदोषवर्जितः ॥ ध्यायन्तःशिवमेवैकं सदारतनयाश्रयः ॥ ८१ ॥ तन्निष्ठास्तत्पराः सर्वे तद्युक्तास्तदुपाश्रयाः ॥ सर्वक्रियाः प्रकुर्वाणास्तमेव मनसा गताः ॥ दीर्घसत्रं समासध्वं दिव्यं वर्षसहस्रकम् ॥ ८२ ॥ सत्रान्ते मन्त्रयोगेन वायुस्तत्रागमिष्यति ॥ स एव भवतां श्रेयः सोऽपायं कथयिष्यति ॥ ८३ ॥ ततो वाराणसी पुण्या पुरी परमशोभना ॥ गन्तव्या यत्र विश्वे-

---

आणि तें नाहींसें झालें म्हणजे तत्काळ मुक्त होतो. (७९) कोणी एखादा मनुष्य त्याचें स्थान क्षीण झालें तर पुन्हां जन्मास येऊन मुक्त होतो. कोणी तर वर जाऊन तेथल्या तेथेच राहून मुक्त होतो. (८०) ह्यामुळें मनुष्यांचे मुक्त होण्याचे प्रकार अनेक आहेत असें म्हणतात. ज्ञानानें भाव उत्पन्न होतो, भावानें प्रसादाची प्राप्ति होते आणि प्रसादानेंच मुक्ति होते. (८१) ह्यासाठीं त्या शंकराच्या कृपेकरितां तुम्ही सर्वजण मनवचन शुद्ध करून आपल्या बायकामुलांसहित अग्निहोत्र घेऊन त्या शंकराचेंच ध्यान करा. (८२) त्या शंकरावरच विश्वास ठेवा. त्याच्या सेवेंत तत्पर रहा, सर्वजण त्याचाच आश्रय करून त्याच्याच आश्रयास रहा. त्याचेंच मनांत चिंतन करून सर्व प्रकारच्या क्रिया करा आणि त्या क्रिया त्या परमेश्वरालाच समर्पण करा. तुम्ही हजार देवाचीं वर्षें होईपर्यंत उत्तम प्रकारचें सत्र (यज्ञ) आरंभ करा. (८३) तें सत्र संपूर्ण झाल्यावर मंत्राच्या सामर्थ्यानें वायु तेथें येईल आणि तो वायूदेवच तुम्हाला तुमच्या हिताचा मार्ग दाखवील. (८४) तुम्ही सर्वजण आतां काशी नांवाचें अत्यंत पवित्र आणि सुशोभित क्षेत्र

महीभृत्पादजाभ्यः शिलाभ्यः प्रसरदमृतकल्पस्वच्छपानीयरम्यम् ॥ अतिरसफलवृक्षप्रायमव्यालसत्वं तपस उचितमासीन्नैमिशं तन्मुनीनाम् ॥ ९७ ॥ इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

---

लहान पर्वतांच्या टेकडीवर स्फटिकमण्याच्या मोठमोठ्या शिला आहेत. त्यावरून अमृतापेक्षां गोड आणि स्वच्छ पाणी वाहतें त्यामुळें फार मौज दिसते तेथें अतिशय गोडरस असणारीं फळांचीं झाडें पुष्कळ आहेत. तेथें सर्प वगैरे विषारी प्राणि मुळींच नाहींत. सारांश तें नैमिशारण्य मुनीश्वरांला तपश्चर्या करण्याला अगदीं योग्य असें स्थळ होतें.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणाच्या वायवीयसंहितेंतील पूर्वभागापैकीं दुसरा अध्याय संपला.



## ॥ अथ तृतीयोऽध्यायः ॥

---

सूत उवाच ॥ तस्मिन्देशे महाभागा मुनयः संशितव्रताः ॥ अर्चयन्तो महादेवं सत्रमारेभिरे तदा ॥ १ ॥ तच्च सत्रं प्रववृते सर्वाश्चर्य्यं महर्षिणाम् ॥ विश्वं सिसृक्षमाणानां पुरा विश्वसृजामिव ॥ २ ॥ अथ काले गते सत्रे समाप्ते भूरिदक्षिणे ॥ पितामहनियोगेन वायुस्तत्रागमत्स्वयम् ॥ ३ ॥ शिष्यः स्वयंभुवो देवः सर्वप्रत्यक्षदृग्वशी ॥ आज्ञायां मरुतो यस्य संस्थिताः सप्तसप्तकाः ॥ ४ ॥ प्रेरयञ्छश्वदङ्गानि प्राणाद्याभिः स्ववृत्तिभिः ॥ सर्वभूतशरीराणां कुरुते यश्च धारणम् ॥ ५ ॥ अणिमादिभिरष्टाभिरैश्व-

---

सूत ह्मणतातः— ॥ १ ॥ त्या नैमिशारण्यांत त्या दैवशाळी आणि सदाचारी ऋषीश्वरांनीं त्यावेळीं महादेवाचें पूजन करीत सत्र ( यज्ञ ) आरंभिलें. ( २ ) पूर्वी विश्व उत्पन्न करण्यासाठीं सर्व ब्रह्मदेवांनीं मिळून जसें सत्र आरंभिलें होतें तसेंच सत्र ह्यावेळीं ऋषीश्वरांनींही आरंभिलें. तें महर्षींचें सत्र पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. ( ३ ) त्या सत्रामध्यें दक्षिणाही पुष्कळ वांटली. तें सत्र मग कांहीं काळानें समाप्त झाल्यावर ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें वायु तेथें स्वतः आला. ( ४ ) तो वायु प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा शिष्यच होय, त्याला सर्व प्रत्यक्ष समजत असून तो मोठा इंद्रियनिग्रही होता, त्याच्या आज्ञेंत एकोनपन्नास मरुद्देव राहतात. ( ५ ) तो वायु आपल्या अंशापैकीं प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान नांवाचे पांच वायु उत्पन्न करून सर्व प्राणिमात्रांचीं शरीरें चालवितो. ( ६ ) त्याला अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, ईशित्व वशित्व, प्राकाम्य आणि प्राप्ति ह्या अष्टमहासिद्धि अनुकूल आहेत. तोच वायु वांकडे

यैश्च समन्वितः ॥ तिर्यक्करादिभिर्मेघैर्भुवनानि बिभर्ति यः ॥ ६ ॥ आकाशयोनिर्द्विगुणः स्पर्शशब्दसमन्वयात् ॥ तेजसां प्रकृतिश्चेति यमाहुस्तत्वचिन्तकाः ॥ ७ ॥ तमाश्रमगतं दृष्ट्वा मुनयो दीर्घसत्रिणः ॥ पितामहवचः स्मृत्वा प्रहर्षमतुलं ययुः ॥८॥ अभ्युत्थाय ततः सर्वे प्रणम्याम्बरसम्भवम् ॥ चामीकरमयं तस्मै विष्टरं समकल्पयन् ।९। सोऽपि तत्र समासीनो मुनिभिः सम्यगर्चितः ॥ प्रतिनंद्य च तान्सर्वान्पप्रच्छ कुशलं ततः ॥ १० ॥

वायुरुवाच ॥ अत्र वः कुशलं विप्राः कच्चिद्वृत्ते महाक्रतौ ॥ कच्चिद्यज्ञहनो दैत्या न बाधेरन्सुरद्विषः ॥ ११ ॥ प्रा-

---

किरण असणाऱ्या [ तिर्यकर वगैरे ] मेघांकडून सर्व जगाचें रक्षण करितो. ( ७ ) तो आकाशांत उत्पन्न होतो ह्मणून त्याच्या आंगीं स्पर्श आणि शब्द असे दोन गुण आहेत. तो तेजांचीं [ अग्नींचीं ] प्रकृति [ साह्यकर्ता ] आहे असें तत्वज्ञानी लोक ह्मणतात. ( ८ ) तो वायु नैमिषारण्यांतील आपल्या आश्रमांत आलेला पाहतांच त्या फार दिवस सत्र चालविणाऱ्या मुनींस ब्रह्मदेवानें सत्र संपल्यावर वायु तुमचेकडे येईल असें सांगितलें होतें त्या गोष्टीची आठवण होऊन सर्वांस मोठा आनंद झाला. ( ९ ) तो आकाशांत उत्पन्न होणारा वायु तेथें येतांच ते सर्वजण उठून उभे राहिले, आणि सर्वांनीं वायूस सन्मानानें नमस्कार करून त्यास बसण्यासाठीं एक उत्तम सोन्याचें आसन त्यापुढें केलें. ( १० ) तो वायु त्या आसनावर बसल्यावर ऋषींनीं त्याची यथाविधीनें पूजा केली त्यामुळें वायूस मोठा संतोष होऊन त्यानें सर्वांस कुशल प्रश्न विचारिले. ( ११ ) वायु ह्मणाला ऋषीश्वरहो. तुह्मी सर्वांनीं आजपर्यंत हा महायज्ञ चालविला तो निर्विघ्नपणानें पार पडला ना? यज्ञाचा व देवाचा द्वेष करणाऱ्या दैत्यांनीं ह्यां यज्ञाच्या कामांत अडथळे आणले नाहींत ना? ( १२ ) यज्ञाचे कामांत कांहीं चुका होऊन प्राय-

यश्चित्तं दुरिष्टं वा न कच्चित्समजायत ॥ स्तोत्रशस्त्रगृहैर्देवान्पि-
तॄन्पित्र्यैश्च कर्मभिः ॥ १२ ॥ कच्चिदभ्यर्च्य युष्माभिर्विधिरासी-
त्स्वनुष्ठितः ॥ निवृत्ते च महासत्रे पश्चात्किं वाश्चिकीर्षितम् ॥१३॥

सूत उवाच ॥ इत्युक्ता मुनयः सर्वे वायुना शिवभा-
विना ॥ प्रत्दृष्टमनसः पूताः प्रत्यूचुर्विनयान्विताः ॥१४॥

मुनय ऊचुः ॥ अद्य नः कुशलं सर्वमद्य साधु भवेत्तपः ॥
अस्मच्छ्रेयोविवृद्ध्यर्थं भवानत्रागतो यतः ॥ १५ ॥ शृणु चेदं
पुरा वृत्तं तमसाक्रान्तमानसैः ॥ उपासितः पुरास्माभिर्वि-

---

श्चित्तें वगैरे ध्यावीं लागून नसतीं संकटें तुह्मांवर आलीं नाहींत ना? स्तुति आणि शस्त्रग्रहणाच्या कर्मांनीं तुह्मीं देवांस संतुष्ट केलें ना? तसेच पितृसंबंधी करावयाचीं कृत्यें करून तुह्मीं पितृंस संतुष्ट केलें ना? (१३) देवांचीं आणि पितृंचीं कृत्यें यथाविधीनें तुह्मीं करून यज्ञ निर्विघ्नपणानें पार पाडला ना? हा महायज्ञ समाप्त झाल्यावर तुह्मांस कोणतें कार्य करून घ्यावयाची इच्छा आहे तें मला सांगा.

सूत ह्मणतातः— ॥ १४ ॥ शिवाची भक्ति करणाऱ्या वायूनें त्या मुनीश्वरांस असें ह्मटल्यावर त्यांस मोठा संतोष वाटला नंतर ते निष्पाप स्वभावाचे ऋषीश्वर नम्रतेनें पुन्हां वायूस ह्मणूं लागले.

मुनि ह्मणालेः— ॥ १५ ॥ आतां आमचें सर्व प्रकारें कल्याण झालें. आतां आमच्या तपश्चर्येचें खरोखर सार्थक झालें. कां तर, आमचें सर्वांचें कल्याण करावयासाठीं तूं स्वतः येथें आलास. (१६) असो. आतां आमची पूर्वींची हकीकत ऐक. आमचें मन अज्ञानानें पूर्णपणें व्यापलें, आह्मांस कांहींच समजेना, तेव्हां आमचें अज्ञान दूर होऊन संशयाचें निरसन होऊन आह्मांस यथार्थ ज्ञान व्हावें ह्मणून आह्मीं सर्वांनीं ब्रह्मदेवाची

ज्ञानार्थं प्रजापतिः ॥ १६ ॥ सोऽप्यस्माननुगृह्याह शरण्यः शरणागतान् ॥ सर्वस्मादाधिको विप्रा रुद्रः परमकारणम् ॥ १७ ॥ तमप्रतर्क्यं याथार्थ्यं भक्तिमानेव पश्यति ॥ भक्तिश्चास्य प्रसादेन प्रसादादेव निर्वृतिः ॥ १८ ॥ तस्मादस्य प्रसादार्थं नैमिषे मंत्रयोगतः ॥ यजध्वं दीर्घसत्रेण रुद्रं परमकारणम् ॥ १९ ॥ तत्प्रसादेन सत्रान्ते वायुस्तत्रागमिष्यति ॥ तन्मुखाज्ज्ञानलाभो वस्तत्र श्रेयो भविष्यति ॥ २० ॥ इत्यादिश्य वयं सर्वे प्रेषिताः परमेष्ठिना ॥ अस्मिन्देशे महाभाग त्वदागमनकाङ्क्षिणः ॥ २१ ॥ दीर्घसत्रं समासीनां दिव्यवर्षसहस्र-

---

आराधना केली. (१७) त्यामुळें शरणागतांचें रक्षण करणारा तो ब्रह्मदेव शरण गेलेल्या आह्मांवर प्रसन्न होऊन आह्मांस ह्मणाला, ब्राह्मणहो, ह्या जगांत श्रीशंकर सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे. तो सर्व गोष्टीला मूल कारण आहे. (१८) त्याची यथार्थ माहिती कोणासच लागत नाहीं, त्याची भक्ति करणाऱ्या भक्ताला मात्र त्याचें दर्शन होतें. त्याचा प्रसाद झाला तरच आपल्या हातून त्याची [ शिवाची ] भक्ति घडते, व त्याच्या प्रसादानेंच मनुष्य मुक्त होतो. (१९) ह्यासाठीं त्या शंकराच्या प्रसादासाठीं नैमिषारण्यांत मंत्रांच्या योगानें अनेक काळपर्यंत सत्र आरंभ करून सर्व जगास मूळकारण असणाऱ्या श्रीशिवाचें आराधन करा. (२०) ह्मणजे मग त्या शंकराच्या प्रसादानेंच त्या ठिकाणीं वायु येईल, त्याचे तोंडानें तुह्मांस ज्ञानाचा लाभ होईल. [ तो तुह्मांस ज्ञान शिकवील ] व त्यामुळें तुमचें कल्याण होईल. (२१) असें आह्मांस सांगून त्या ब्रह्मदेवानेंच आह्मां सर्वांस ह्या नैमिषारण्यांत पाठविलें. हे दैववाना, तेव्हांपासून आह्मी येथें येऊन तुझी इतके दिवस वाट पहात आहोंत. (२२) आणि तेव्हांपासून आतांपर्यंत देवांचीं एक हजार वर्षें लोटलीं इतके दिवस आह्मीं हें दीर्घसत्र चालविलें आहे. ह्यास्तव तुझ्या येथें

कम् ॥ अतस्तवागमादन्यत्प्रार्थ्यं नो नास्ति किञ्चन ॥ २२ ॥
इत्याकर्ण्य पुरावृत्तमृषीणां दीर्घसत्रिणाम् ॥ वायुः प्रीतमना
भूत्वा तत्रास्ते मुनिसंवृतः ॥ २३ ॥ ततस्तैर्मुनिभिःपृष्टस्तेषां
भावविवृद्धये ॥ सर्गादिशार्वमैश्वर्यं समासादवदाद्विभुः ॥ २४ ॥

इति श्रीशैवे महापुराणें वायवीयसंहितायां पूर्वभागे तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

---

येण्याखेरीज आमची दुसरी कांहींएक इच्छा नव्हती ती तूं येथें आल्यानें आमची सर्व इच्छा पूर्ण झाली. (२३) अशी त्यां अनेक कालपर्यंत दीर्घसत्र चालविणाऱ्या ऋषींची पूर्वीची हकीकत ऐकून वायूस मोठा आनंद झाला. मग, आपल्या सभोंवतीं जे जे ऋषीश्वर बसलेले होते. (२४) त्या मुनींनीं जे जे प्रश्न विचारले त्यांचीं त्यांचीं उत्तरें देऊन त्यांचीं शिवधर्मावर जास्त श्रद्धा बसण्यासाठीं त्या वायूनें त्यांस शिवाची सृष्टि वगैरे वर्णन आणि शिवाचें ऐश्वर्य संक्षिप्त रीतीनें सांगण्यास आरंभ केला.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवीय संहितेच्या पूर्वभागापैकीं तिसरा अध्याय संपला.






## ॥ अथ चतुर्थोऽध्यायः ॥

सूत उवाच ॥ तत्र पूर्वं महाभागा नैमिषारण्यवासिनः ॥ प्रणिपत्य यथान्यायं प्रपच्छुः पवनं प्रभुम् ॥ १ ॥

नैमिषीया ऊचुः ॥ भवान्कथमनुप्राप्तो ज्ञानमीश्वरगोचरम् ॥ कथं च शिष्यभावस्ते ब्रह्मणोऽव्यक्तजन्मनः ॥ २ ॥

वायुरुवाच ॥ एकोनविंशतिः कल्पो विज्ञेयः श्वेतलोहितः ॥ तस्मिन्कल्पे चतुर्वक्त्रः स्रष्टुकामोऽतपत्तपः ॥ ३ ॥ तपसा तेन तीव्रेण तुष्टस्तस्य पिता स्वयम् ॥ दिव्यं कौमारमास्थाय रूपं रूपवतां वरः ॥ ४ ॥ श्वेतो नाम मुनिर्भूत्वा दिव्यां वाचमुदीरयन् ॥ दर्शनं प्रददौ तस्मै देवदेवो महेश्वरः ॥ ५ ॥ तं दृष्ट्वा पितरं ब्रह्मा ब्रह्मणोऽधिपतिं पतिम् ॥

---

॥ १ ॥ सूत म्हणतातः— त्यावेळीं तेथें अगोदर ते दैवशाली नैमिषारण्यांत राहणारे ऋषीश्वर सन्मानपूर्वक वायूस नमस्कार करून विचारूं लागले.

॥ २ ॥ नैमिषारण्यांत राहणारे ऋषी म्हणाले वायुदेवा, तुला शिवाचें यथार्थ ज्ञान कशानें झालें? तसाच ज्याचा जन्म कोठें आणि कधीं झाला हें समजत नाहीं त्या ब्रह्मदेवाचा शिष्यपणा तूं कधीं पतकरिलास?

॥ ३ ॥ वायु म्हणाला ऋषिश्रेष्ठहो, एकोणिसावा कल्प श्वेतलोहित नांवाचा होता त्या कल्पांत चार मुखें असणाऱ्या ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करण्याच्या इच्छेनें तप केलें. ( ४ ) त्या त्याच्या उग्र तपश्चर्येमुळें त्या ब्रह्मदेवाचा पिता [ शिव ] स्वतः संतुष्ट झाला व त्या सौंदर्यवान् परमेश्वरानें उत्तम प्रकारचें लहान मुलाचें रूप घेतलें ( ५ ) व श्वेत नांवाचा मुनि होऊन त्या देवाधिदेव श्रीशंकरानें ब्रह्मदेवास दर्शन दिलें. ( ६ ) ब्रह्मदेवानें हा प्रत्यक्ष आपला पिता असून सर्व त्रैलोक्याचा पिता

## ॥ अथ चतुर्थोऽध्यायः ॥

सूत उवाच ॥ तत्र पूर्वं महाभागा नैमिषारण्यवासिनः ॥ प्रणिपत्य यथान्यायं प्रपच्छुः पवनं प्रभुम् ॥ १ ॥

नैमिषीया ऊचुः ॥ भवान्कथमनुप्राप्तो ज्ञानमीश्वरगोचरम् ॥ कथं च शिष्यभावस्ते ब्रह्मणोऽव्यक्तजन्मनः ॥ २ ॥

वायुरुवाच ॥ एकोनविंशतिः कल्पो विज्ञेयः श्वेतलोहितः ॥ तस्मिन्कल्पे चतुर्वक्त्रः स्रष्टुकामोऽतपत्तपः ॥ ३ ॥ तपसा तेन तीव्रेण तुष्टस्तस्य पिता स्वयम् ॥ दिव्यं कौमारमास्थाय रूपं रूपवतां वरः ॥ ४ ॥ श्वेतो नाम मुनिर्भूत्वा दिव्यां वाचमुदीरयन् ॥ दर्शनं प्रददौ तस्मै देवदेवो महेश्वरः ॥ ५ ॥ तं दृष्ट्वा पितरं ब्रह्मा ब्रह्मणोऽधिपतिं पतिम् ॥

---

॥ १ ॥ सूत ह्मणतातः— त्यावेळीं तेथें अगोदर ते दैवशाली नैमिषारण्यांत राहणारे ऋषीश्वर सन्मानपूर्वक वायूस नमस्कार करून विचारूं लागले.

॥ २ ॥ नैमिषारण्यांत राहणारे ऋषी ह्मणाले वायुदेवा, तुला शिवाचें यथार्थ ज्ञान कशानें झालें ? तसाच ज्याचा जन्म कोठें आणि कधीं झाला हें समजत नाहीं त्या ब्रह्मदेवाचा शिष्यपणा तूं कधीं पतकरिलास ?

॥ ३ ॥ वायु ह्मणाला ऋषिश्रेष्ठहो, एकोणिसावा कल्प श्वेतलोहित नांवाचा होता त्या कल्पांत चार मुखें असणाऱ्या ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करण्याच्या इच्छेनें तप केलें. (४) त्या त्याच्या उग्र तपश्चर्येमुळें त्या ब्रह्मदेवाचा पिता [ शिव ] स्वतः संतुष्ट झाला व त्या सौंदर्यवान् परमेश्वरानें उत्तम प्रकारचें लहान मुलाचें रूप घेतलें (५) व श्वेत नांवाचा मुनि होऊन त्या देवाधिदेव श्रीशंकरानें ब्रह्मदेवास दर्शन दिलें. (६) ब्रह्मदेवानें हा प्रत्यक्ष आपला पिता असून सर्व त्रैलोक्याचा पिता

प्रणम्य परमं ज्ञानं गायत्र्या सह लब्धवान् ॥ ६ ॥ ततः स लब्धविज्ञानो विश्वकर्मा चतुर्मुखः ॥ असृजत्सर्वभूतानि स्थावराणि चराणि च ॥ ७ ॥ यच्छ्रुत्वा ह्यमृतं लब्धं ब्रह्मणा परमेश्वरात् ॥ ततस्तद्वदनादेव मया लब्धं तपोबलात् ॥ ८ ॥

मुनय ऊचुः ॥ किं तज्ज्ञानं त्वया लब्धं तथ्यात्तथ्यतरं शुभम् ॥ यत्र कृत्वा परां निष्ठां पः सुखमृच्छति ॥९॥

वायुरुवाच ॥ पशुपाशपतिज्ञानं यल्लब्धं तु मया पुरा ॥ तत्र निष्ठा परा कार्या पुरुषेण सुखार्थिना ॥ १० ॥ अज्ञानप्रभवं दुःखं ज्ञानेनैव निवर्तते ॥ ज्ञानं वस्तुपरिच्छेदो

---

आहे असें तत्काळ ओळखिलें आणि त्यास सन्मानानें नमस्कार करून त्यापासून गायत्रीमंत्रासह हें सृष्टि उत्पन्न करण्याचें ज्ञान संपादन केलें. (७) सृष्टि उत्पन्न करण्याचें ज्ञान आंगीं येतांच त्या चार मुखें असणाऱ्या व सर्व विश्वाची घडामोड करणाऱ्या ब्रह्मदेवानें हे सर्व स्थावर जंगम प्राणी उत्पन्न केलें. (८) ब्रह्मदेवानें जें ज्ञान त्या परमेश्वरापासून शिकून मोक्ष मिळविला, त्यानंतर त्याचे तोंडूनच तें शिवसृष्टीचें ज्ञान तपश्चर्येच्या सामर्थ्यानें मीं संपादन केलें.

॥ ९ ॥ मुनि ह्मणाले वायो, कल्याण करणारें आणि सत्यापेक्षां सत्य असें तें ज्ञान तरी कोणतें आहे कीं, जें ज्ञान संपादन करून त्यावर दृढ विश्वास ठेविला ह्मणजे पुरुष सुख पावतो.

॥ १० ॥ वायु ह्मणालाः— मुनीश्वरहो, पूर्वीं मीं जें ज्ञान शिकलों त्याचें नांव पशु, पाश आणि पति ह्यांचें यथार्थ ज्ञान हेंच होय. ज्या पुरुषाला आपणास सुख मिळावें अशी इच्छा असेल त्यानें ह्या ज्ञानावर दृढ विश्वास ठेवावा. (११) अज्ञानपणापासून भोगावें लागणारें दुःख ज्ञानानें नाहींसें होतें. ज्ञान ह्मणजे वस्तूचा निरनिराळेपणा ती वस्तु तीन प्रकारची मा-

वस्तु च त्रिविधं स्मृतम् ॥ ११ ॥ अजडं च जडश्चैव नियन्तृ च तयोरपि ॥ पशुः पाशः पतिश्चेति कथ्यते तत्रयं क्रमात् ॥ १२ ॥ अक्षरं च क्षरश्चैव क्षराक्षरपरं तथा ॥ तदेतत्रितयं भूयः कथ्यते तत्ववेदिभिः ॥ १३ ॥ अक्षरं पशुरित्युक्तः क्षरं पाश उदाहृतः ॥ क्षराक्षरपरं यत्तत्पतिरित्यभिधीयते ॥ १४ ॥

मुनय ऊचुः ॥ किं तदक्षरमित्युक्तं किं च क्षरमुदाहृतम् ॥ तयोश्च परमं किं वा तदेतद्ब्रूहि मारुत ॥ १५ ॥

वायुरुवाच ॥ प्रकृतिः क्षरमित्युक्तं पुरुषोऽक्षर उच्यते ॥ ताविमौ प्रेरयत्यन्यः स परः परमेश्वरः ॥ १६ ॥

---

नली आहे ती अशी (१२) अजड, जड आणि नियंतृ त्यालाच क्रमानें पशु, पाश आणि पति अशीं नांवें आहेत त्या अजडाचा आणि जडाचा नियंतृ हा पति आहे. (१३) ह्या तीन वस्तूला पुन्हां तत्ववेत्ते लोक अक्षर [नाशरहित], क्षर [नाशिवंत] आणि क्षराक्षरापर (नाशरहित आणि नाशिवंत ह्या दोन्ही स्थिति नसणारा) अशीं निराळीं तीन नांवें देतात. (१४) अक्षराला पशु ह्मणतात, क्षराला पाश ह्मणतात, आणि क्षराक्ष राहून पर त्यास पति असें ह्मणतात.

॥ १५ ॥ **मुनि ह्मणाले:—** वायो, अक्षर कशा ह्मणतात ? क्षर कशाला ह्मणतात आणि त्या क्षराक्षरापेक्षां श्रेष्ठ [पलीकडे] तें आणखी काय आहे तें आह्मांस नीट समजाऊन सांग.

॥ १६ ॥ **वायु ह्मणाला:—** प्रकृतीला [सत्वरजस्तमोमय मायेला] क्षर ह्मणतात, पुरुषाला अक्षर असें ह्मणतात आणि त्या दोघां प्रकृति पुरुषाला प्रेरणा करणारा जो कोणी एक दुसरा आहे तोच श्रेष्ठ परमेश्वर होय.

मुनय ऊचुः ॥ कैषा प्रकृतिरित्युक्ता क एष पुरुषो मतः ॥ अनयोः केन सम्बन्धः कोऽयं प्रेरक ईश्वरः ॥ १७ ॥

वायुरुवाच ॥ माया प्रकृतिरुद्दिष्टा पुरुषो मायया वृतः ॥ सम्बन्धो मलकर्मभ्यां शिवः प्रेरक ईश्वरः ॥ १८ ॥

मुनय ऊचुः ॥ केयं माया समाख्याता किं रूपो मायया कृतः ॥ मूलं कीदृक्कुतो वास्य किं शिवत्वं कुतः शिवः ॥ १९ ॥

वायुरुवाच ॥ माया माहेश्वरी शक्तिश्चिद्रूपो मायया

---

(१७) मुनि ह्मणाले:— प्रकृति जिला ह्मणतात ती कोण आहे? ज्याला पुरुष ह्मणतात तो कोण आहे? ह्या दोघांचा संबंध कोणाबरोबर होतो? आणि हा प्रेरणा करणारा ईश्वर तरी कोण आहे?

वायु ह्मणाला:— (१८) मायेला प्रकृति ह्मणतात, त्या मायेच्या नादीं लागून तिच्या स्वाधीन होऊन वागतो तो पुरुष होय. ह्या दोघां प्रकृति पुरुषांचा कर्म आणि मल ह्यांच्या बरोबर संबंध होतो, आणि त्यांस प्रेरणा करणारा श्रीशंकर हा ईश्वर आहे.

मुनि ह्मणाले:— (१९) माया ह्मणतोस ती माया कोण आहे? आणि त्या मायावश झालेल्या त्या पुरुषाची काय स्थिति होते? त्याचें मूल तरी कशा तऱ्हेचें आणि कोठें आहे? शिवत्व तरी काय आहे? आणि तो शिव तरी कोठें असतो?

वायु ह्मणाला:— (२०) महेश्वराची शक्ति हीच माया होय, आणि ह्या मायेच्या पाशांत गुंतणारा हा चित्स्वरूप आत्मा होय. त्या चित्स्वरूप आत्म्याला अज्ञानदशा आणून त्याची ओळख त्याला राहूं न देणारा हाच मळ होय हा त्या

वृतः ॥ मलश्चिच्छादको नैजो विशुद्धिः शिवता स्वतः ॥२०॥

मुनय ऊचुः ॥ प्रावृणोति कथं माया व्यापिनं केन हेतुना ॥ किमर्थं वा वृतिः पुंसः केन वा विनिवर्तते ॥२१॥

वायुरुवाच ॥ आवृतिर्व्यापिनोऽपि स्याद्व्यापि यस्मात्कलाद्यपि ॥ हेतुः कर्मैव भोगार्थं निवर्तेत मलक्षयात् ॥ २२ ॥

मुनय ऊचुः ॥ कलादि कथ्यते किं तत्कर्म वा किमुदाहृतम् ॥ तत्किमादि किमन्तं वा किं फलं वा किमाश्रयम् ॥ २३ ॥ कस्य भोगश्च किं भोग्यं किं वा तद्भोग-

---

आत्म्याच्या आंगी स्वाभाविकच असतो. आणि विशुद्धि हा शिवपणा आहे.

मुनि ह्मणालेः— ( २१ ) वायो, आत्मा हा स्वतः व्यापक असतां त्याला ही माया अज्ञानपणानें गुंडाळते कशासाठीं ? ह्याचें कारण काय आहे ? हा आत्मा ( पुरुष ) जन्ममरणाच्या फेऱ्यांत कशासाठीं पडतो ? आणि तो जन्ममरणाचा फेरा कोणत्या रीतीनें चुकतो ?

वायु ह्मणालाः— [ २२ ] आत्मा हा स्वतः व्यापक आहे खरा, तरी पण त्याला जन्ममरण वगैरे भोगावें लागतें; कां तर, कलादि वगैरे सर्वव्यापि आहेत. सुखदुःख वगैरे भोगण्यास लावण्यास मूल कारण कर्म आहे. व तो आत्मा मलाचा नाश झाला ह्मणजे मुक्त होतो.

मुनि ह्मणालेः— [ २३ ] कलादि हें काय आहे, कर्म ह्मणून ह्मणतोस तें कर्म काय आहे ? तें कर्म अगोदर कोठून उत्पन्न होतें ? त्याचा शेवटीं नाश कशानें होतो ? त्या कर्माचें फल काय ? आणि तें कर्म कोणाच्या आश्रयानें राहतें ? ( २४ ) भोग कोणाला प्राप्त होतो ? किंवा उपभोग घ्यावयाचें तरी काय

साधनम् ॥ मलक्षयस्य को हेतुः कीदृक्क्षीणमलः पुमान् ॥२४॥
वायुरुवाच ॥ कला विद्या च रागश्च कालो नियतिरेव च ॥ कलादयः समाख्याता यो भोक्ता पुरुषो भवेत् ॥ २५ ॥ पुण्यपापात्मकं कर्म सुखदुःखफलन्तु यत् ॥ अनादिमलभोगान्त अज्ञानात्मसमाश्रयम् ॥ २६ ॥ भोगः कर्मविनाशाय भोग्यमव्यक्तमुच्यते ॥ बाह्यान्तःकरणद्वारं शरीरं भोगसाधनम् ॥ २७ ॥ भावातिशयलभ्येन प्रसादेन मलक्षयः ॥ क्षीणे चात्ममले तस्मिन्पुमाञ्छिवसमो भ-

---

आहे ? किंवा त्या भोगाचें साधन काय ? मलाचा नाश कशानें होतो ? आणि मलाचा नाश झालेला पुरुष कशाप्रकारचा असतो ?

वायु ह्मणालाः— [ २५ ] मुनीश्वरहो, विद्या, राग, काल आणि नियति ह्यांलाच कलादिक ह्मणतात. ह्यांचा जो उपभोग घेतो तो पुरुष होय. ( २६ ) पुण्य आणि पाप ह्यांसच कर्म ह्मणतात. आणि ह्या कर्माचें फळ अनुक्रमानें सुख आणि दुःख हें होय. पुण्याचें फळ सुख आणि पापाचें फळ दुःख होय. तें कर्म अनादि आहे, अनादि मल हा भोग केल्यानें नाश पावतो. तें कर्म अज्ञान आत्म्याचा आश्रय करून राहतें. ( २७ ) भोग हा कर्माचा नाश करण्याला कारण आहे, भोग्याला अव्यक्त असें ह्मणतात. शरीराचीं पांच कर्मेंद्रियें( वाचा, पाय, हात, गुद आणि उपस्थ ) तसेंच पांच ज्ञानेंद्रियें ( डोळे, कान, नाक, जीभ आणि अंगावरील त्वचा ) हीं दोन्ही मिळून दहा इंद्रियें होतात, हीं ह्या शरीराचीं दोन दारें आहेत ह्या इंद्रियांच्या साह्यानें शरीर सुखदुःखाचा अनुभव घेतें. ( २८ ) अतिशय भक्ति असली ह्मणजे प्रसाद होतो तो प्रसाद झाला ह्मणजे मलाचा ( आणव, माया कार्मिक ) यांचा नाश होतो आत्म्याचा मल नाहींसा झाला ह्मणजे पुरुष शिवासा-

वेद ॥ २८ ॥

मुनय ऊचुः ॥ कलादिपंचतत्वानां किं कर्म पृथगुच्यते ॥ भोक्तेति पुरुषश्चेति येनात्मा व्यपदिश्यते ॥ २९ ॥ किमात्मकं तदव्यक्तं केनाकारेण भुज्यते ॥ किं तस्य शरणं भुक्तौ शरीरं च किमुच्यते ॥ ३० ॥

वायुरुवाच ॥ दृक्क्रियाव्यंजिके विद्याकले रागः प्रवर्तकः ॥ कालोऽवच्छेदकस्तत्र नियतिस्तु नियामिका ॥ ३१ ॥ अव्यक्तं कारणं यत्त्रिगुणं प्रभवाप्ययम् ॥ प्रधानं प्रकृतिश्चेति यदाहुस्तत्त्वचिन्तकाः ॥ ३२ ॥ कलातस्तदभिव्यक्तमनभिव्यक्तलक्षणम् ॥ सुखदुःखविमोहात्मा भुज्यते गुणवांस्त्रिधा ॥ ॥ ३३ ॥ सत्वं रज-

---

रखा होतो.

मुनि ह्मणाले:— [२९] कलादि पंचतत्वांचें वेगळें वेगळें कर्म कोणतें मानलें आहे? त्यामुळेंच आत्म्याला भोक्ता आणि पुरुष अशीं नांवें पडलीं आहेत तें निराळें कर्म तरी कोणतें? (३०) त्याचें स्वरूप काय? तें अव्यक्त आहे त्याचा उपभोग कशा तऱ्हेनें घेतां येतो? त्याला शरण (आश्रय) काय आहे? आणि उपभोगाचें शरीर कोणतें ह्मणतात?

वायु ह्मणाला:— [३१] दृष्टीची क्रिया सुचविणाऱ्या विद्या आणि कला आहेत, राग हा प्रवर्तक (संसार वाढविणारा) आहे, त्याविषयीं काल हा विभाग आहे व नियति ही नियम करून देणारी आहे. (३२) अव्यक्त हेंच कारण आहे तें त्रिगुणात्मक (सत्वरजस्तमोगुणात्मक) आहे. त्याला तत्वाविषयीं दूर विचार करणारे तत्वज्ञानी लोक प्रभवाप्ययं, प्रधान आणि प्रकृति असें ह्मणतात. (३३) तें कारणकलेच्या साह्यानें स्पष्ट दिसणारें आणि स्पष्ट न दिसणारें असें आहे तरी सुख आणि दुःख यामुळें भ्रमिष्ट झालेला गुणवान् पुरुष तें तीन प्रकारानें भोगतो. (३४) सत्व रज आणि तम हे तीन प्र-

स्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः ॥ प्रकृतौ सूक्ष्मरूपेण तिले तैलमिव स्थिताः ॥ ३४ ॥ सुखं च सुखहेतुश्च समासात्सात्विकं स्मृतम् ॥ राजसं तद्विपर्यासः स्तम्भमोहौ तु तामसौ ॥ ३५ ॥ सात्विक्यूर्ध्वगतिः प्रोक्ता तामसी स्यादधोगतिः ॥ मध्यमा तु गतिर्या सा राजसी परिपठ्यते ॥ ३६ ॥ तन्मात्रापंचकश्चैव भूतपंचकमेव च ॥ ज्ञानेन्द्रियाणि पंचैव पंचकर्मेन्द्रियाणि च ॥ ३७ ॥ प्रधानबुद्ध्यहङ्कारमनांसि च चतुष्टयम् ॥ समासादेवमव्यक्तं सविकारमुदाहृतम् ॥ ३८ ॥ तत्कारणद-

---

कृतीपासून उत्पन्न झालेले गुण आहेत. तिळामध्यें जसें तेल सूक्ष्मरूपानें राहतें त्याप्रमाणें हे तीन गुण प्रकृतींत सूक्ष्मरूपानें राहतात. (३५) सत्वगुण हा सुखस्वरूप असून सुखाला कारण आहे. असें थोडक्यांत ह्मटलें आहे. ह्याहून उलट ह्मणजे दुःख आणि दुःखाचें कारण ह्यांस राजस ह्मणतात. स्तंभ आणि मोह (बुद्धीची शक्ति कुंठित करून अज्ञानदशा आणणें) ह्यास तामस ह्मणतात. (३६) ऊर्ध्वगतीला सात्विकीगति ह्मणतात. नीचगतीला तामसीगति ह्मणतात. मध्यम स्थितींतील जी गति आहे तिला राजसीगति असें ह्मणतात. स्वर्गांतील देवांची सात्विकीगति असते मनुष्य लोकांत (मृत्युलोकीं) राजसगति असते आणि नरकांतील लोकांची तामसगति असते.) (३७) तन्मात्रा (त्या त्या इंद्रियाचा मुख्य विषय हे) पांच आहेत. भूतें [पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हे] पांच आहेत, ज्ञानेंद्रियें [नेत्र, घ्राण, कर्ण, जिव्हा, आणि त्वक् हे] पांच असून कर्मेंद्रियें [हात, पाय, वाचा, पायु, उपस्थ, हे] पांच आहेत. (३८) प्रधान, बुद्धि, अहंकार, आणि मन, [अन्तःकरण चतुष्टय] हे चार आहेत. ह्या अव्यक्तास थोडक्यांत सविकार असें ह्मटलें आहे. (३९) तें कारणदशेंत असलें ह्मणजे त्यास अव्यक्त [मूळकारण] असें ह्मणतात. तेंच कार्य-

शापन्नमव्यक्तमिति कथ्यते ॥ व्यक्तं कार्यदशापन्नं शरीरादिघटादिवत् ॥ ३९ ॥ यथा घटादिकं कार्यं मृदादेर्नातिभिद्यते ॥ शरीरादि तथ व्यक्तमव्यक्तान्नातिभिद्यते ॥ ४० ॥ तस्मादव्यक्तमेवैकं कारणं करणानि च ॥ शरीरं च तदाधारं तद्भोग्यं चापि ने ॥ ४१ ॥

ऋषय ऊचुः ॥ बुद्धीन्द्रियशरीरेभ्यो व्यतिरिक्तस्य कस्य चित् ॥ आत्मशब्दाभिधेयस्य वस्तुतोऽपि कुतः स्थितिः ॥ ४२ ॥

वायुरुवाच ॥ बुद्धीन्द्रियशरीरेभ्यो व्यतिरिक्तो विभुर्ध्रुवः ॥ अस्त्येव कश्चिदात्मेति हेतुस्तत्र सुदुर्गमः ॥ ४३ ॥ बुद्धी-

---

दशेंत आलें ह्मणजे त्यास व्यक्त [ विकारी ] ह्मणतात माती ही मूलकारण असून तिची घागर केली ह्मणजे ती विकारी झाली तसेंच अन्तःकरण चतुष्ठय वगैरे हे मूलकारण असून त्याचेंच शरीर वगैरे हे विकारी होतें. ( ४० ) जसें मातीची घागर वगैरे कार्य मूलकारण माती तिच्याहून फारसें वेगळें नाहीं तसेंच स्पष्ट दिसणारें शरीर स्पष्ट न दिसणाऱ्या अव्यक्ताहून फारसें वेगळें नाहीं. ( ४१ ) ह्यावरून अव्यक्त [ मूलप्रकृति ] हेंच एक कारण आहे शरीर हें त्याला प्रधानादि पंचतन्मात्र हे कारण [ साधन ] आहेत [ अव्यक्ताला ] आश्रयभूत आहे व त्यालाच भोग्य ह्मणतात भोग्य दुसरें कांहीं नाहीं.

ऋषि ह्मणाले:— ( ४२ ) बुद्धि, इंद्रियें, आणि शरीर, ह्याहून जो वेगळा आहे, ज्याला आत्मा ह्मणतात तो वास्तविक राहतों तरी कोठें ?

वायु ह्मणाला:— ४३ ) बुद्धि, इंद्रियें, आणि शरीर ह्यांहून कोणीएक निराळा आहे तो सामर्थ्यवान् असून नित्य आहे. त्याला आत्मा ह्मणतात. त्याचें कारण असेंच आहे हें समजणें फार कठिण काम आहे. ( ४४ ) जोंपर्यंत स्मरणशक्तीचें

न्द्रियशरीराणां नात्मता सद्भिरिष्यते ॥ स्मृतेरनियतज्ञानाद-
यावद्देहवेदनात् ॥ ४४ ॥ अतः स्मर्तानुभूतानामशेषज्ञेयगोचरः ॥
अन्तर्यामीति वेदेषु वेदान्तेषु च गीयते ॥ ४५ ॥ सर्वं तत्र स
सर्वत्र व्याप्य तिष्ठति शाश्वतः ॥ तथापि क्वापि केनापि व्य-
क्तभेष न दृश्यते ॥ ४६ ॥ नैवायं चक्षुषा ग्राह्यो नापरैरिन्द्रियै-
रपि ॥ मनसैव प्रदीप्तेन महानात्मावसीयते ॥ ४७ ॥ न च स्त्री
न पुमानेष नैव चापि नपुंसकः ॥ नैवोर्ध्वं नापि तिर्यक्च नाध-
स्तान्न कुतश्चन ॥ ४८ ॥ अशरीरं शरीरेषु चलेषु स्थाणुमव्ययम् ॥

---

निश्चयात्मक ज्ञान झालें नाहीं किंवा जोंपर्यंत देहाचें यथार्थ ज्ञान झालें नाहीं तोंपर्यन्त बुद्धि, इंद्रियें, आणि शरीर ह्यांस विद्वान् लोक आत्मा ह्मणत नाहींत. ( ४५ ) ह्यासाठीं आठवण करणारा, अनुभव घेणारा, [ पूर्वीं अनुभवलेल्या गोष्टीची आठवण करणारा ] सर्व प्रकारचें ज्ञान करून घेण्याची ज्याचे आंगीं शक्ति आहे [ जाणण्याचीं जीं जीं साधनें आहेत त्यांनीं जाणण्यासारखा ] तो आत्मा आंत राहतो असें वेदांत आणि वेदांतांत जागोजाग सांगितलें आहे. ( ४६ ) तो आत्मा तेथें [ शरीरांत ] सर्व ठिकाणीं सारखा भरलेला असून त्यानें सर्व इंद्रियांस व्यापून टाकिलें आहे. तो अजरामर आहे, असें आहे तरी त्याला अद्याप कोणी कोठेंही पाहिलेलें नाहीं. ( ४७ ) तो प्रत्यक्ष डोळ्यानें दिसत नाहीं किंवा डोळ्याखेरीज इतर इंद्रियांच्या द्वारानें तो समजून येत नाहीं, त्या श्रेष्ठ आत्म्याचें ज्ञान दूरवर विचार करणाऱ्या मनाच्या साधनानेंच होतें. ( ४८ ) तो आत्मा स्त्री नव्हे, किंवा पुरुष नव्हे, किंवा नपुंसकही नव्हे, तो वर नाहीं किंवा बाजूकडे नाहीं, तो खालीं नाहीं किंवा अमुक एक ठिकाणीं बसलेला नाहीं. ( ४९ ) त्या आत्म्याला शरीर नाहीं तरी तो चंचळ होणाऱ्या शरीरांत राहतो तो स्थिर असून अविनाशी आहे. त्याला धैर्यवान् मनुष्य विचारशक्तीच्या

सदा पश्यति तं धीरो नरःप्रसवमर्शनात् ॥ ४९ ॥ किमत्र बहुनोक्तेन पुरुषो देहतः पृथक् ॥ अपृथग्ये तु पश्यंति असम्यक्तेषु दर्शनम् ॥ ५० ॥ यच्छरीरमिदं प्रोक्तं पुरुषस्य ततःपरम् ॥ अशुद्धमवशं दुःखमध्रुवं च न विद्यते ॥ ५१ ॥ विपदां बीजभूतेन पुरुषस्तेन संयुतः ॥ सुखी दुःखी च मूढश्च भवति स्वेन कर्मणा ॥ ५२ ॥ अद्भिराप्लावितं क्षेत्रं जनयत्यंकुरं यथा ॥ अज्ञानप्लावितं कर्म देहं जनयते तथा ॥ ५३ ॥ अत्यन्तमसुखावासं रुग्णं चैकान्तमृत्यवः ॥ अनागता अतीताश्च तनवोऽस्य सहस्रशः ॥ ५४ ॥ आगत्यागत्य शीर्णेषु शरीरेषु शरीरिणः ॥

---

साह्यानें नेहमीं पाहतो. (५०) फार सांगण्यांत काय मतलब आहे ? हा पुरुप [ आत्मा ] शरीराहून अगदीं वेगळा आहे, जे कोणी ह्याला शरीर आणि आत्मा एकच आहे असें मानतात किंवा शरीरालाच आत्मा मानितात त्यांचें तें ह्मणणें बरोबर नाहीं. (५१) हें जें पुरुषांचें [ आत्म्याचें [ शरीर ह्मणतात त्या शरीराहून आत्मा निराळा आहे मलीनपणा, परतंत्रपणा, दुःखावस्था आणि नाशवंत स्थिति त्या आत्म्याला नाहीं. ह्या सर्व गोष्टी शरीरास लागू आहेत. (५२) शरीर हें अनेक प्रकारचीं संकटें उत्पन्न करण्याला मूल कारण आहे, त्या शरीराचा स्वीकार करून आत्मा अज्ञान होतो, व आपल्याच कर्मामुळें मी सुखी आहें मी दुःखी आहें असें मानूं लागतो. (५३) एखादें काळ्या मातीचें उत्तम शेत पाण्यानें चांगलें भिजविलें ह्मणजे त्याला जसे आपोआप अंकुर फुटूं लागतात तसें कर्म हें अज्ञानपणानें व्यापलें ह्मणजे आत्म्याला तसे तसे देह उत्पन्न करितें. (५४) शरीर हें अतिशय दुःखाचें मूलस्थान आहे, तें रोगी असून त्याला निश्चयानें कधीं तरी मरण आहेच. ह्या आत्म्याला अशीं शरीरें आजपर्यंत अनेक झालीं व पुढें अनेक [ शेंकडों ] होतील. (५५) देहधारी प्राण्याला आत्म्याला अनेकवेळ जन्मास येऊन येऊन

असन्तवसतिः क्वापि न केनापि च लभ्यते ॥ ५५ ॥ छादितश्च वियुक्तश्च शरीरैरेष लक्ष्यते ॥ चन्द्राबिंबवदाकाशे तरलैरभ्रसंचयैः ॥ ५६ ॥ अनेकदेहभेदेन भिन्ना वृत्तिरिहात्मनः ॥ अष्टापदपरिक्षेपे ह्यक्षमुद्रेव लक्ष्यते ॥ ५७ ॥ नैवास्य भविता कश्चिन्नासौ भवति कस्य चित् ॥ पथि सङ्गम एवायं दारैरन्यैश्च बन्धुभिः ॥५८॥ यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महोदधौ ॥ समेत्य च व्यपेयातां तद्वद्भूतसमागमः ॥ ५९ ॥ स पश्यति शरीरं तच्छरीरं तन्न पश्यति ॥ तौ पश्यति परः कश्चित्तावुभौ तं न पश्यतः ॥ ६० ॥

---

शरीरें क्षीण होऊन तेथें तेथें मरण आल्यामुळें त्याला एके ठिकाणीं [ एकाच शरीरांत ] नेहमीं राहणें कोठें कधींच मिळत नाहीं. ( ५६ ) आकाशांत चंद्राचें बिंब पावसाळ्याच्या दिवसांत एका क्षणांत ढगांत बुडून जातें व पुन्हां लागलेंच बाहेरही निघतें त्याप्रमाणें हा आत्मा शरीरामुळें आच्छादलेला व शरीराशीं तुटातुट झालेला दिसतो वास्तविक पाहतां कांहींच नाहीं. ( ५७ ) एकाच सोन्याचे अनेक प्रकारचे अलंकार केले तरी सोनें सर्वांचें एकच असून आकार मात्र त्याचे वेगळे वेगळे झालेले दिसतात, त्याप्रमाणें आत्मा एकच आहे तरी निरनिराळीं शरीरें घेण्यामुळें त्याचे आकार वेगळे दिसतात. ( ५८ ) ह्या आत्म्याचा कोणी नातलग नाहीं किंवा हा आत्मा कोणाचाही नातलग होत नाहीं. बायको, मुलें, व इतर नातलग लोक ह्यांचा संगम ह्मणजे वाटेंत अवचित् गांठ पडलेल्या वाटसरांच्या भेटीसारखा आहे. ( ५९ ) जशीं महासागरांत दोन लांकडें बरोबर वाहत चाललेलीं असतात कांहींवेळ बरोबर चालतात, पुन्हां दूर दूर जातात, पुन्हां चुकून कदाचित् एकत्र होतात, किंवा मुळींच एकत्र होत नाहींत, तसाच ह्या लोकीं प्राणिमात्रांचा परस्पराशीं संबंध आहे. ( ६० ) तो आत्मा त्या शरीराला पाहतो परंतु तें शरीर त्या आत्म्याला पाहूं शकत नाहीं, त्या आत्म्याला व शरीराला कोणीएक [ कूटस्थ ] पाहतो परंतु त्या परमेश्वराला [ कूटस्थाला ] पाहण्याची आत्म्याची

ब्रह्माद्याः स्थावरान्ताश्च पशवः परिकीर्तिताः ॥ पशूनामेव सर्वेषां प्रोक्तमेतन्निदर्शनम् ॥ ६१ ॥ य एष बध्यते पाशैःसुखदुःखाशनः पशुः ॥ लीलासाधनभूतोऽयमीश्वरस्येति सूरयः ॥ ६२ ॥ अज्ञो जन्तुरनीशोऽयमात्मनः सुखदुःखयोः ॥ ईश्वरप्रेरितो गच्छेत्स्वर्गं वा श्वभ्रमेव वा ॥ ६३ ॥

मुनय ऊचुः ॥ योऽयं पशुरिति प्रोक्तो यश्च पाश उदाहृतः । आभ्यां विलक्षणः कश्चित्कोऽयमस्त्यनयोः पतिः ॥ ६४ ॥

वायुरुवाच ॥ अस्ति कश्चिदपर्यन्तरमणीयगुणाश्रयः ॥ पतिर्विश्वस्य निर्माता पशुपाशविमोक्षणः ॥ ६५ ॥ अभावे तस्य

---

व शरीराचीही शक्ति नाहीं. ( ६१ ) ब्रह्मादिक देवांपासून तों तहत लहान सहान अचेतन [ निर्जीव ] पदार्थापर्यन्त सर्व प्राणिमात्र पशु मानले आहेत, सर्व पशूंचें हें लक्षण सांगितलें. ( ६२ ) जो हा पशु बांधला जातो, सुखाचा आणि दुःखाचा उपभोग घेतो, तो परमेश्वराच्या खेळण्याच्या वस्तूंपैकीं एक वस्तु आहे, असें विद्वान् लोक ह्मणतात. ( ६३ ) हा पशु अज्ञान आहे, आणि आपलें सुखदुःख चुकविण्याला असमर्थ आहे, त्यामुळें त्याला वागविणारा ईश्वर त्याला जिकडे पाठवील त्या वाटेनें तो स्वर्गास किंवा नरकास जातो.

मुनि ह्मणालेः— ( ६४ ) ज्याला तूं पशु ह्मणतोस ज्याला पाश ह्मणतोस आणि ह्या दोहोंहून निराळ्या प्रकारचा ह्या दोहोंचा पति आहे ह्मणतोस हे तिघे आहेत तरी कोण ? तें आह्मांस सांग.

वायु ह्मणालाः— ( ६५ ) ज्याच्या चांगल्या गुणांचा पार लागत नाहीं, जो सर्व जगाचा उत्पत्तिकर्ता असून रक्षणकर्ता आहे, व पशूंची पाशांतून मुक्तता करणारा आहे असा कोणी-एक परमेश्वर आहे. ( ६६ ) तो जर नसेल तर ह्या त्रैलोक्याची

विश्वस्य सृष्टिरेषा कथं भवेत् ॥ अचेतनत्वादज्ञानादनयोः पशुपाशयोः ॥ ६६॥ प्रधानपरमाण्वादि यावत्किञ्चिदचेतनम् ॥ न तत्कर्तृ स्वयं दृष्टं बुद्धिमत्कारणं विना ॥ ६७ ॥ जगच्च कर्तृसापेक्षं कार्यं सावयवं यतः ॥ तस्मात्कार्यस्य कर्तृत्वं पत्युर्न पशुपाशयोः ॥ ६८ ॥ पशोरपि च कर्तृत्वं पत्युः प्रेरणपूर्वकम् ॥ अयथाकरणज्ञानमन्धस्य गमनं यथा ॥ ६९ ॥ आत्मानञ्च पृथङ्मत्वा प्रेरितारं ततः पृथक् ॥ असौ जुष्टस्ततस्तेन ह्यमृतत्वाय कल्पते ॥ ७० ॥ पशोः पाशस्य पत्युश्च तत्वतोऽस्ति

---

उत्पत्ति तरी कशी होईल? कारण पशु हा अज्ञान असून पाश हा निर्जीव आहे त्यांचेकडून सृष्टि उत्पन्न करण्यासारखीं कामें कशीं होतील? (६७) प्रधान परमाणु वगैरे जितके कांहीं अचेतन पदार्थ [ निर्जीव पदार्थ ] आहेत तें स्वतः कर्तृ [ आपण स्वतः करणारें ] झाल्याचें पाहिलें नाहीं; तें करण्याला बुद्धिमानाचें सहाय्य पाहिजे, त्याखेरीज निर्जीव पदार्थांकडून कोणतेंही कार्य व्हावयाचें नाहीं. बुद्धिमान् मात्र निर्जीव वस्तूंकडून करितां येण्यासारखीं असतील तीं कामें करून घेईल. (६८) जग निर्माण होण्याला निर्माणकर्त्याची आवश्यकता आहे, कां तर कार्य हें अवयवांसहित आहे, त्यामुळें कार्याचा कर्तृपणा पतीचा ( ईश्वराचा ) आहे, पशूचा किंवा पाशाचा नाहीं. (६९) पशु देखील कांहीं कांहीं कामें करूं शकतो परंतु तो पतीच्या प्रेरणेवरून करितो, पतीच्या प्रेरणेखेरीज स्वतंत्रतेनें काम करण्याची शक्ति त्याचे आंगीं नाहीं. आंधळा मनुष्य स्वतः चालतो, परंतु अमुकरीतीनें चाल असें नीट सांगणारा [ वागविणारा ] डोळस मनुष्य त्याला लागतो, तीच स्थिति पशूची आहे. (७०) आत्मा हा वेगळा असून त्या आत्म्याला प्रेरणा करणारा परमेश्वर वेगळा आहे, असें मानून त्या आत्म्याचा परमेश्वराशीं संबंध ठेवण्याचा जो कोणी प्रयत्न करितो, तो मोक्षास जाण्यास अधिकारी [ पात्र ] होतो. (७१) पशु व पाश आणि पति ह्यांच्यांत

यदन्तरम् ॥ ब्रह्मवित्तद्विदित्वैव योनिमुक्तो भविष्यति ॥ ७१ ॥ संयुक्तमेतद्वितयं क्षरमक्षरमेव च ॥ व्यक्ताव्यक्तं बिभर्तीशो विश्वं विश्वविमोचकः ॥ ७२ ॥ भोक्ता भोग्यं प्रेरयिता मन्तव्यं त्रिविधं स्मृतम् ॥ नातःपरं विजानद्भिर्वेदितव्यं हि किञ्चन ॥ ७३ ॥ तिलेषु वा यथा तैलं दध्नि वा सर्पिरर्पितम् ॥ यथापः स्रोतसि व्याप्ता यथारण्यां हुताशनः ॥ ७४ ॥ एवमेव महात्मानमात्मन्यात्मविलक्षणम् ॥ सत्येन तपसा चैव नियुक्तोऽनुपश्यति ॥ ७५ ॥ य एको जालवानीश ईशानीभिः स्वशक्तिभिः ॥ सर्वांल्लोकानिमान्कृत्वा एक एव स ईशते ॥ ७६ ॥

---

वास्तविक जें अंतर आहे तें अंतर तत्वज्ञानी मनुष्य जाणून जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होईल. ( ७२ ) क्षर एक अक्षर हे दोन्ही परस्परांत मिळून गेलेले आहेत. त्यालाच व्यक्त आणि अव्यक्त असें ह्मणतात; ह्या व्यक्त आणि अव्यक्त असणाऱ्या विश्वाचें विश्वाची दुःखांतून मुक्तता करणारा परमेश्वरच रक्षण करितो. ( ७३ ) भोक्ता, भोग्य आणि प्रेरक ह्या तीनच गोष्टी विचार करण्यासारख्या मानल्या आहेत. ह्याखेरीज विद्वान् लोकांस ह्या जगांत विचार करण्यासारखें दुसरें कांहींच नाहीं. ( ७४ ) तिळांत जसें तेल आहे, दह्यांत जसें तूप आहे, प्रवाहांत जसें पाणी आहे किंवा अरणींत जसा विस्तव आहे. ( ७५ ) त्याप्रमाणेंच महान् आत्मा [परमेश्वर] आत्म्यापेक्षां विलक्षण रीतीची त्याचे आंगीं शक्ति असल्यामुळें आत्म्यांत राहतो, त्या परमेश्वराचें आपणास दर्शन व्हावें ह्मणून ज्याची सारखी रात्रंदिवस खटपट सुरू आहे तो ज्ञानी मनुष्य सत्याच्या आणि तपश्चर्येच्या साह्यानें त्यास पाहतो. ( ७६ ) जो परमेश्वर एकटा आहे तरी समर्थ असणाऱ्या आपल्या शक्तींमुळें सर्वांवर जाळें पसरून सर्वांस आपल्या जाळ्यांत धरितो व सर्व लोकांस जाळ्यांत अडकावून

एक एव तदा रुद्रो न द्वितीयोऽस्ति कश्चन ॥ संसृज्य विश्वभुवनं गोप्तान्ते संचुकोच सः ॥ ७७ ॥ विश्वतश्चक्षुरेवायमुतायं विश्वतोमुखः ॥ तथैव विश्वतोबाहुर्विश्वतःपादसंयुतः ॥ ७८ ॥ द्यावाभूमौ च जनयन्देव एको महेश्वरः ॥ स एव सर्वदेवानां प्रभवश्चोद्भवस्तथा ॥ ७९ ॥ हिरण्यगर्भं देवानां प्रथमं जनयेदयम् ॥ विश्वस्मादधिको रुद्रो महर्षिरिति हि श्रुतिः ॥ ८० ॥ वेदाहमेतं पुरुषं महान्तममृतं ध्रुवम् ॥ आदित्यवर्णं तमसः परस्तात्संस्थितं प्रभुम् ॥ ८१ ॥ अस्मान्नास्ति परं किंचिदपरं परमात्मनः ॥ नाणीयोऽस्ति च ज्यायस्तेन पूर्णमिदं जगत् ॥ ८२ ॥ सदैको वृक्षवत्स्तब्धः केवलो दिवि तिष्ठति ॥ संक-

---

आपण स्वतंत्रपणानें वागतो. ( ७७ ) रुद्र हा एकटाच आहे, दुसरा कोणी नाहीं, तोच स्वतः त्रैलोक्यरूपी गृह उत्पन्न करितो त्याचें रक्षण करितो आणि प्रलयकाळाच्यावेळीं झांकूनही घेतो. ( ७८ ) ह्या परमेश्वराला चोंहोंकडे डोळे आहेत, ह्याला चोंहोंकडे तोंडें आहत. तसेंच ह्याला चोहोंकडे हात असून चोहोंकडे पाय आहेत. ( ७९ ) ह्यालाच महेश्वर ह्मणतात, हा देव एकटा असून ह्यानेंच स्वर्ग आणि भूमि उत्पन्न केली. तोच [ हाच ] देव सर्व देवांच्या उत्पत्तीला कारण असून ह्याचेपासूनच सर्व देव उत्पन्न झाले. ( ८० ) ह्यानें सर्व देवांच्या अगोदर ब्रह्मदेवास उत्पन्न केले. हा रुद्र मोठा ऋषि असून सर्व त्रैलोक्यापेक्षां ज्यास्त शक्तिमान् आहे असें प्रत्यक्ष देव सांगतो. ( ८१ ) वेद ह्मणतो—मी ह्या पुरुषाला जाणतों, हा फार मोठा असून ह्याला मरण नाहीं. हा चिरकाल राहणारा आहे हा परमेश्वर अंधाराचे पुढें जसा सूर्य असावा तसा [ अज्ञानाचा नाश करणारा ] आहे. ( ८२ ) ह्या परमात्म्यापेक्षां श्रेष्ठ असें ह्या जगांत कांहींच नाहीं. व ह्या परमेश्वराशिवाय दुसरी वस्तुही नाहीं. हा अतिशय लहान नाहीं किंवा अतिशय मोठाही नाहीं तरी त्या परमेश्वरानें हें सर्व त्रैलोक्य पूर्णपणानें भरलें आहे. ( ८३ ) हा सत् आहे, हा वृक्षासारखा स्तब्ध [ उगीच ] राहतो, हा एकटा आहे, हा आ-

ल्पप्रभवं तस्य चराचरमिदं जगत् ॥ ८३ ॥ सर्वाननशिरोग्रीवः सर्वभूतगुहाशयः ॥ सर्वव्यापी च भगवांस्तस्मात्सर्वगतःशिवः ॥ ८४ सर्वतः पाणिपादोऽयं सर्वतोऽक्षिशिरोमुखः ॥ सर्वतः श्रुतिमाँल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥८५॥ सर्वेंद्रियगुणाभासः सर्वेन्द्रियविवर्जितः ॥ सर्वस्य प्रभुरीशानः सर्वस्य शरणं सुहृत् ॥ ८६ ॥ अचुक्षरपि यः पश्यत्यकर्णोऽपि श्रुणोति यः ॥ सर्वं वेत्ति न वेत्ताऽस्य तमाहुः पुरुषं परम् ॥ ८७ ॥ अणोरणीयान्महतो महीयानयमव्ययः ॥ गुहायां निहितश्चापि जन्तोश्चास्य महेश्वरः ॥ ८८ ॥ तमक्रतुं क्रतुप्रायं महिमातिशयान्वितम् ॥ धातुः प्रसादादी-

---

काशांत राहतो, त्याचे मनांत येण्याबरोबर हें सर्व स्थावर जंगम विश्व उत्पन्न झालें. ( ८४ ) ह्याला सर्व बाजूला [ सर्व ठिकाणीं ] तोंडें मस्तकें आणि माना आहेत. हा सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत राहतो. ह्यानें सर्व जग व्यापून टाकिलें आहे, हा भगवान् आहे, ह्यामुळें ह्याला सर्व ठिकाणीं जातां येतां येण्याचें सामर्थ्य असणारा शिव ह्मणतात. ( ८५ ) ह्याला चोहोंकडे हात आणि पाय आहेत, ह्याला चोहोंकडे डोळे, डोकीं आणि तोंडें आहेत. ह्याला चोहोंकडे कान आहेत, हा परमेश्वर जगामध्यें असणारें सर्व पदार्थ व्यापून राहतो. ( ८६ ) ह्या परमेश्वराला सर्व इंद्रियें आणि इंद्रियांचे गुण असल्यासारखे भासतात तरी ह्याला कोणतेही इंद्रिय नाहीं. हा परमेश्वर सर्व जगाचा प्रभु आहे, ह्याला ईशान ह्मणतात, हा सर्व जगाचा रक्षणकर्ता असून सर्व जगाचा मित्र आहे. ( ८७ ) ह्याला डोळे नाहींत तरी हा पहातो, ह्याला कान नाहींत तरी हा ऐकतो, हा सर्व कांहीं जाणतो, परंतु ह्याला यथार्थ रीतीनें कोणी जाणूं शकत नाहीं ह्याला श्रेष्ठ पुरुष असें ह्मणतात. ( ८८ ) हा परमेश्वर लहानाहून लहान आहे, व मोठ्याहून मोठा आहे, ह्या परमेश्वराचा नाश ह्मणून होत नाहीं. ह्याला महेश्वर ह्मणतात, हा प्राणिमात्रांच्या हृदयरूपी गुहेंत राहतो. ( ८९ ) तो यज्ञ करीत नाहीं तरी तो यज्ञाप्रमाणें पूज्य आहे.

शानं वीतशोकः प्रपश्यति ॥ ८९ ॥ वेदाहमेनमजरं पुराणं सर्वगं प्रभुम् ॥ निरोधं जन्मनो यस्य वदन्ति ब्रह्मवादिनः ॥ ९० ॥ एकोऽपि त्रीनिमाँल्लोकान्बहुधा शक्तियोगतः ॥ विदधाति विचेस्यन्ते विश्वमादौ महेश्वरः ॥ ९१ ॥ विश्वधात्रीत्वजाख्या च शैवी चित्प्रकृतिः स्मृता ॥ तामजां लोहितां शुक्लां कृष्णामेकां त्वजः प्रजाः ॥ ९२ ॥ जनित्रीमनुशेतेऽन्यो जुषमाणः सरूपिणीम् ॥ तामेवाजामजोऽन्यस्तु भुक्तभोगां जहाति च ॥ ९३ ॥ द्वौ सुपर्णौ च सयुजौ समानं वृक्षमा

---

ह्याचा महिमा फार मोठा आहे. आपणास दैव अनुकूळ झालें किंवा ब्रह्मदेवानें आपल्यावर कृपा केली तर तो मनुष्य सर्व दुःखांतून मुक्त होऊन त्याला ह्या परमेश्वराचें दर्शन होतें. (९०) वेद आणखी असें ह्मणतो कीं, मी ह्या परमेश्वराला चांगल्या तऱ्हेनें ओळखतों. ह्या परमेश्वराला ह्मातारपण नाहीं, हा अनादिकालाचा आहे, ह्याला पाहिजे तेथें जातां येतां येतें, हा ईश्वर आहे, ब्रह्मज्ञानी लोक ह्मणतात कीं, ह्याला जन्मच नाहीं. (९१) हा एकटा आहे तरी आपल्या अलौकिक सामर्थ्यामुळें हा त्रैलोक्य आधीं उत्पन्न करितो. (९२) अजा नांवाची विश्वाचें रक्षण करणारी चिच्छक्ति आहे, तिला शिवाची प्रकृति ह्मणतात. ती अजा लोहित (रजोगुण) शुक्ल (सत्वगुण) कृष्ण (तमोगुण) अशा रूपाची असून ती एकटी आहे, तिजपासून ह्या अजाला (परमेश्वराला) अनेक संतति झाली. (९३) ही आपल्या स्वरूपाला आणि गुणांला योग्य आहे असें पाहून [ जाणून ] तो परमात्मा ह्या जगन्मातेचा उपभोग घेत सुखानें राहतो. त्याच अजेला हा तिच्याहून दुसरा परमेश्वर उपभोग घेतल्यावर सोडूनही देतो. (९४) दोन पक्षी आहेत, ते परस्पर फार स्नेही आहेत, ते दोघेही एकाच झाडावर बसतात, त्या दोघांपक्ष्यांपैकीं एकजण [ जीवात्मा ] गोड असा पिंपळ खातो, आणि दुसरा पक्षी [ कूटस्थ ] कांहीं

स्थितौ ॥ एकोऽत्ति पिप्पलं स्वादु परोऽनश्नन्प्रपश्यति ॥ ९४ ॥ वृक्षेऽस्मिन्पुरुषो मग्नो मुह्यमानश्च शोचति ॥ जुष्टमन्यं यदा पश्येदीशं परमकारणम् ॥ तदास्य महिमानं च वीतशोकः सुखी भवेत् ॥ ९५ ॥ छन्दांसि यज्ञाः क्रतवो यद्भूतं भव्यमेव च ॥ मायी विश्वं सृजत्यस्मिन्निविष्टो मायया पुरः ॥ ९६ ॥ मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ॥ तस्यास्त्ववयवैरेव व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥ ९७ ॥ सूक्ष्मातिसूक्ष्ममीशानं कललस्यापि मध्यतः ॥ स्रष्टारमपि विश्वस्य चेष्टितारन्तु तस्य च ॥ शिवमेवेश्वरं ज्ञात्वा शान्तिमत्यन्तमृच्छति ॥ ९८ ॥ स एव कालो गोप्ता च विश्वस्याधिपतिः प्रभुः ॥

---

एक न खातां त्या खाणाऱ्या पक्ष्यांकडे टक लाऊन पहात असतो. ( ९५ ) ह्या वृक्षावर एक पुरुष ( जीवात्मा ) नेहमीं दुःख करीत असतो, तो अज्ञानपणानें व्यापलेला आहे तो त्याच्याच शेजारी बसलेल्या सर्व जगाला कारण असणाऱ्या परमेश्वराला जेव्हां पाहील तेव्हां त्याचा यथार्थ रीतीनें जाणील व त्यामुळें आपलें दुःख सर्व विसरून जाऊन सुखी होईल. ( ९६ ) छंदांसि ( वेद ) यज्ञ, क्रतु, भूत आणि वर्तमान ह्या सर्व गोष्टी तो मायी परमेश्वर ह्या विश्वांतच राहून मायेच्या साह्यानें हें प्रत्यक्ष तऱ्हेनें दिसणारें विश्व उत्पन्न करितो. ( ९७ ) मायेला प्रकृति ह्मणतात, आणि महेश्वराला मायी ह्मणतात, त्या मायेच्या अवयवानेंच हें सर्व त्रैलोक्य व्यापलेलें आहे. ( ९८ ) परमेश्वर इतका लहान आहे कीं, तो एखाद्या लहानशा बुडबुड्यांत देखील लहानाहून लहान होऊन राहतो, तरी हा सर्व सृष्टि उत्पन्न करणारा आहे व त्या सृष्टीचा चालकही तोच आहे शिव हाच परमेश्वर आहे असें समजून आल्यावर त्याचे ( प्राण्याचे ) मनाला फारच सुख होतें. ( ९९ ) तो परमात्मा ह्या जगाचा संहार करितो, रक्षण करितो, तो सर्व जगाचा अधिपति आहे, तो परमेश्वर त्रैलोक्याचा अधिपति

तं विश्वाधिपतिं ज्ञात्वा मृत्युपाशात्प्रमुच्यते ॥ ९९ ॥ घृतात्परं मण्डमिव सूक्ष्मं ज्ञात्वाधिपं शिवम् ॥ सर्वभूतेषु गूढश्च सर्वपापैः प्रमुच्यते ॥ १००॥ एष एव परो देवो विश्वकर्मा महेश्वरः ॥ हृदये सन्निविष्टं तं ज्ञात्वैवामृतमश्नुत ॥ १०१ ॥ यदा समस्तं न दिवा न रात्रिर्न सदप्यसत् ॥ केवलः शिव एवैको यतः प्रज्ञा पुरातनी ॥ १०२ ॥ नैनमूर्ध्वं न तिर्यञ्च न मध्ये परिजगृहेत् ॥ न तस्य प्रतिमा चास्ति यस्य नाम महद्यशः ॥ १०३ ॥ अजातमिममेवैकं बुध्द्वा जन्मनि भीरवः ॥ रुद्रास्यास्य प्रपद्यन्ते रक्षार्थं दाक्षिणं मुखम् ॥ १०४ ॥ द्वे अक्षरब्रह्मपरे त्वनन्ते

---

आहे, असें यथार्थ रीतीनें समजल्यावर तो प्राणी जन्ममरणाच्या पाशांतून मुक्त होतो. (१००) तुपापेक्षां मंड [ दह्यांत तयार केलेला एक दार्थ ] जसें सूक्ष्म आहे तसा शिव हा श्रेष्ठ आहे, तो त्रैलोक्याचा अधिपति आहे, व सर्व प्राणिमात्रांत तो गुप्त रूपानें राहतो, असें समजलें ह्मणजे प्राणी सर्व पापापासून मुक्त होतो. (१०१) हाच श्रेष्ठ परमेश्वर आहे, हा त्रैलोक्याचा कर्ता असून ह्याला महेश्वर ह्मणतात हा प्राणिमात्रांच्या हृदयांत राहतो; ह्याचें यथार्थ ज्ञान झालें ह्मणजे मनुष्य मोक्षाला जातो. (१०२) ज्यावेळीं हें सर्व त्रैलोक्य नव्हतें, दिवस नव्हता, रात्र नव्हती सत् नव्हतें किंवा असतूही नव्हतें त्यावेळीं फक्त शिव एकटाच होता; कां तर असें अनादिकालापासून असणारा वेद सांगत आहे. (१०३) कोणी ह्यास हा वर आहे ह्मणतील, किंवा बाजूस आहे ह्मणतील, किंवा मध्यें आहे ह्मणतील, तर त्यांस तेथें सांपडणार नाहीं. त्याची मूर्ति नाहीं त्याला महद्यश असें नांव आहे. (१०४) हा परमेश्वर एक आहे, हा कधींही जन्मलेला नाहीं हें ज्यांस समजलें आहे ते ज्ञाते लोक जन्ममरणास भिऊन तें चुकावयासाठीं व आपलें रक्षण व्हावयासाठीं ते ह्या रुद्राच्या उजव्या तोंडांत येतात. (१०५) विद्या आणि अविद्या ह्या दोन अक्षर असून

समुदाहृते ॥ विद्याविद्ये समाख्याते निहिते यत्र गूढवत् ॥१०५॥ क्षरन्त्वविद्या ह्यमृतं विद्येति परिगीयते ॥ ते उभे ईशते यस्तु सोऽन्यः खलु महेश्वरः ॥ १०६ ॥ एकैकं बहुधा जालं विकुर्वन्नेकवच्च यः ॥ सर्वाधिपत्यं कुरुते सृष्ट्वा सर्वान्प्रतापवान् ॥ १०७ ॥ दिशमूर्द्ध्वमधस्तिर्यग्भासयन्भ्राजते स्वयम् ॥ योनिस्वभावादप्येको वरेण्यस्त्वाधितिष्ठति ॥ १०८ ॥ स्वभावं वाचकान्सर्वान्वाच्यांश्च परिणामयन् ॥ गुणांश्च भोग्यभोक्तृत्वे तद्विश्वमधितिष्ठति ॥ १०९ ॥ तं वै गुह्योपनिषदि गूढं ब्रह्म परात्परम् ॥ ब्रह्मयोनिं जगत्पूर्वं विदुर्देवा महर्षयः ॥ ११० ॥ भावग्राह्यमनीडाख्यं भावाभावकरं शिवम् ॥ कलासर्गकरं देवं

---

परब्रह्मस्वरूप आहेत. त्या अनंत आहेत, त्या कोठें तरी गुप्त ठिकाणीं ठेविलेल्या आहेत. ( १०६ ) क्षरास अविद्या ह्मणतात, आणि अमृतास [ अक्षरास ] विद्या ह्मणतात. ते दोन्हीही ज्याच्या शक्तीवर इतके बलवान् होतात तो महेश्वर तर खरोखर निराळाच आहे. ( १०७ ) तो परमात्मा एक एका वस्तूचा मोठा पसारा करितो आणि त्या पसाऱ्याची पुनः एक वस्तु करितो. तो मोठा पराक्रमी आहे, तो स्वतः सर्व प्राणिमात्र उत्पन्न करून सर्वांचें आधिपत्य [ स्वामित्व ] करितो. ( १०८ ) हा स्वतः प्रकाशमान असल्यामुळें वरच्या बाजूला खालच्या बाजूला कोंपऱ्याच्या बाजूलाही प्रकाशित करितो. तो स्वतः एकटा आहे तरी कारण स्वभावामुळें सगळें जग व्यापून राहतो, हा सर्व प्राणिमात्रांपेक्षां श्रेष्ठ आहे. ( १०९ ) स्वभाव, वाचक, वाच्य, गुण, भोग, भोक्तृत्व हे सर्व त्यालाच पूर्णपणानें लागू पडतात व अशा तऱ्हेनें तो सर्व जगांत व्यापून राहिला आहे. ( ११० ) ह्याला गूढोपनिषदांत गूढब्रह्म आणि श्रेष्ठाहून श्रेष्ठ असें ह्मटलें आहे. देव आणि मोठमोठें ऋषीश्वर ह्या परमेश्वराला ब्रह्मदेवाचा मूल पुरुष आणि सर्व जगाच्या अगोदरपासून असणारा असें ह्मणतात. ( १११ ] हा परमेश्वर भक्तीनें वश होतो ह्याला अनीडा असें ह्मणतात.

ये विदुस्ते जहुस्तनुम् ॥ १११ ॥ स्वभावमेके मन्यन्ते कालमन्ये विमोहिताः ॥ देवस्य महिमा ह्येष येनेदं भ्राम्यते जगत् ॥ ११२ ॥ येनेदमावृतं नित्यं कालःकालात्मना यतः ॥ तेनेरितमिदं कर्म भूतैः सह विवर्तते ॥ ११३ ॥ यत्कर्म भूयशः कृत्वा विनिवर्त्य च भूयशः ॥ तत्वस्य सह सत्वेन योगं चापि समेत्य वै ॥ ११४ ॥ अष्टाभिश्च त्रिभिश्चैव द्वाभ्यां चैकेन वा पुनः ॥ कालेनात्मगुणैश्चापि कृत्स्नमेव जगत्स्वयम् ॥ ११५ ॥ गुणैरारभ्य कर्माणि स्वभावान्विनियोजयेत् ॥ तेषामभावे नाशः स्यात्कृतस्यापि च कर्मणः ॥ कर्मक्षये पुनश्चान्यत्ततो याति स

---

भाव आणि अभाव ह्या परमेश्वरापासूनच उत्पन्न झाले. कला आणि सर्ग ह्यानेंच निर्माण केले ह्या परमेश्वराला जे यथार्थ रीतीनें जाणतात, ते शरीरापासून [ जन्ममरणाच्या फेऱ्यांतून ] मुक्त होतात. ( ११२ ) किती एक लोक ह्याच्या मायेनें भ्रमिष्ट झाले असल्यामुळें ह्या परमेश्वराला स्वभाव ह्मणतात दुसरे कोणी ह्याला काल ह्मणतात. हा सर्व ह्या देवाचाच प्रताप आहे, त्यामुळें सर्व जग अज्ञान होऊन जातें. ( ११३ ) हा परमेश्वर स्वतः कालस्वरूप [ काळाचाही काळ ] असल्यामुळें ह्यानें सर्व जग व्यापून टाकिलें आहे. त्यानें प्रेरणा केली ह्मणजे हें कर्म प्राण्यांच्या संगतीनें फिरावयास लागतें. ( ११४ ) आणि अनेक प्रकारचीं कर्मे करून अनेक वेळ जन्मास येते एखादेवेळीं सत्वगुणानें तत्वाची गांठ पडल्यावर त्याचे वलानें प्राण्यास योगाची प्राप्ति होते मग त्या योगाची प्राप्ति झाल्यावर ( ११५ ) आठ प्रकारच्या किंवा तीन प्रकारच्या किंवा दोन प्रकारच्या किंवा एक तऱ्हेच्या आपल्या गुणांनीं कालासहीत हें संपूर्ण जग तो स्वतः यथार्थ दृष्टीनें पाहतो, [ ११६ ] मग आपल्या गुणाप्रमाणें कर्मे आरंभून तीं त्यांचा व स्वभावांचा सहवास करून देतो. त्यांचा [ गुणांचा ] नाश झाला ह्मणजे केलल्या कर्माचाही नाश होतो कर्माचा क्षय झाल्यावर तो

तत्वतः ॥ ११६ ॥ स एवादिः स्वयं योगनिमितं भोक्तृभोगयोः ॥ परस्त्रिकालादकलः स एव परमेश्वरः ॥ ११७ ॥ तं विश्वरूपमभव भवमीड्यं प्रजापतिम् ॥ देवदव जगत्पूज्यं स्वचित्तस्थमुपास्महे ॥ ११८ ॥ कालादिभिः परो यस्मात्प्रपंचः परिवर्तते ॥ धर्मावहं पापनुदं भगेशं विश्वधाम च ॥ ११९ ॥ (वृत्तं)तमीश्वराणां परमं महेश्वरं तं देवतानां मरमं च दैवतम् ॥ पतिं पतीनां परमं परस्ताद्विदाम देवं भुवनेश्वरेश्वरम् ॥ १२० ॥ न तस्य विद्यते कार्यं कारणं च न विद्यते ॥ न तत्समोऽधिकश्चापि क्वचिज्जगति दृश्यते ॥ १२१ ॥ परास्य विविधा शक्तिः

---

होऊन मोक्षास जातो. [ ११७ ] तोच परमेश्वर मूलपुरुष आहे. योगाला कारण असून भोक्ता आणि भोग्य [ कर्ता आणि करावयाचें कृत्य ] ह्याहून वेगळा आहे, हा भूत भविष्य आणि वर्तमान ह्या तिन्ही कालांहून वेगळा असून तो कलाहीन आहे, त्यालाच परमेश्वर ह्मणतात- [ ११८ ] तो विश्वरूपाचें मूलकारण आहे, त्याला भव ह्मणतात, तो पूज्य असून त्याला प्रजापति ह्मणतात. तो सर्व देवांचा मुख्य देव आहे, तो त्रैलोक्यांत सर्व प्राणिमात्रांस वंदन करण्यासारखा आहे, तो आपल्या मनांत रहातो त्यास आह्मी भजतों. ( ११९ ) कालादिकाहून वेगळा असा प्रपंच त्याच्यापासून उत्पन्न होतो. तो परमेश्वर धर्म घडण्यास कारण आहे, तो पातकांचा नाश करितो, तो ऐश्वर्याचा अधिपति आहे, तो त्रैलोक्याचें मूलस्थान [ मुख्य ठिकाण ] आहे. ( १२० ) तो सर्व ईश्वरापेक्षां मुख्य महेश्वर आहे, तो सर्व देवतांचें मुख्य दैवत आहे. तो सर्व पतींचा मुख्य पति आहे. तो सर्व त्रैलोक्यांचे अधिपतींचा मुख्य अधिपति आहे. त्यास आह्मी अगोदर ओळखतों. ( १२१ ) त्यास कोणतेंही कृत्य करावयाचें राहिलें नाहीं, त्याला कोणत्याही साधनांचें अगत्य नाहीं. ह्या त्रैलोक्यांत पाहूं लागलें तर त्याचे बरोबरीचाही कोठें मिळणार नाहीं, किंवा त्यापेक्षां ज्यास्त शक्तिमान् असाही कोणी आढळणार नाहीं. (१२२) ह्याची

श्रुतौ स्वाभाविकी श्रुता ॥ ज्ञानं बलं क्रिया चैवं याभ्यो विश्वमिदं कृतम् ॥ १२२ ॥ न तस्यास्ति पतिः कश्चिन्नैव लिङ्गं न चेशिता ॥ कारणं कारणानां च स तेषामधिपाधिपः ॥१२३॥ न चास्य जनिता कश्चिन्न च जन्म कुतश्चन ॥ न जन्महेतवस्तद्वन्मलमायादिसंज्ञकाः ॥ १२४ ॥ स एकः सर्वभूतेषु गूढो व्याप्तश्च सर्वतः ॥ सर्वभूतान्तरात्मा च धर्माध्यक्षः स कथ्यते ॥१२५॥ सर्वभूताधिवासश्च साक्षी चेता च निर्गुणः ॥ एको वशी निष्क्रियाणां बहूनां विवशात्मनाम् ॥ १२६ ॥ एकस्तु बहुधा बीजं करोति समयोचितम् ॥ तमेवात्मनि तिष्ठन्तं ये पश्यन्ति मुमुक्ष-

---

परा नावाची शक्ति फार मोठी असून ती अनेक प्रकारचीं आहे, असें वेदांत प्रसिद्ध आहे. ज्ञान, बल आणि क्रिया ह्या तिन्हींच्या साह्यानें त्यानें हें सर्व जग निर्माण केलें. ( १२३ ) त्याचा धनी कोणी नाहीं, त्याची अमुक प्रकारची खूणही नाहीं, व त्याचा प्रभुपणाही नाहीं, तो त्या कारणांचा कारण आहे, व ईश्वराचाही ईश्वर आहे. ( १२४ ) ह्याला जन्म देणारा कोणी नसून हा आजपर्यन्त कधींही कोठें जन्मास आला नाहीं, मल, माया वगैरे नांवाचे जन्ममरणाला कारण असणारे [ जन्ममरणाच्या फेऱ्यांत घालणारे ] दोष त्याला नाहींत. ( १२५ ) तो एकटा आहे, तो सर्व प्राणिमात्रांत गुप्तरीतीनें राहतो, त्याची व्याप्ति सर्वत्र आहे. तो सर्व प्राणिमात्रांचा अंतरात्मा आहे. त्याला धर्माध्यक्ष असें ह्मणतात. ( १२६ ) हा परमेश्वर सर्व प्राणिमात्रांचें राहण्याचें मुख्य ठिकाण आहे. सर्व प्राणिमात्र जीं जीं कृत्यें करितात तीं तीं सर्व ह्याला समजतात. हा सर्व जगाला नियमन करणारा असून हा निर्गुण आहे, हा एकटा असून इंद्रियनिग्रही आहे, ज्यांचीं मनें व्याकुळ झाल्यामुळें ते कोणतेंही काम करीत नाहींत अशा प्राण्यांकडून देखील हा कर्में करवितो. ( १२७ ) हा एकटा आहे तरी ज्यावेळीं जशी जरूर असेल तशीं अनेक प्रकारचीं कारणें उत्पन्न करितो, तो आत्म्यांतच राहतो, त्याचें

वः ॥ तेषामेव सुखं नित्यं नेतरेषामिहात्मनाम् ॥१२७॥ नित्या-
नामप्यसौ नित्यश्चेतनानां च चेतनः ॥ एको बहूनां चाकामः
कामानीशः प्रयच्छति ॥ १२८ ॥ सांख्ययोगाधिगम्यं तत्का-
रणं जगतः पतिम् ॥ ज्ञात्वा देवं पशुः पाशैः सर्वैरेव वि-
मुच्यते ॥ १२९ ॥ विश्वकृद्विश्ववित्स्वात्मयोनिज्ञः कालकृद्गुणी
॥ प्रधानक्षेत्रज्ञपतिर्गुणेशः पाशमोचकः ॥ ब्रह्माणं विदधे पूर्वं वे-
दांश्चोपादिशत्स्वयम् ॥ १३० ॥ यो देवस्तमहं बुध्वा स्वात्मबुद्धि-
प्रसादतः ॥ मुमुक्षुरस्मात्संसारात्प्रपद्ये शरणं शिवम् ॥ १३१ ॥
निष्कलं निष्क्रियं शान्तं निरवद्यं निरंजनम् ॥ अमृतस्य

---

दर्शन मोक्षाची इच्छा करणाऱ्या प्राण्यांस होतें, त्यामुळें वास्तविक शाश्वतपणाचें सुख त्या मुमुक्षूंसच आहे इतरांस नाहीं. ( १२८ ) जे नित्य आहेत त्या नित्यचेतन असणाऱ्या प्राण्यांचाही हा परमेश्वर चेतन आहे. हा स्वतः जरी परमेश्वर निरिच्छ आहे तरी हा अनेक प्राण्यांच्या अनेक प्रकारच्या इच्छा पुरवितो. (१२९) हा परमेश्वर सांख्यशास्त्रानें आणि योगशास्त्रानें जाणतां येण्यासारखा आहे. हा सर्व त्रैलोक्याला मूळ कारण असून हा सर्व त्रैलोक्याचा अधिपति आहे. ह्या परमेश्वराला यथार्थ रीतीनें जाणलें असतां पशूची पाशांतून मुक्तता होते. ( १३० ) हा त्रैलोक्याचा उत्पन्नकर्ता आहे, ह्याला त्रैलोक्याचें यथार्थ ज्ञान आहे, हा मोठा ज्ञानी असून हा आपलें आपण जाणतो, हा कालाला उत्पन्न करणारा असून गुणवान् आहे. प्रधान व क्षेत्रज्ञ ह्यांचा हा पति आहे, हा गुणांचा अधिपति असून पशूंची पाशांतून मुक्तता करितो. ह्यानें अगोदर ब्रह्मदेवास उत्पन्न केले व त्यास स्वतः सर्व वेद शिकविलें. ( १३१ ) जो देव आहे त्याला मी आपल्या बुद्धीच्या प्रसादानें ओळखिलें, मला ह्या संसारापासून मुक्त होण्याची इच्छा आहे ह्मणून मी त्या शंकराला शरण गेलों. ( १३२ ) तो परमात्मा कलाहीन आणि क्रियाहीन आहे, शान्त व निर्दोष असून निरंजन आहे, अमृताचा [ मोक्षाचा ] मोठा पूलच आहे व

परं सेतुं दग्धेन्धनमिवानलम् ॥ १३२ ॥ यदा चर्मवदाकाशं वेष्टयिष्यन्ति मानवाः ॥ तदा शिवमविज्ञाय दुःखस्यान्तो भविष्यति ॥ १३३ ॥ तपःप्रभावाद्देवस्य प्रसादाच्च महर्षयः ॥ अत्याश्रमोचितं ज्ञानं पवित्रं पापनाशनम् ॥ १३४ ॥ वेदान्ते परमं गुह्यं पुराकल्पप्रचोदितम् ॥ ब्रह्मणो वदनाल्लब्धं मयेदं भाग्यगौरवात् ॥ १३५ ॥ नाप्रशान्ताय दातव्यमेतज्ज्ञानमनुत्तमम् ॥ नापुत्रायासुवृत्ताय नाशिष्याय च सर्वथा ॥ १३६ ॥ यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥ तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥ १३७ ॥ (वृत्तं) अतश्च संक्षेपमिदं

---

लांकूड जळून गेल्यावर राहिलेल्या इंगळासारखा तो तेजःपुंज आहे. ( १३३ ) ज्यावेळीं मनुष्य कातड्यासारखें आकाशास गुंडाळील तेव्हां मात्र शिवाला जाणल्याखेरीज दुःखाचा शेवट होईल. जोंपर्यन्त मनुष्याला कातड्यासारखें आकाश गुंडाळतां येणार नाहीं. तोंपर्यंत शिवाला जाणल्याशिवाय दुःखाचा नाश होणार नाहीं. ( १३४ ) हे ऋषीश्वर हो, हें ज्ञान तपश्चर्येच्या सामर्थ्यानें किंवा परमेश्वराच्या कृपेनें प्राप्त होतें. हें ज्ञान अत्याश्रमी प्राण्याला अत्यंत उपयोगी असून तें पवित्र आणि पापनाश करणारें आहे. ( १३५ ) हें वेदांत शास्त्रांत वर्णिलें असून हें फार महत्वाचें आहे, हें ज्ञान पूर्वींच्या कल्पांत प्रचारांत आणलें आहे. माझें दैव चांगलें ह्मणून मला हें ब्रह्मदेवाचें तोंडून ऐकण्यास मिळालें. (१३६) हें ज्ञान जो कोणी मनुष्य शांत स्वभावाचा नसेल, ज्याला मूलबाळ कांहीं नाहीं, ज्याचें वर्तन चांगलें नसेल व जो गुरूची सेवा करीत नसेल अशाला कधींही शिकवूं नये. ( १३७ ) ज्या भाग्यशाली मनुष्याची देवावर जशी भक्ति असेल तशीच गुरूवर असेल, तर त्याचे ते सर्व मनोरथ आपोआप फलद्रूप होतील. [ त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. ] ( १३८ ) आतां ह्यासाठीं मी तुह्मांस थोडक्यांत सांगतों ऐका. शिव हा प्रकृतीपेक्षां आणि पुरुषांपेक्षांही श्रेष्ठ आहे. तो उत्पत्तीच्यावेळीं सर्व त्रैलोक्य स्वतः

श्रृणुध्वं शिवः परस्तात्प्रकृतेश्च पुंसः ॥ स सर्गकाले च करोति सर्वं संहारकाले पुनराददाति ॥ १३८ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे शैवतत्वकथनं नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

---

उत्पन्न करितो, आणि प्रळयकाळाच्यावेळीं तो सर्व जगाचा पुन्हां संहारही करितो.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवीय संहितेच्या पूर्वभागापैकीं शैवतत्वाचें वर्णन नांवाचा चवथा अध्याय संपला.



## ॥ अथ पंचमोऽध्यायः ॥

मुनय ऊचुः ॥ कालादुत्पद्यते सर्वं कालादेव विपद्यते ॥ न कालनिरपेक्षं हि क्वचित्किंचन विद्यते ॥ १ ॥ यदास्यान्तर्गतं विश्वं शश्वत्संसारमण्डलम् ॥ सर्गसंहृतिमुद्राभ्यां चक्रवत्परिवर्तते ॥ २ ॥ ब्रह्मा हरिश्च रुद्रश्च तथान्ये च सुरासुराः ॥ यत्कृतां नियतिं प्राप्य प्रभवो नातिवर्तितुम् ॥ ३ ॥ भूतभव्यभविष्याद्यैर्विभज्य जरयन्प्रजाः ॥ अतिप्रभुरिति स्वैरं वर्ततेऽतिभयङ्करः ॥ ४ ॥ क एष भगवान्कालः कस्य वा वशवर्त्ययम् ॥ क एवास्य वशे न स्यात्कथयैतद्विचक्षण ॥ ५ ॥

वायुरुवाच ॥ कलाकाष्ठानिमेषादिकलाकलितविग्रहम् ॥

---

[ १ ] मुनि ह्मणालेः—कालापासूनच [ मुळेंच ] सर्व उत्पन्न होतें व कालमुळेंच सर्व नाश पावतें. ज्या वस्तूला कालाची जरूर नाहीं अशी एकही वस्तु ह्या जगांत नाहीं. ( २ ) ह्या परमेश्वराच्या उदरांत राहणारें सर्व त्रैलोक्यरूपी संसारचक्र उत्पत्ति आणि लय ह्या नांवांनीं चाकासारखें सदोदीत फिरत असतें. ( ३ ) ब्रह्मदेव, श्रीविष्णु, रुद्र, आणि दुसरे तसेच देव दैत्य त्या परमेश्वरानें [ कालानें ] केलेली मर्यादा पाळतात, काळाची मर्यादा मोडण्याची कोणाची शक्ति नाहीं. ( ४ ) भूतकाल, भविष्यकाळ, आणि वर्तमानकाळ, ह्या रूपानें तो प्रजेस परिपक्व दशेला आणतो, तो सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे व सर्वांपेक्षां भयंकर आहे, तो स्वच्छंदपणानें वागतो. ( ५ ) हा सर्व शक्तिमान काल कोण आहे? हा कोणाच्या आज्ञेंत वागतो? किंवा ह्याचे आज्ञेंत कोण वागतो? हें सर्व आह्मांस सांग, तूं मोठा चतुर मनुष्य आहेस.

[ ६ ] वायु ह्मणालाः—ऋषीश्वरहो, कला, काष्ठा, निमेष वगैरे नांवाच्या परिमाणांनीं ज्याचें शरीर बनलें आहे ह्मणून त्यास कालात्मा असें ह्मणतात. हें महेश्वराचेंच सामर्थ्य असून तें सर्वां-

कालात्मेति समाख्यातं तेजो माहेश्वरं परम् ॥ ६ ॥ यदलंघ्यमशेषस्य स्थावरस्य चरस्य च ॥ नियोगरूपमीशस्य बलं विश्वनियामकम् ॥ ७ ॥ तस्यांशांशमयी शक्तिः कालात्मनि महात्मनि ॥ ततो निष्क्रम्य संक्रान्ता विस्फुलिङ्गेरिवायसी ॥ ८ ॥ तस्मात्कालवशे विश्वं न स विश्ववशे स्थितः ॥ शिवस्य तु वशे कालो न कालस्य वशे शिवः ॥ ९ ॥ यतोऽप्रतिहतं शार्वं तेजः काले प्रतिष्ठितम् ॥ महती तेन कालस्य मर्यादा हि दुरत्यया ॥ १० ॥ कालं प्रज्ञाविशेषेण कोऽतिवर्तितुमर्हति ॥ कालेन तु कृतं कर्म न कश्चिदतिवर्तते ॥ ११ ॥ एकच्छत्रां महीं कृत्स्नां यः पराक्रम्य शासति ॥ सोऽपि नैवातिवर्तेत

---

पेक्षां श्रेष्ठ आहे. ( ७ ) तें सामर्थ्य सर्व स्थावर जंगम विश्वाला मानावें लागतें, त्याची अवहेलना करण्याची कोणाची शक्ति नाहीं. नियोगरूप [ आज्ञा ] हेंच ईश्वराचें सामर्थ्य आहे, त्या आज्ञेंत हें सर्व जग वागतें. ( ८ ) त्या परमेश्वराच्या अंशाच्या अंशाची ( प्रतिअंशाची ) शक्ति त्या परमेश्वरांतून निघून अग्नींत तापविलेल्या लोखंडांत जशी अग्नीच्या उष्णतेची शक्ति शिरते त्याप्रमाणेंच त्या महात्म्या कालामध्यें शिरली आहे. ( ९ ) ह्यासाठीं हें सर्व जग काळाच्या आज्ञेंत वागतें, तसा तो [ काळ ] सर्व जगाच्या आज्ञेंत वागत नाहीं. तो कालही शिवाच्या आज्ञेंत आहे, शिव हा काळाच्या आज्ञेंत नाहीं. ( १० ) ज्या अर्थी शंकराचें अलौकिक सामर्थ्य असणारें तेज काळांत राहतें त्यामुळें काळाची मर्यादा फार मोठी आहे, ती कोणासच चुकवितां येत नाहीं. ( ११ ) कोणीही प्राणी आपल्या बुद्धिसामर्थ्यानें काळाची अवज्ञा करण्यास धजणार नाहीं. काळानें जें कांहीं काम केलें तें पुन्हां कधीं फिरावयाचें नाहीं. ( १२ ) जो कोणी एखादा सार्वभौम राजा आपल्या सामर्थ्यानें सर्व पृथ्वी जिंकून तिजवर राज्य करितो तो देखील समुद्र जशी मर्यादा [ आपली हद्द ] सोडू शकत नाहीं तसा तो राजा देखील

कालं वेलामिवोदधिः ॥ १२ ॥ ये निगृह्येन्द्रियग्रामं जयन्ति सकलं जगत् ॥ न जयन्त्यपि ते कालं कालो जयति तानपि ॥ १३ ॥ आयुर्वेदविदो वैद्यास्त्वनुष्ठितरसायनाः ॥ न मृत्युमतिवर्तन्ते कालो हि दुरतिक्रमः ॥ १४॥ श्रिया रूपेण शीलेन बलेन सकलेन च ॥ अन्यच्चिन्तयते जन्तुः कालोऽन्यत्कुरुते बलात् ॥ १५ ॥ अप्रियेश्च प्रियैश्चैव अचिन्तितगमागमैः ॥ संयोजयति भूतानि वियोजयति चेश्वरः ॥ १६ ॥ यदैव दुःखितः कश्चित्तदैव सुखितः परः ॥ दुर्विज्ञेयस्वभावस्य कालस्याहो विचित्रता ॥ १७ ॥ यो युवा स भवेद्वृद्धो यो बलीयान्स

---

काळाची मर्यादा मोडूं शकत नाहीं. काळाच्या आज्ञेंत त्याला रहावेंच लागतें. ( १३ ) जे कोणी इंद्रिय निग्रह करणारे लोक, आपल्या इंद्रियांचा समुदाय आपले स्वाधीन असल्यामुळें त्याच्या जोरावर सर्व जग जिंकतात, तरी ते काळाला जिंकूं शकत नाहींत काळ मात्र त्यांना जिंकतो. ( १४ ) वैद्यशास्त्र चांगल्यारीतीनें शिकलेले वैद्य लोक पाहिजे तसलीं रसायनें तयार करोत, परंतु त्यांचे हातून मृत्यु चुकला असें होत नाहीं कां तर, काळ हा कधींच कोणास चुकत नाहीं. ( १५ ) प्राणी आपल्या संपत्तीच्या जोरावर, रूपाच्या भरावर, सद्वर्तनाच्या सामर्थ्यावर, शक्तीच्या जोरावर किंवा आणखी कांहीं गोष्टींच्या अनुकूलतेमुळें मनामध्यें एक विचार करीत असतो आणि काळ आपल्या जोरावर दुसरेंच कांहीं करितो. ( १६ ) हा परमेश्वर प्राणिमात्रांला सुखें दुःखें व अकस्मात होणाऱ्या बऱ्या वाईट गोष्टी घडवून आणून क्षणांत त्यांस घोंटाळ्यांत पाडतो व त्यांतून मोकळेंही करितो. ( १७ ) ज्या एखादेवेळीं कोणी एखादा प्राणी दुःखांत असतो त्यावेळीं दुसरा कोणी सुखांत असतो, हा काळाचा स्वभाव कळणें फारच कठीण आहे. काळ हा विचित्र आहे. ( १८ ) जो तरुण असतो तो म्हातारा होतो. जो बलवान् असतो तो अ-

दुर्बलः ॥ यः श्रीमान्सोऽपि निःश्रीकश्चित्रः कालविपर्ययः ॥ १८ ॥ नाभिजात्यं न वै शीलं न बलं न च नैपुणम् ॥ भवेत्कार्याय पर्याप्तं कालश्चेत्प्रतिरोधकः ॥ १९ ॥ ये च निष्परुषैस्तूर्यैर्गीतवाद्यैरुपास्थिताः ॥ ये चानाथाः परान्नादाः कालस्तेषु समक्रियः ॥२०॥ वृत्तं ॥ फलन्त्यकाले न रसायनानि सम्यक्प्रयुक्तान्यपि चौषधानि ॥ तान्येव कालेन समाहृतानि सिद्धिं प्रयान्त्याशु सुखं दिशन्ति ॥ २१ ॥ नाकालतोऽयं म्रियते जायते वा नाकालतः पुष्टिमग्र्यामुपैति ॥ नाकालतः सुखितं दुःखितं वा नाकालिकं वस्तु समस्ति किंचित् ॥ २२ ॥ कालेन शीतः प्रतिवाति वातः कालेन वृष्टिर्जलदानुपैति ॥ का-

---

शक्त होतो, जो श्रीमान् आहे तो गरीब होतो, सारांश, कालगति फार विचित्र आहे. ( १९ ) काळ जर मनुष्यास प्रतिकूल असेल तर त्याची भरभराट उत्तम वंशाच्यानें करवत नाहीं, सद्वर्तन करूं शकत नाहीं, सद्वर्तनाची जरूर नाहीं, शक्तीचा उपयोग होत नाहीं किंवा शहाणपणाचीही मात्रा चालत नाहीं. ( २० ) जे कोणी सुखी लोक मधुर मधुर बेंडबाजाचे शब्द व गाणें वाजविणें ऐकून सुखानें दिवस घालतात, आणि जे कोणी गरीब निराश्रित लोक पोटासाठीं दारोदार भिक्षा मागतात त्या दोघांवरही कालाचा अम्मल सारखा चालतो. काळाला कोणी कमजास्त नाहीं. ( २१ ) काळ अनुकूल नसतांना भलत्याचवेळीं उत्तम रसायन तयार करून किंवा औषधें तयार करून रोग्यास दिलीं तर त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं, तींच रसायनें किंवा औषधें योग्यवेळीं [ काळ अनुकूल असतां ] दिलीं तर त्यांचा चांगला उपयोग होऊन त्यांपासून सुख लागतें. ( २२ ) प्राणी हा काळ आल्याखेरीज मरत नाहीं, काळ आल्याखेरीज जन्मत नाहीं किंवा काळ आल्याखेरीज चांगला पुष्टही होत नाहीं, काळ आल्याखेरीज कोणास सुख होत नाहीं किंवा काळ आल्याखेरीज कोणास दुःखही होत नाहीं. सारांश, भलत्यावेळीं

लेन सस्यानि भवन्ति तस्मात्कालेन संजीवति जीवलोकः ॥ २३ ॥ इत्थं कालात्मनस्तत्वं यो विजानाति तत्वतः ॥ कालात्मानमतिक्रम्य कालातीतं स पश्यति ॥ २४ ॥ वृत्तं ॥ नयस्य कालो न च बन्धमुक्ती न यः पुमान्न प्रकृतिर्न विश्वम् ॥ विचित्ररूपाय शिवाय तस्मै नमः परस्मै परमेश्वराय ॥ २५ ॥ इति श्री शिवमहापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागेपंचमोध्यायः ॥ ५ ॥

---

उत्पन्न होणारी वस्तुच जगांत नाहीं. सर्व कांहीं कालानुसार होतें. ( २३ ) काळ आला ह्मणजे वारा थंडगार वाहूं लागतो पुन्हां पावसाळ्याच्या दिवसांत पाऊस ढगांतून पडतो. काळामुळेंच धान्यें पिकतात. सारांश, प्राणिमात्र काळामुळेंच उपजीवन पावतात. ( २४ ) ह्याप्रमाणें कालस्वरूपाचें तत्व जो कोणी यथार्थरीतीनें जाणतो तो काळाचें अतिक्रमण करून काळाच्या पलीकडे असणाऱ्या परमेश्वरास पाहतो [ त्यास परमेश्वराचें दर्शन होतें. ] ( २५ ) त्या श्रीशंकराला काळाचें भय नाहीं, त्याला बंध नाहीं आणि मोक्षही नाहीं, तो पुरुष नव्हे, प्रकृति नव्हे आणि विश्वही नव्हे, त्या परमेश्वराचें रूप विचित्र प्रकारचें आहे त्या श्रेष्ठ शिवाला नमस्कार असो.

ह्याप्रमाणें शिवमहापुराणांतील वायवीय संहितेच्या पूर्वभागापैकीं पांचवा अध्याय संपला.

---

## ॥ अथ षष्ठोऽध्यायः ॥

---

ऋषय ऊचुः ॥ केन मानेन कालेऽस्मिन्नायुःसंख्या प्रकल्प्यते ॥ संख्यारूपस्य कालस्य कः पुनः परमोऽवधिः ॥१॥

वायुरुवाच ॥ आयुषोऽत्र निमेषाख्यमाद्यमानं प्रचक्षते ॥ संख्यामयस्य कालस्य शांत्यतीतकलावधिः ॥ २ ॥ अक्षिपक्ष्मपरिक्षेपो निमेषः परिकीर्तितः ॥ तादृशानां निमेषाणां काष्ठा दश च पंच च ॥ ३ ॥ काष्ठा त्रिंशत्कला नाम कला त्रिंशन्मुहूर्तकम् ॥ मुहूर्तानामपि त्रिंशदहोरात्रं प्रचक्षते ॥ ४ ॥ त्रिंशत्संख्यैरहोरात्रैर्मासः पक्षद्वयात्मकः ॥

---

(१) ऋषि ह्मणाले —वायो, ह्या कालांत आयुष्याची संख्या कोणत्या प्रमाणानें मानतात ? हा काल संख्यास्वरूप आहे ह्याची पुन्हां आणखी अगदीं शेवटची मर्यादा कोणती ? तें आह्मांस सांग.

(२)वायु ह्मणालाः— ह्या कालांत आयुष्याचें अगदीं कमीत कमी मान [ पहिलें मान ] निमेष हा मानला आहे, हा काल संख्यास्वरूप आहे ह्याची अवधि [ शेवट, मर्यादा ] शान्त्यतीत कला ही मानली आहे. ( ३ ) डोळ्याच्या पापण्या एकमेकास लागून उघडण्यास जितका वेळ लागतो त्या वेळेस निमेष ह्मणतात. त्या निमेषा इतका काळ पंधरा वेळ गेला ह्मणजे त्यास काष्ठा ह्मणतात. ( ४ ) अशा तीन काष्ठा झाल्या ह्मणजे कला होते, कला तीस झाल्या ह्मणजे एक मुहूर्त होतो. असे मुहूर्त तीस झाले ह्मणजे त्यास दिवसरात्र ह्मणतात. ( ५ ) असे दिवसरात्र मिळून तीस वेळ झाले ह्मणजे त्यास महिना ह्मणतात, त्या महिन्यांत दोन पक्ष असतात. हा महिना ह्मणजे पितरांचा

ज्ञेयः पित्र्यमहोरात्रं मासः कृष्णसितात्मकः ॥ ५ ॥ मासै-स्तैरयनं षड्भिर्वर्षं द्वेचाऽयने मते ॥ लौकिकेनैव मानेन अब्दो यो मानुषः स्मृतः ॥ ६ ॥ एतद्दिव्यमहोरात्रमिति शास्त्रस्य निश्चयः ॥ दक्षिणं चाऽयनं रात्रिस्तथोदगयनं दिनम् ॥ ७ ॥ मासस्त्रिंशदहोरात्रैर्दिव्यो मानुषवत्स्मृतः ॥ संवत्सरोपि देवानां मासैर्द्वादशभिस्तथा ॥ ८ ॥ त्रीणि वर्षशतान्येव षष्टिवर्षयु-तान्यपि ॥ दिव्यसंवत्सरो ज्ञेयो मानुषेण प्रकीर्तितः ॥ ९ ॥ दिव्येनैव प्रमाणेन युगसंख्या प्रवर्तते ॥ चत्वारि भारते वर्षे युगानि कवयो विदुः ॥ १० ॥ पूर्वं कृतयुगं नाम ततस्त्रेता विधीयते ॥ द्वापरं च कलिश्चैव युगान्येतानि कृत्स्नशः ॥ ११ ॥

---

रात्रंदिवस होय. शुक्लपक्ष ती पितरांची रात्रि असून वद्यपक्ष हा पितराचा दिवस होय. ( ६ ) असे सहा महिने झाले ह्मणजे एक अयन होतें, अशीं दोन अयनें लोटलीं ह्मणजे त्या काळाला वर्ष ह्मणतात, ह्या लोकरूढींत असलेल्या प्रमाणावरून जितका काळ गणला जातो त्या काळाला मनुष्यांचें वर्ष असें ह्मणतात. (७) हें मानुषवर्ष ह्मणजे देवांचा एक दिवस व एक रात्रि इतका काळ होतो, असा शास्त्राचा सिद्धान्त आहे. दक्षिणायन हें देवांची रात्र असून उदगयन हें देवांचा दिवस आहे. ( ८ ) मनुष्यांच्या महिन्याप्रमाणेंच तीस दिवस व तीस रात्रि लोटल्या ह्मणजे देवांचा महिना होतो. तसेंच देवांचें वर्षही बारा महिने झाले ह्मणजे होतें. ( ९ ) ह्याप्रमाणानें मनुष्याचीं तीनशे साठ वर्षें झालीं ह्मणजे देवाचें एक वर्ष होतें. ( १० ) देवांच्या ह्या दिवस मं-हिना व वर्ष ह्या प्रमाणांवरूनच युगांची संख्या चालू होते. ह्या भारत वर्षांत चार युगें विद्वानांनीं मानलेलीं आहेत. ( ११ ) पहिल्या युगाचें नांव कृतयुग, त्यानंतर त्रेतायुग चालू होतें. त्यानंतर द्वापर आणि शेवटचें युग तें कलियुग अशीं चार युगें सर्व मिळून आहेत. ( १२ ) देवांचीं चार हजार वर्षें होईपर्यंत

चत्वारि तु सहस्राणि वर्षाणां तत्कृतं युगम् ॥ तस्य तावच्छती संध्या संध्यांशश्च तथाविधः ॥ १२ ॥ इतरेषु ससंध्येषु ससंध्यांशेषु च त्रिषु ॥ एकापायेन वर्तंते सहस्राणि शतानि च ॥ १३ ॥ एतद्द्वादशसाहस्रं साधिकं च चतुर्युगम् ॥ चतुर्युगसहस्रं यत्सकल्प इति कथ्यते ॥ १४ ॥ चतुर्युगैकसप्तत्या मनोरंतरमुच्यते ॥ कल्पे चतुर्दशैकस्मिन्मनूनां परिवृत्तयः ॥ १५ ॥ एतेनक्रमयोगेन कल्पमन्वंतराणि च ॥ सप्रजानि व्यतीतानि शतशोऽथ सहस्रशः ॥ १६ ॥ अज्ञेयत्वाच्च सर्वेषामसंख्येयतया पुनः ॥ शक्यो नैवाऽऽनुपूर्व्याद्वै तेषां वक्तुं सुविस्तरः ॥ १७ ॥ कल्पो नाम दिवा प्रोक्तो ब्रह्मणोऽव्यक्तजन्मनः ॥ कल्पानां वै सहस्रं च ब्राम्हं वर्ष

---

जो काळ होतो तितके दिवस कृतयुग असतें, त्या कृतयुगाचा संध्याकाल चारशे वर्षें असून संध्यांशाचा कालही चारशे वर्षांचा आहे. (१२) त्रेता, द्वापर आणि कली ही बाकीचीं तीन युगें अनुक्रमानें तीन हजार, दोन हजार आणि एक हजार देवांचीं वर्षें इतक्या काळाचीं असतात, त्यांचे संध्याकाल आणि संध्यांशकाल हेही अनुक्रमानें तीनशें दोनशें आणि शंभर वर्षें मानलें आहेत. (१४) ह्याप्रमाणें हीं चार युगें ह्मटलीं तर देवांच्या बारा हजार वर्षांपेक्षां कांहीं थोडा जास्त इतका काळ होतो, चार युगें हजारवेळ गेलीं ह्मणजे जो कांहीं काळ होतो, त्यास कल्प ह्मणतात. (१५) चार युगें सत्तरवेळ गेलीं ह्मणजे त्या काळाला मन्वन्तर ह्मणतात, एका कल्पांत अशीं चवदा मन्वन्तरें होतात. (१६) ह्या प्रमाणानें आजपर्यंत कल्प आणि मन्वन्तरें त्यांतील प्रजेसहित शेंकडो हजारों होऊन गेलीं. (१७) त्यांची माहिती देखील नाहीं, त्यांची संख्याही अमर्याद असल्यानें त्यांचा विस्तार मुळापासून क्रमानें शेवटपर्यंत सांगणें मुळींच शक्य नाहीं. (१८) ज्याचें जन्म कधीं झालें हें सांगतां येत नाहीं अशा ब्रह्मदेवाचा कल्प हा एक दिवस मानला आहे, असे हजार कल्प

मिहोच्यते ॥ १८ ॥ वर्षाणामष्टसाहस्रं यच्च तद्ब्रह्मणो युगम् ॥ सवनं युगसाहस्रं ब्रह्मणः पद्मजन्मनः ॥ १९ ॥ सवनानां सहस्रं च त्रिगुणं त्रिवृतं तथा ॥ कल्प्यते सकलः कालो ब्रह्मणः परमेष्ठिनः ॥ २० ॥ तस्य वै दिवसे यांति चतुर्दश पुरंदराः ॥ शतानि मासे चत्वारि विंशत्या सहितानि च ॥ २१ ॥ अब्दे पंचसहस्राणि चत्वारिंशद्युतानि च ॥ चत्वारिंशत्सहस्राणि पंचलक्षाणि चाऽऽयुषि ॥ २२॥ ब्रह्मा विष्णोर्दिने चैको विष्णूरुद्रदिने तथा ॥ ईश्वरस्य दिने रुद्रः सदाख्यस्य तथेश्वरः ॥ २३ ॥ साक्षाच्छिवस्य तत्संख्यस्तथा सोपि सदाशिवः ॥ चत्वारिंशत्सहस्राणि पंचलक्षाणि चाऽऽयुषि ॥ २४ ॥ तस्मिन्साक्षाच्छि

---

झाले ह्मणजे ब्रह्मदेवाचें एक वर्ष होतें त्यास ब्राह्मवर्ष असें ह्मणतात. ( १९ ) आठ हजार वर्षें गेलीं ह्मणजे ब्रह्मदेवाचें तें युग होतें, त्या कमलापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवाचीं हजार युगें लोटलीं ह्मणजे त्या काळास सवन ह्मणतात. ( २० ) अशीं हजार सवनें तीनवेळ तिप्पट लोटलीं ह्मणजे त्या परमेष्ठी ब्रह्मदेवाचा पूर्ण काळ झाला. ब्रह्मदेवाचें आयुष्य नऊ हजार सवन इतक्या काळाचें आहे. ( २१ ) ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चवदा इंद्र होऊन जातात. एका महिन्यांत एकशेवीस इंद्र होतात. ( २२ ) एका वर्षांत पांचशे चाळीस इंद्र होतात व ब्रह्मदेवाच्या सर्व आयुष्यांत पांच लक्ष चाळीस हजार इंद्र होतात. ( २३ ) विष्णूच्या एका दिवशीं ब्रह्मदेव सर्व आयुष्याचा काळ रुद्राच्या एका दिवशीं विष्णूच्या सर्व आयुष्याचा काळ होतो ईश्वराच्या एका दिवशीं रुद्राचा सर्व काळ होऊन जातो, तसाच सत् हें नांव धारण करणाऱ्या परमेश्वराच्या दिवशीं एका सदाशिवाच्या ईश्वराचा सर्व काळ लोटतो. ( २४ ) साक्षात् शिवाच्या एका दिवशीं त्या सदाशिवाचा सर्व काळ लोटला जातो. साक्षात् शिवाच्या सर्व आयुष्यांत पांच लक्ष चाळीस हजार सदाशिव होऊन जातात. ( २५ ) त्यावेळीं तरी साक्षात् शिवासहित हा

वेनैष कालात्मा संप्रवर्तते ॥ यत्तत्स्रष्टेः समाख्यातं कालांतरमिह द्विजाः ॥ २५ ॥ एतत्कालांतरं ज्ञेयमहर्वै पारमेश्वरम् ॥ रात्रिश्च तावती ज्ञेया परमेशस्य कृत्स्नशः ॥ २६ ॥ अहस्तस्य तु या सृष्टीरात्रिश्च प्रलयः स्मृतः ॥ अहर्न विद्यते तस्य न रात्रिरिति धारयेत् ॥ २७ ॥ एषोपचारः क्रियत लोकानां हितकाम्यया ॥ प्रजाः प्रजानां पतयो मूर्तयश्च सुरासुराः ॥ २८ ॥ इंद्रियाणींद्रियार्थाश्च महाभूतानि पंच च ॥ तन्मात्राण्यथ भूतादिर्बुद्धिश्च सह दैवतैः ॥ २९ ॥ अहस्तिष्ठंति सर्वाणि परमेशस्य धीमतः ॥ अहरन्ते प्रलीयन्ते रात्र्यन्ते विश्वसम्भवः ॥ ३० ॥ वृत्तं ॥ यो विश्वात्मा कर्मकालस्वभावाद्यर्थे शक्तिर्यस्य नोल्लङ्घनीया ॥ यस्यै-

---

कालरूपी आत्मा राहतो. ब्राह्मणहो, कालान्तर कशाला ह्मणतात तें सर्व मीं तुह्माला सांगितलें. ( २६ ) हें कालांतर ह्मणजे परमेश्वराचा एक दिवस होतो, त्या परमेश्वराची एक रात्रही इतक्याच प्रमाणाची आहे. ( २७ ) जेव्हां ही सर्व सृष्टि उत्पन्न होते तो परमेश्वराचा दिवस समजावा, जेव्हां ह्या सृष्टीचा संहार होतो तेव्हां परमेश्वराची रात्र असते, त्या परमेश्वराला वास्तविक पाहतां दिवसही नाहीं आणि रात्रही नाहीं. ( २८ ) हा जो कालाचा नियम त्यानें लाऊन दिला आहे तो फक्त लोकांचें कल्याण करावयासाठीं लाऊन दिला आहे. प्रजा, राजे, देव आणि दैत्य हे सर्व परमेश्वराचींच रूपें आहेत ( २९ ) हीं इंद्रियें, हे इंद्रियाचे विषय, हीं पंचमहाभूतें, ते पंचतन्मात्र प्राणिमात्र, बुद्धि वगैरे सर्व आपापल्या देवतांसहित ( ३० ) त्या बुद्धिमान् परमेश्वराचा दिवस असतांना मात्र राहतात, दिवस मावळल्याबरोबर नाश पावतात. पुन्हां रात्र संपल्याबरोबर सृष्टीची उत्पत्ति होऊं लागते. ( ३१ ) जो परमेश्वर कर्म, काल आणि स्वभाव ह्या मुळें आपल्या अनुभवास येतो, ज्याची शक्ति अतिक्रमण करितां येत नाहीं. ज्याच्या

वाज्ञाधीनमेतत्समस्तं नमस्तस्मै महते शङ्कराय ॥ ३१ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे ब्रह्माद्यायुर्मानकथनं नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

---

आज्ञेमध्यें हें सर्व जग वागतें त्या श्रेष्ठ शंकराला नमस्कार असो.

ह्याप्रमाणें शैवनावाच्या महापुराणांतील वायवीय संहितेच्या पूर्वभागापैकीं ब्रह्मदेव वगैरेच्या आयुष्याच्या प्रमाणाचें वर्णन नांवाचा सहावा अध्याय समाप्त



## ॥ अथ सप्तमोऽध्यायः ॥

मुनय ऊचुः ॥ कथं जगदिदं कृत्स्नं विधाय च नि-
धाय च ॥ आज्ञया परमां क्रीडां करोति परमेश्वरः ॥ १ ॥
किं तत्प्रथमसम्भूतं केनेदमखिलं ततम् ॥ केन वा पुनरेवेदं
ग्रस्यते पृथुकुक्षिणा ॥ २ ॥

वायुरुवाच ॥ शक्तिः प्रथमसम्भूता शान्त्यतीतपदोत्त-
रा ॥ ततो माया ततोऽव्यक्तं शिवाच्छक्तिमतः प्रभोः ॥ ३ ॥
शान्त्यतीतपदं शक्तेस्ततः शान्तिपदक्रमात् ॥ ततो विद्या-
पदं तस्मात्प्रतिष्ठापदसम्भवः ॥ ४ ॥ निवृत्तिपदमुत्पन्नं प्रति-
ष्ठापदतः क्रमात् ॥ एवमुक्ता समासेन सृष्टिरीश्वरचोदिता ॥५॥

---

( १ ) मुनि ह्मणालेः— वायो, हा परमात्मा आपले आ-
ज्ञेप्रमाणें हें सर्व त्रैलोक्य उत्पन्न कसें करितो ? त्याचें रक्षण कसें
करितो ? आणि ह्या सर्व गोष्टी आपण स्वतः करीत असून स्व-
च्छंदपणानें क्रीडा कशी करितो तें आह्मांस सांग. ( २ ) हें जग
आपोआपच प्रथम उत्पन्न झालें ? किंवा ह्याला कोणीं उत्पन्न क-
रून ह्याचा चोहोंकडे विस्तार केला ? आणि पुनः ह्या सर्व विश्वास
मोठें थोरलें पोट असणारा कोण भक्षण तरी करितो ? हें आह्मां-
स सांग.

( ३ ) वायु ह्मणालाः—ऋषीश्वरहो, त्या परमशक्तिमान्
शिवापासून प्रथम शक्ति उत्पन्न झाली, तिचें नांव शान्त्यतीतपदा
असें होतें, त्यापासून माया झाली व मायेपासून अव्यक्त झालें.
( ४ ] शक्तीपासून शांत्यतीतपद झालें, त्यानंतर शांतिपद झालें,
शांतिपदापासून विद्यापद झालें आणि विद्यापदापासून प्रतिष्ठापद
झालें. ( ५ ) प्रतिष्ठापदापासून निवृत्तिपद उत्पन्न झालें. अशा
तऱ्हेनें क्रमाक्रमानें ईश्वरानें उत्पन्न केलेलीं सृष्टि मीं तुह्मांस थोड-

आनुलोम्यात्तथैतेषां प्रातिलोम्येन संहृतिः ॥ अस्मात्पञ्चपदोद्दिष्टानस्रष्ट्यन्तरमिष्यते ॥ ६ ॥ कलाभिः पंचभिर्व्याप्तं यस्माद्विश्वमिदं जगत् ॥ अव्यक्तं कारणं यत्तदात्मनासमधिष्ठितम् ॥ ७ ॥ महदादिविशेषान्तं सृजतीत्यपि सम्मतम् ॥ किन्तु तत्रापि कर्त्तृत्वं नाव्यक्तस्य न चात्मनः ॥८॥ अचेतनत्वात्प्रकृतेरज्ञत्वात्पुरुषस्य च ॥ प्रधानपरमाण्वादि यावत्किंञ्चिदचेतनम् ॥ ९ ॥ न तत्कर्त्तृ स्वयं दृष्टं बुद्धिमत्कारणं विना ॥ जगच्च कर्त्तृसापेक्षं कार्यं सावयवं यतः ॥ १० ॥

---

क्यांत सांगितली. ( ६ ) आनुलोम्यानें [ सरळपणानें ] त्या सृष्टीची उत्पत्ति होते आणि प्रातिलोम्यानें [ पुनः माघारे वळल्यानें ] त्या जगाचा संहार होतो ह्यामुळें ही सृष्टी वरील पांच पदापासून उत्पन्न होते त्याखेरीज दुसरें सृष्टि उत्पन्न होण्याचें साधन [ दुसरी सृष्टि ] दिसत नाहीं. क्रमाक्रमानें ज्या ज्या तत्वापासून जे जें तत्व उत्पन्न होतें तें तें त्या त्या तत्वामध्यें पुनः लय पावतें. ( ७ ) ह्यामुळें हें सर्व जग पांच कलांनीं व्यापिलेलें आहे. अव्यक्त [ गूढ ] जें कारण आहे तें आत्म्याबरोबर राहतें. ( ८ ) महत्तत्वापासून विशेषतत्वापर्यंत तें कारण सर्व सृष्टीस उत्पन्न करितें हेंही मान्यच आहे. तरीपण त्यांतही अव्यक्ताला आणि आत्म्याला कर्तृपणा नाहीं. ( ९ ) कारण प्रकृति ही निर्जीव असून पुरुष हा अज्ञान आहे. प्रधान परमाणु वगैरे जितकें कांहीं आहे तितकें सर्व अचेतन ( निर्जीव ) आहे. ( १० ) त्याला बुद्धिमान् असा कोणी तरी सहाय झाल्याखेरीज तें कर्तृ झालेलें दिसत नाहीं, त्या पुरुषाला आणि प्रकृतीला दुसऱ्या कोणातरी बुद्धिमान् परमेश्वराचा आश्रय असल्याखेरीज त्यांकडून कोणतेंही कार्य होत नाहीं, हें जगत् उत्पन्न होण्यास कोणातरी कर्त्याची जरूर लागलेली आहे, कर्त्याखेरीज उत्पन्न झालें नाहीं. कांतर कार्य हें अवयवासहित आहे.

तस्माच्छक्तः स्वतन्त्रो यः सर्वशक्तिश्च सर्ववित् ॥ अनादि-
निधनश्चायं महदैश्वर्यसंयुतः ॥ ११ ॥ स एव जगतः कर्ता
महादेवो महेश्वरः ॥ परिणामः प्रधानस्य प्रवृत्तिः पुरुषस्य
च ॥ सर्वं सत्यव्रतस्यैव शासनेन प्रवर्तते ॥ १२ ॥ इतीयं
शाश्वती निष्ठा सतां मनसि वर्तते ॥ न चैनं पक्षमाश्रित्य
वर्तते स्वल्पचेतनः ॥ १३ ॥ यावदादिसमारम्भो यावच्च प्र-
लयो महान् ॥ तावद्स्येति सकलं ब्रह्मणः शरदां शतम्
॥ १४ ॥ परमित्यायुषो नाम ब्रह्मणोऽव्यक्तजन्मनः ॥ यत्प-
राख्यं तदर्द्धंच परार्द्धमभिधीयते ॥ १५ ॥ परार्द्धद्वयकाला-

---

( ११ ) ह्यासाठीं ह्या प्रकृति आणि पुरुषाहून निराळा कोणीतरी शक्तिमान् आहे, तो स्वतंत्र, सर्वांहून बळकट आणि सर्व प्रकारचें ज्ञान असणारा असा आहे, त्याला जन्म नाहीं व मरणही नाहीं, त्याचें ऐश्वर्य मोठें आहे. ( १२ ) तोच ह्या सर्व जगाचा कर्ता होय. त्याला महादेव किंवा महेश्वर असेंही ह्मणतात. तोच प-रमेश्वर प्रधानाचा परिणाम असून पुरुषाची प्रवृत्ति आहे. तो मोठा सत्यावर विश्वास ठेवणारा आहे, त्याच्या आज्ञेनेंच हें सर्व कांहीं होत आहे. ( १३ ) अशा रीतीचा दृढनिश्चय सज्जनांच्या मनांत नेहमीं वागत असतो. अल्पज्ञानी मनुष्य हें ह्मणणें मान्य करून तसें आपलें वर्तन ठेवीत नाहीं. ( १४ ) जेव्हांपासून सृष्टि उत्पन्न होऊं लागते व ती उत्पन्न झालेली सर्व पृथ्वी मोठा प्रलय होऊन तिचा मागमूस देखील रहात नाहीं तेथपर्यंत ब्रह्म-देवाच्या आयुष्याचीं शंभर वर्षें पूर्णपणें भरतात. ( १५ ) ज्याचें जन्म कधीं झालें हें मुळींच समजत नाहीं त्या ब्रह्मदेवाच्या आयु-ष्याला पर असें ह्मणतात, त्यावरून त्याला पर ह्मणतात त्या पराचा अर्ध तो परार्ध असें संख्येचें शेवटचें प्रमाण झालें आहे. ( १६ ) दोन परार्ध काळ लोटल्यावर प्रळयकाळ आला अस-

न्ते प्रलये समुपस्थिते ॥ अव्यक्तमात्मनः कार्यमादायात्मनि तिष्ठति ॥ १६ ॥ आत्मन्यवस्थितेऽव्यक्ते विकारे प्रतिसंहृते साधर्म्येणाधितिष्ठेते प्रधानपुरुषावुभौ ॥ १७ ॥ तमःसत्वगुणावेतौ समत्वेन व्यवस्थितौ ॥ अनुद्रिक्तावनूनौ तावोतप्रोतौ परस्परम् ॥ १८ ॥ गुणसाम्ये तदा तस्मिन्नविभागे तमोदये ॥ शान्तवातैकनीरे च न प्राज्ञायत किंचन ॥ १९ ॥ अप्रज्ञाते जगत्यस्मिन्नेक एव महेश्वरः ॥ उपास्य रजनीं कृत्स्नां परो माहेश्वरीं ततः ॥ २० ॥ प्रभातायान्तु शर्वर्यां प्रधानपुरुषावुभौ ॥ प्रविश्य क्षोभयामास मायायोगान्महेश्वरः ॥ २१ ॥ ततः पुनरशेषाणां भूतानां प्रभवाप्ययात् ॥

---

तांना अव्यक्त आपलें कार्य [ सृष्टि वगैरे कृत्य ] घउन आत्म्यांत राहतें. ( १७ ) अव्यक्त आत्म्यांत राहिलें असतां व विकार [ सृष्टि उत्पन्न करणें वगैरे कृत्य ] बंद पडलें असतां ते प्रधान आणि पुरुष दोघेही सारखेपणानें राहतात. ( १८ ) त्यांचा सत्व गुण आणि तामसगुण असतो. ते अगदीं सारखेपणानें राहतात. ते कोणत्याही प्रकारची गडबड करीत नाहींत. ते एकमेकापेक्षां मुळींच कमी नसतात ते दोघे अगदीं पूर्णपणानें भरलेले असतात. ( १९ ) त्यावेळीं त्या गुणाच्या सारखेपणामुळें त्याचा विभाग करितां येत नाहीं, त्यावेळीं तमोगुणाची वाढ जास्त असते, त्यावेळीं वाराही मुळींच वाहत नाहीं जिकडे तिकडे पाणीचपाणी पसरलेलें दिसतें. त्यावेळीं कांहीं एक समजत नाहीं. ( २० ) अशी अज्ञानदशा आल्यावेळीं ह्या जगांत हा श्रेष्ठ महेश्वर माहेश्वरी सर्व रात्रीचा अनुभव घेत एकटा राहतो. ( २१ ) ती रात्र उजाडल्यावर हा महेश्वर मायेच्या सामर्थ्यानें त्या प्रधानांत आणि पुरुषांत शिरून दोघांसही खवळून सोडतो. ( २२ ) त्यामुळें पुनः सर्व प्राणिमात्रांची सृष्टि आणि संहार हीं कृत्यें सुरूं होतात. ह्याप्रमाणें परमेश्वराच्या आज्ञेनें अव्यक्तापासून ही सर्व सृष्टि झाली.

अव्यक्तादभवत्सृष्टिराज्ञया परमेष्ठिनः ॥ २२ ॥ वृत्तं ॥ विश्वो-
त्तरोत्तरविचित्रमनोरथस्य यस्यैकशक्तिशकले सकलः समाप्तः ॥
आत्मानमध्वपतिमध्वविदो वदन्ति तस्मै नमः सकललोकवि-
लक्षणाय ॥ २३ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

---

(२३) ज्या परमेश्वराचे विचार लोकांच्या विचारांपेक्षां फारच विलक्षण आहेत, ज्याच्या शक्तीच्या एका अगदीं लहानशा भागांत हें सर्व विश्व समावेश पावतें (राहतें) ज्या परमेश्वराला सन्मार्ग जाणणारे लोक आत्मा आणि अध्वपति असें ह्मणतात त्या सर्व लोकांहून अलौकिक शक्ति असणाऱ्या परमेश्वराला माझा नमस्कार असो.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेच्या पूर्वभागापैकीं सातवा अध्याय संपला.

---

## अथ अष्टमोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ पुरुषाधिष्ठितात्पूर्वमव्यक्तादीश्वराज्ञया ॥ बुद्ध्यादयो विशेषान्ता विकाराश्चाभवन्क्रमात् ॥ १ ॥ ततस्तेभ्यो विकारेभ्यो रुद्रो विष्णुः पितामहः ॥ जगतः कारणत्वेन त्रयो देवा विजज्ञिरे ॥ २ ॥ सर्वतो भुवनव्याप्तिशक्तिमव्याहतां क्वचित् ॥ ज्ञानमप्रतिमं शश्वदैश्वर्यं चाणिमादिकम् ॥ ॥ ३ ॥ सृष्टिस्थितिलयाख्येषु कर्मसु त्रिषु हेतुताम् ॥ प्रभुत्वेन सहैतेषां प्रसीदति महेश्वरः ॥ ४ ॥ कल्पान्तरे पुनस्तेषामस्पर्धाबुद्धिमोहिनाम् ॥ सर्गरक्षालयाचारं प्रत्येकं प्रददौ च सः ॥ ॥ ५ ॥ एते परस्परोत्पन्ना धारयन्ति परस्परम् ॥ परस्परेण

---

( १ ) वायु ह्मणालाः— पूर्वी पुरुषांमध्यें राहणाऱ्या अव्यक्तापासून ईश्वराच्या आज्ञेनें बुद्धिपासून विशेषापर्यंत सर्व विकार क्रमाक्रमानें झाले. ( २ ) त्यानंतर त्या विकारांपासून जगाला सर्व प्रकारानें अवश्य कारण असणारे ब्रह्मदेव, विष्णु आणि रुद्र हे तीन देव उत्पन्न झाले. ( ३ ) त्या तिन्ही देवांच्या आंगीं सर्व त्रैलोक्याला व्यापून टाकण्याइतकी अलौकिक शक्ति होती, त्यांचें ज्ञानही असामान्य होतें. त्या तिघांस अणिमादिक अष्टमहासिद्धि अनुकूल होत्या. ( ४ ) त्या तिघांवर प्रसन्न होऊन महेश्वरानें सृष्टि उत्पन्न करणें, सृष्टीचें रक्षण करणें आणि सृष्टीचा संहार करणें ह्या तीन कामांत ह्यांचा चांगला उपयोग होईल असें मनांत आणिलें. ( ५ ) मग पुनः त्या महेश्वरानें हे तिघे देव परस्परांचा परस्पर मत्सर न करितां एकमतानें वागतात असें पाहून त्यांतील एक एकास सृष्टि करणें, रक्षण करणें आणि संहार करणें हे अधिकार दिले. ( ६ ) हे तिघे देव एकमेकापासून उत्पन्न झाले व ते तिघेही एकमेकास सांभाळून घेतात. एकमेकांच्या आश्रयानें त्यांची वरचेवर भरभराट होते, व ते परस्परांच्या विचारानें राह-

वर्धन्ते परस्परमनुव्रताः ॥ ६ ॥ क्वचिद्ब्रह्मा क्वचिद्विष्णुः क्वचिद्रुद्रः प्रशस्यते ॥ नाऽनेन तेषामाधिक्यमैश्वर्यं चातिरिच्यते ॥ ॥ ७ ॥ अयं परस्त्वयं नेति संरम्भाभिनिवेशिनः ॥ यातुधाना भवन्त्येव पिशाचाश्च न संशयः ॥ ८ ॥ देवो गुणत्रयातीतश्चतुर्व्यूहो महेश्वरः ॥ सकलः सकलाधारः शक्तेरुत्पत्तिकारणम् ॥ ॥ ९ ॥ सोऽयमात्मत्रयस्यास्य प्रकृतेः पुरुषस्य च ॥ लीलाकृत जगत्सृष्टिरीश्वरत्वे व्यवस्थितः ॥ १० ॥ यः सर्वस्मात्परो नित्यो निष्कलः परमेश्वरः ॥ स एव तत्तदाधारस्तदात्मा तदधिष्ठितः ॥ ॥ ११ ॥ तस्मान्महेश्वरश्चैव प्रकृतिः पुरुषस्तथा ॥ सदाशिवो भवो विष्णुर्ब्रह्मा सर्वं शिवात्मकम ॥ १२ ॥ प्रधानात्प्रथमं जज्ञे

---

तात, (७) कोठें ब्रह्मदेव कोठें विष्णु व कोठें रुद्र पूज्य मानतात, त्यावरून त्यांचा अधिकार किंवा ऐश्वर्य जास्त होतें असा मुळींच भाग नाहीं. (८) ह्या तीन देवांत हा देव सर्वांत मोठा आहे, हा देव मोठा नाहीं, असा दुराग्रह धरणारे लोक राक्षसच होतील; ते पिशाचच्च आहेत यांत शंका नाहीं. (९) महेश्वर हा देव सत्वगुण, रजोगुण आणि तमोगुण ह्या सर्वांहून अगदीं पलीकडे आहे, महेश्वराला त्रिगुणांचा मुळींच संबंध नाहीं, त्याला चार व्यूह आहेत तो पूर्ण असून सर्व प्राणिमात्रांस आश्रयभूत आहे, तो शक्तीच्या उत्पत्तीला कारण आहे. (१०) तो हा परमेश्वर ह्या तीन आत्म्यांस प्रकृतीस आणि पुरुषासहीं कारण आहे, तो सहजगतीनें सर्व जग निर्माण ( विश्व, तैजस आणि प्राज्ञ ह्यांस ] करून आपण सर्वांचा ईश्वर होऊन राहिला आहे. (११) हा परमेश्वर सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे, हा नित्य आहे, हा कलाहीन आहे, ह्याला परमेश्वर ह्मणतात तोच परमेश्वर तें तत्व आहे, त्या त्या तत्वाचा तोच्च आधार असून त्याचा आत्मा आहे ( तत्वस्वरूप आहे ) व तो तत्वांतच राहतो. [ १२ ] त्यामुळें महेश्वर, प्रकृति तसेच पुरुष, सदाशिव, भव, विष्ण आणि ब्रह्मदेव हे सर्व शिवस्वरूप आहेत. (१३) प्रधानापासून प्रथम बुद्धि

बुद्धिः ख्यातिर्मतिर्महान् ॥ महत्तत्वस्य संक्षोभादहंकारस्त्रिधाऽभवत् ॥ १३ ॥ अहंकाराच्च भूतानि तन्मात्राणीन्द्रियाणि च ॥ वैकारिकादहंकारः सत्वोद्रिक्तात्तु सात्विकः ॥ १४ ॥ वैकारिकः स सर्गस्तु युगपत्सम्प्रवर्तते ॥ बुद्धीन्द्रियाणि पंचैव पंच कर्मेंद्रियाणि च ॥ १५ ॥ एकादश मनस्तत्र स्वगुणेनोभयात्मकम् ॥ तमोयुक्तादहंकाराद्भूततन्मात्रसम्भवः ॥ १६ ॥ भूतानामादिभूतत्वाद्भूतादिः कथ्यते तु सः ॥ भूतादेः शद्बमात्रं स्यात्तत आकाशसम्भवः ॥ १७ ॥ आकाशात्स्पर्श उत्पन्नः स्पर्शाद्वायुसमुद्भवः ॥ वायोरूपं ततस्तेजस्तेजसो रससम्भवः ॥ १८ ॥ रसादापः समुत्पन्नास्ताभ्यो गन्धसमुद्भवः ॥ गन्धाच्च पृथिवी जाता भूतेभ्योऽन्य-

---

झाली, त्यानंतर प्रख्यात अशी मति झाली, मतीपासून महत्तत्व झालें, महत्तत्वाच्या संक्षोभानें अहंकार झाला व ह्या तीन प्रकारचा आहे. ( १४ ) अहंकारापासून पंचमहाभूतें, पंचतन्मात्र आणि दहा इंद्रियें झालीं. वैकारिकापासून अहंकार झाला. सत्वगुणाचें अधिकपणामुळें सात्विकगुण झाला. ( १५ ) वैकारिक सर्ग तर तो एकदम सुरू होतो. ज्ञानेंद्रियें पांच असून कर्मेंद्रिय पांच आहेत. ( १६ ) मन हें अकरावें इंद्रिय आहे, तें आपल्या गुणानेंच उभयात्मक [ कर्मेंद्रियाकडे व ज्ञानेंद्रियाकडे वळणारें ] असें होतें, तमोगुणमिश्रित जो अहंकार आहे त्यापासून भूतांची व तन्मात्रांची उत्पत्ति होतें. ( १७ ) सर्व भूतांच्या [ प्राणिमात्रांच्या ] अगोदरपासून हा अहंकार असल्यामुळें त्याला भूतादि असें ह्मणतात, ह्या भूतादीपासून शद्ब झाला व शद्बापासून आकाश झालें. ( १८ ) आकाशापासून स्पर्श उत्पन्न झाला, स्पर्शापासून वायु झाला. वायुपासून रूप झालें, रूपापासून तेज झालें, तेजापासून रसाची उत्पत्ति झाली. ( १९ ) रसापासून पाणी झालें, पाण्यापासून गंध झाला, गंधापासून पृथ्वी झाली. आणि अशा पांच भूतांपासून दुसरें स्थावर जंगम विश्व उत्पन्न झालें.

च्चराचरम् ॥ १९ ॥ पुरुषाधिष्ठितत्वाच्च अव्यक्तानुग्रहेण च ॥ महदादिविशेषान्ता ह्यण्डमुत्पादयन्ति ते ॥ २० ॥ तत्र कार्यं च करणं संसिद्धं ब्रह्मणो यदा ॥ तदाण्डेऽस्मिन्प्रवृद्धोऽभूत्क्षेत्रज्ञो ब्रह्मसंज्ञितः ॥ २१ ॥ स वै शरीरी प्रथमः स वै पुरुष उच्यते ॥ आदिकर्ता स भूतानां ब्रह्माग्रे समवर्तत ॥ २२ ॥ तस्येश्वरस्याप्रतिमा ज्ञानवैराग्यलक्षणा ॥ धर्मैश्वर्यकरा बुद्धिर्ब्राह्मी जज्ञेऽभिमानिनः ॥ २३ ॥ अव्यक्ताज्जायते तस्य मनसा यद्यदीप्सितम् ॥ वशीकृतत्वात्त्रैगुण्यात्सापेक्षत्वात्स्वभावतः ॥ २४ ॥ त्रिधा विभज्य चात्मानं त्रैलोक्ये सम्प्रवर्तते ॥ सृजते ग्रसते चैव वीक्षते च त्रिभिः

---

( २० ) ते सर्वजण पुरुषांत राहून अव्यक्ताच्या कृपेनें [ आज्ञेनें ] महत्तत्वापासून विशेषतत्वापर्यंत अण्ड [ ब्रह्माण्ड ] उत्पन्न करितात. ( २१ ) ज्यावेळीं त्या अण्डांत ब्रह्मदेवाचें कार्य आणि करण हें तयार झालें तेव्हां त्या अण्डांत क्षेत्र जाणणारा ब्रह्मदेव असें नांव घेऊन वाढूं लागला. ( २२ ) तोच प्रथमचा [ अगोदरचा ] देहधारी, त्यालाच पुरुष ह्मणतात. तो प्राणिमात्रांचा आदिकर्ता आहे, तो ब्रह्मदेव सर्वांच्या अगोदर असतो. ( २३ ) त्या अभिमानी ब्रह्मदेवाला ज्ञान आणि वैराग्य हें जिचें लक्षण आहे, तिची तुलना करितां येण्यासारखी जगांत दुसरी वस्तु नाहीं, जिच्यापासून धर्म आणि ऐश्वर्य हे उत्पन्न होतात अशी बुद्धि झाली तिचें नांव ब्राह्मी होय. ( २४ ) त्या ब्रह्मदेवाच्या मनांत जी जी कांहीं इच्छा असते ती ती सर्व अव्यक्तापासून पूर्ण होते. कारण त्या अव्यक्ताच्या आंगीं वशीकरणाचा गूण, सत्वरजस्तमोगुण आणि त्याला त्यापेक्षां श्रेष्ठ अशा परमेश्वराच्या साह्याची जरूर हे गुण त्याचे आंगीं मुळापासून असल्यामुळें त्यास पाहिजे तें करितां येतें ( २५ ) तो ब्रह्मदेव आपलीं तीन रूपें करून जगांत वागत असतो, आणि त्या तीन रूपांनींच तो स्वतः सर्व जग उत्पन्न करितो, सर्व जगाचा संहार करितो आणि सर्व ज-

स्वयम् ॥ २५ ॥ चतुर्मुखस्तु ब्रह्मत्वे कालत्वे चान्तकः स्मृतः ॥ सहस्रमूर्धा पुरुषस्तिस्रोऽवस्थाः स्वयंभुवः ॥ २६ ॥ सत्वं रजश्च ब्रह्मत्वे कालत्वे च तमो रजः ॥ विष्णुत्वे केवलं सत्वं गुणवृद्धिस्त्रिधा प्रभोः ॥ २७ ॥ब्रह्मत्वे सृजते लोकान्कालत्वे संक्षिपत्यपि ॥ पुरुषत्वेऽप्युदासीनः कर्म च त्रिविधं विभोः ॥ २८ ॥ एवं त्रिधा विभिन्नत्वाद्ब्रह्मा त्रिगुण उच्यते ॥ चतुर्धा प्रविभक्तत्वा च्चतुर्व्यूहः प्रकीर्तितः ॥ २९ ॥ आदित्वादादिदेवोऽसावजातत्वादजः स्मृतः ॥ पाति यस्मात्प्रजाः सर्वाः प्रजापतिरितिस्मृतः ॥ ॥ ३० ॥हिरण्मयस्तु यो मेरुस्तस्योल्वं सुमहात्मनः ॥ गर्भोदकं

---

गाचें कृपादृष्टीनें रक्षणही करितो. [२६] त्या ब्रह्मदेवालाच सृष्टि उत्पन्न करण्याचे वेळीं चतुर्मुख ह्मणतात व सृष्टीचा संहार करतेवेळीं त्याला अन्तक ह्मणतात. हजार मस्तकें असतां त्यास पुरुष ह्मणतात अशा त्या स्वयंभूला तीन अवस्था होतात ( २७ ) ब्रह्मदेवाचे स्थितींत [ सृष्टि उत्पन्न करितांना ] त्याचे आंगीं सत्व आणि रज हे दोन गुण असतात, संहार करावयाच्या वेळीं कालरूप घेतलें असतां तमोगुण आणि रजोगुण असतात. आणि विष्णूचें रूप घेऊन रक्षण करावयाच्या वेळीं फक्त सत्वगुणच त्याचे आंगीं असतो ह्याप्रमाणें त्या परमेश्वराच्या गुणांची वृद्धि तीन प्रकारांनीं होते. (२८) ब्रह्मदेवाचे स्थितींत असतां तो सृष्टीची उत्पत्ति करितो, कालाचे स्थितींत असतां सर्व जगाचा संहार करितो व पुरुषाचे स्थितींत असतां तो उदासीनपणानें राहतो असें परमेश्वराचें कर्म तीन प्रकारचें आहे. ( २९ ) ह्याप्रमाणें तीन जागीं वाटला गेल्यामुळें ब्रह्मदेवाला त्रिगुण ह्मणतात, चार प्रकारानें वाटला गेल्यामुळें त्यास चतुर्व्यूह असें ह्मणतात. ( ३० ) तो सर्व देवाच्या व जगाच्या आधींपासून असल्यामुळें त्यास आदिदेव ह्मणतात, तो कधीं जन्माला आला नाहीं ह्मणून त्यास अज ह्मणतात, तो सर्व प्रजांचें रक्षण करितो ह्मणून त्यास प्रजापति असें ह्मणतात. ( ३१ ) त्या महासामर्थ्यवान् ब्रह्माण्डाचा हा सोन्याचा मेरुपर्वत नाल आहे, समुद्र हे

समुद्राश्च जरायुश्चापि पर्वतः ॥ ३१ ॥ तस्मिन्नण्डे त्विमे लोका अन्तर्विश्वमिदं जगत् ॥ चंद्रादित्यौ सनक्षत्रौ सग्रहौ सह वायुना ॥ ३२ ॥ अद्भिर्दशगुणाभिस्तु बाह्यतोण्डं समावृतम् ॥ आपो दशगुणेनैव तेजसा बहिरावृताः ॥ ३३ ॥ तेजो दशगुणेनैव वायुना बहिरावृतम् ॥ आकाशेनावृतो वायुः खं च भूतादिना वृतम् ॥ ३४ ॥ भूतादिर्महता तद्वदव्यक्तेनावृतो महान् ॥ एतैरावरणैरण्डं सप्तभिः प्राकृतैर्वृतम् ॥ ३५ ॥ एतदावृत्य चान्योन्यमष्टौ प्रकृतयः स्थिताः ॥ एवंपरस्परोत्पन्ना धारयन्ति परस्परम् ॥ ३६ ॥ आधाराधेयभावेन विकारास्तु विकारिषुः ॥ कूर्मोऽङ्गानि यथापूर्वं प्रसार्य विनियच्छति ॥ ३७ ॥ विकारांश्च तथा व्यक्तं सृष्ट्वा भूयो नियच्छति ॥ अव्यक्तप्रभवं

---

गर्भोदक असून पर्वत हे त्या गर्भावरील [ वेष्ठन ] जार आहे. ( ३२ ) त्या अंडांत हे सर्व लोक, अन्तर्विश्व आणि हें सर्व जग चंद्र, सूर्य, नक्षत्र, ग्रह आणि वायु ह्यांसह राहते ( ३३ ) हें अण्ड बाहेरील बाजूंनी दसपट पाण्यांनीं वेढलेलें आहे, तें सर्व पाणी त्यापेक्षां दसपट अग्नींनीं सभोंवती वेढिलें आहे, ( ३४ ) त्या अग्नींच्या सभोंवतीं दसपटीनें वायूचें वेष्टन आहे, वायु हा सभोंवतीं आकाशानें वेढलेला असून आकाश भूतादिकानें व्यापलें आहे (३५) भूतादिकांस त्या अव्यक्तानें व्यापिलें आहे. तें अव्यक्त मोठें शक्तिमान् आहे. ह्या सात प्रकारच्या स्वाभाविक वेष्टनांनीं हें अण्ड बाहेरून वेढलेलें आहे. (३६) ह्या अण्डाच्या आश्रयानें एकमेक अशा ह्या आठ प्रकृति राहिल्या आहेत. त्या परस्परांपासून उत्पन्न झाल्या आहेत व त्या परस्परांस सांभाळून घेतात. (३७) आधार आणि आधेय [ आश्रय आणि आश्रयाचें स्थान ] ह्यांच्या संबंधाप्रमाणें विकारीमध्यें विकार राहतात. जसें कांसव आपलें आंग आटोपूनही घेतें आणि पूर्वीप्रमाणें बाहेर पसरूंही शकतें, ( ३८ )त्याप्रमाणें अव्यक्त हें सर्व जग उत्पन्नही करितें आणि उत्पन्न केल्यावर पुन्हां त्याचा संहारही करितें. हें सर्व अव्यक्त

सर्वगानुलोम्येन जायते ॥ ३८ ॥ मासे प्रलयकाले तु प्रातिलो
म्येन लीयते ॥ गुणाः कालवशादेव भवन्ति विषमाः समाः ॥
॥ ३९ ॥ गुणसाम्ये लयो ज्ञेयो वैषम्ये सृष्टिरुच्यते ॥ तदिदं
ब्रह्मणो योनिरेतदण्डं घनं महत् ॥ ब्रह्मणः क्षेत्रमुद्दिष्टं ब्रह्मा क्षे-
त्रज्ञ उच्यते ॥ ४० ॥ इतीदृशानामण्डानां कोट्यो ज्ञेयाः सह-
स्रशः ॥ सर्वगत्वात्प्रधानस्य तिर्यगूर्ध्वमधस्थिताः ॥ ४१ ॥ तत्र
तत्र चतुर्वक्त्रा ब्रह्माणो हरयो भवाः ॥ सृष्टाः प्रधानेन तथा ल-
ब्ध्वा शम्भोस्तु सन्निधिम् ॥४२॥ महेश्वरः परोऽव्यक्तादण्डमव्यक्त
सम्भवम् ॥ अण्डाज्जज्ञे विभुर्ब्रह्मा लोकास्तेन कृतास्त्विमे ॥४३॥
॥ वृत्तं ॥ अबुद्धिपूर्वः कथितो मयैष प्रधानसर्गः प्रथमप्रवृत्तः ॥

---

पासून सरळ मार्गानें उत्पन्न होतें ( ३९ ) आणि प्रळयकाळाची वेळ आली असतां उलट रीतीनें तें सर्व जग लय पावतें गुण हे कालाला अनुसरूनच विषम किंवा सम जसें व्हावयास पाहिजे असेल तसे होतात. ( ४० ) गुण समसमान झाले ह्मणजे लय होतो, आणि कमी जास्ती झाले ह्मणजे जगाची उत्पत्ति होतें. तें हें अण्ड मोठें घट्ट आणि मोठे विशाल आहे तें ब्रह्मदेवाचें स्थान मानलें आहे. त्या अण्डाळा ब्रह्मदेवाचें क्षेत्र ह्मणतात आणि ब्रह्मदेवास क्षेत्रज्ञ ह्मणतात. ( ४१ ) अशा प्रकारच्या अण्डाच्या हजारो कोटी आहेत असें जाणावें. प्रधानाचें सर्वत्र जाणें येणें असल्यामुळें त्या अण्डकोटी बाजूला, खालीं व वर अशा राहिलेल्या आहेत. ( ४२ ) तेथें तेथें प्रधानानें शंकराचें सहाय मिळवून [ चतुर्मुख ] ब्रह्मदेव, विष्णु आणि रुद्र हे उत्पन्न केले. ( ४३ ) महेश्वर हा अव्यक्ताहून वेगळा असून अव्यक्तापेक्षां श्रेष्ठ आहे. हें अण्ड अव्यक्तापासून उत्पन्न झालें. अण्डापासून हा परमात्मा ब्रह्मदेव जन्मला व त्या ब्रह्मदेवानें हे सर्व लोक निर्माण केले. ( ४४ ) मीं हा अगोदर झालेला अबुद्धि प्रधान सर्ग सांगितला, प्रलय हा आत्यंतिक [ होणारच होणार ] असा आहे तो अंत-

आसान्तिकश्च प्रलयोन्तकाले लीलाकृतः केवलमीश्वरस्य ॥४४॥ यत्तत्स्मृतं कारणमप्रमेयं ब्रह्मप्रधानं प्रकृतेः प्रसूतिः ॥ अनादिमध्यान्तमनन्तवीर्यं शुक्लं सुरक्तं पुरुषेण युक्तम् ॥ ४५ ॥ उत्पादकत्वाद्रजसोऽतिरेकाल्लोकस्य सन्तानविवृद्धिहेतून् ॥ अष्टौ विकारानपि चादिकाले सृष्ट्वा समश्नाति तथान्तकाले ॥ ४६ ॥प्रकृत्यवस्थापितकारणानां यावत्स्थितिर्या च पुनः प्रवृत्तिः ॥तत्सर्वमप्राकृतवैभवस्य संकल्पमात्रेण महेश्वरस्य ॥ ४७ ॥

इति श्रीशैवे वायवीयसंहितायां पूर्वभागे लोकोत्पत्तिवर्णनं नामाष्टमोऽध्ययः ॥ ८ ॥

---

काळीं होहो तो फक्त परमेश्वराच्या लीलेमुळें होतो. ( ४५ ) ज्याची तुलना करितां येत नाहीं, ज्यांत ब्रह्म श्रेष्ठ आहे, ज्याच्यापासून प्रकृति झाली, ज्याला जन्ममरण आणि तरुणपणा नाहीं, ज्याची शक्ति फार मोठी आहे, त्याचा वर्ण पांढरा शुभ्र असून लाल भडकही [ जे सत्वगुणी आणि रजोगुणी ] आहे, जें पुरुषासहित राहते त्यालाच कारण ह्मणतात ( ४६ ) तो उत्पादकपणामुळें व रजोगुणाचा अतिरेक झाल्यामुळें लोकांच्या संततीची वाढ करण्यास कारण असणाऱ्या आठ प्रकारच्या विकारांस सृष्टि उत्पन्न करावयाच्यावेळीं उत्पन्न करून पुनः प्रलयकाळच्यावेळीं त्या सर्व खाऊन टाकितो ( ४७ ) प्रकृतींत स्थापन केलेले कारण [ प्राणिमात्र ] जोंपर्यंत राहतात तोंपर्यंत जन्मास येणें वगैरे प्रकार चालूं राहतात ह्या सर्व गोष्टी अलौकिक सामर्थ्य असणाऱ्या महेश्वराच्या इच्छामात्रानें घडत असतात.

ह्या प्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवीय संहितेच्या पूर्वभागापैकीं लोकांच्या उत्पत्तीचें वर्णन नांवाचा आठवा अध्याय संपला.

---

## ॥ अथ नवमोऽध्यायः ॥

मुनय ऊचुः ॥ मन्वन्तराणि सर्वाणि कल्पभेदांश्च सर्वशः ॥ तेष्ववान्तरसर्गं च प्रतिसर्गं च नो वद ॥ १ ॥ वायुरुवाच ॥ कालसंख्याविवृत्तस्य परार्द्धो ब्रह्मणः स्मृतः ॥ तावांश्चैवास्य कालोऽन्यस्तस्यान्ते प्रतिसृज्यते ॥ २ ॥ दिवसे दिवसे तस्य ब्रह्मणः पूर्वजन्मनः ॥ चतुर्दश महाभागा मनूनां परिवृत्तयः ॥ ३ ॥ अनादित्वादनन्तत्वादज्ञेयत्वाच्च कृत्स्नशः ॥ मन्वन्तराणि कल्पाश्च न शक्यवचनाः पृथक् ॥ ४ ॥ उक्तेष्वपि च सर्वेषु शृण्वतां वोऽथवा मम ॥ किमिहास्ति फलं तस्मान्न पृथग्वक्तुमुत्सहे ॥ ५ ॥ य एव खलु कल्पेषु कल्पः सम्प्रति

---

मुनि ह्मणालेः— १ वायो, सर्व मन्वन्तरें, सर्व प्रकारचे कल्पांचे भेद, त्यांतील अवांतर सर्ग आणि प्रतिसर्ग हे सर्व आह्मांस सांग.

वायु ह्मणालाः— २ मुनीश्वरहो, कालसंख्येप्रमाणें फिरत असणाऱ्या ब्रह्मदेवाचा जो काळ त्याला परार्ध असें ह्मणतात, तितकाच आणखी दुसरा काळ आहे त्या काळाच्या शेवटीं पुन्हां जग उत्पन्न होतें. ( ३ ) हे भाग्यशाली ऋषीश्वरहो, त्या सर्वांच्या आधीं जन्मास आलेल्या ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवशीं चवदा मनूंचा एक फेरा होतो, [ ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चवदा मनु होतात. (४) मन्वन्तरें आणि कल्प हे अनादि आहेत, केव्हां पासून सुरु झाले ते कोणासच सांगतां येत नाहीं, व त्यांचा अंत ही नाहीं ते कधीं संपतील तेंही सांगतां येत नाहीं. ह्यासाठीं त्यांचें वेगळें वर्णन करितां येत नाहीं. ( ५ ) बरें, तें सर्व मीं सविस्तर रीतीनें सांगितलें तरी त्या सांगण्यापासून ऐकणारांचा किंवा माझा उपयोग तरी काय आहे? ह्यासाठीं मी तें वेगळें वेगळें सांगण्याच्या भरीस पडत नाहीं. ( ६ ) हे जे कल्प मी

वर्तते ॥ तत्र संक्षिप्य वर्तन्ते सृष्टयः प्रतिसृष्टयः ॥ ६ ॥ यस्त्वयं वर्तते कल्पो वाराहो नाम नामतः ॥ अस्मिन्नपि द्विजश्रेष्ठा मनवस्तु चतुर्दश ॥ ७ ॥ स्वायम्भुवादयः सप्त सप्त सावर्णिकादयः ॥ तेषु वैवस्वतो नाम सप्तमो वर्तते मनुः ॥ ८ ॥ मन्वन्तरेषु सर्वेषु सर्गसंहारवृत्तयः ॥ प्रायः समा भवन्तीति तर्कः कार्यो विजानता ॥ ९ ॥ पूर्वकल्पे परावृत्ते प्रवृत्ते कालमारुते ॥ समुन्मूलितमूलेषु वृक्षेषु च वनेषु च ॥ १० ॥ जगन्ति तृणवत्त्रीणि देवे दहति पावके ॥ वृष्ट्या भुवि निषिक्तायां विवेलेष्वर्णवेषु च ॥ ११ ॥ दिक्षु सर्वासु मग्नासु वारिपूरे महीयसि ॥ तरङ्गैश्चटुलाक्षेपैस्तरङ्गभुजमण्डलैः ॥ १२ ॥ प्रारब्धचण्डनृत्तेषु ततः प्रलयवारिषु ॥ ब्रह्मा नारा-

---

तुम्हांस सांगितले त्या कल्पापैकीं सध्यां जो हा कल्प सुरु आहे, त्याच्यामध्यें सृष्टि आणि प्रतिसृष्टि ह्या संक्षिप्तरीतीनें राहतात. (७) सध्यां जो हा कल्प सुरु आहे त्या कल्पाचें नांव वराहकल्प असें आहे, हे ब्राह्मणश्रेष्ठहो, ह्या वराह कल्पांतही चवदा मनु होतात. ( ८ ) स्वायंभुवादिक सात मनु आणि सावर्णिकादिक सात मनु मिळून चवदा मनु होतात, त्या चवदा मनूंपैकीं सातवा वैवस्वत नांवाचा मनु सध्यां चालूं आहे. ( ९ ) सर्व मन्वन्तरांत उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय हे सर्व सारखेच होतात असें शहाण्या मनुष्यानें समजावें. ( १० ) पूर्वीचा कल्प लयाला गेला आणि प्रळयकाळचा वारा सुरू झाला त्यामुळें झाडें मुळांसुद्धां उपटून पडलीं व वनांची सर्व धूळदाण झाली. ( ११ ) परमेश्वर कालाग्नि गवतासारखें त्रिभुवनास जाळूं लागला, तें झाल्यानंतर पृथ्वीवर इतका पाऊस पडला कीं, त्यामुळें समुद्राच्या मर्यादा सुटून जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें. ( १२ ) तो पाण्याचा पूर इतका मोठा आला कीं, त्या पूरांत दाही दिशा बुडून गेल्या आणि त्या पाण्यावर लाटा हातांनीं पोहतात असें दिसूं लागल्या. ( १३ ) अशा त्या प्रळयकाळच्या पाण्यानें भ-

यणो भूत्वा सुष्वाप सलिले सुखम् ॥ १३ ॥ इमं चोदाहरन्त्यत्र श्लोकं नारायणं प्रति ॥ आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ॥ १४॥ अयनं तस्य ता यस्मात्तेन नारायणः स्मृतः॥ शिवयोगमयीं निद्रां कुर्वन्तं त्रिदशेश्वरम् ॥ १५ ॥ बद्धांजलिपुटाः सिद्धा जनलोकनिवासिनः ॥ स्तोत्रैः प्रबोधयामासुः प्रभातसमये सुराः ॥ १६ ॥ ततः प्रबुद्ध उत्थाय शयनात्तोयमध्यगात् ॥ उदैक्षत दिशः सर्व्वा योगनिद्रालसेक्षणः ॥ १७ ॥ नापश्यत्स तदा किंचित्स्वात्मनो व्यतिरेकि यत् ॥ सविस्मय इवासीनः परां चिन्तामुपागमत् ॥ १८ ॥ क सा भगवती या

---

यंकर रीतीचा नाच चालविला असतां [ जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें असतां ] ब्रह्मदेव नारायणाचें स्वरूप घेऊन त्या पाण्यांत सुखानें निजला. ( १४ ) त्या निजलेल्या नारायणाला [ ब्रह्मदेवाला ] नारायण असें नांव पडण्याचें कारण असें कीं, आपाला [ जलाला ] नार असें ह्मणतात, आणि आप [ जल ] ह्या नाराचे मुलगे आहेत. ( १५ ) त्या आप ( पाणी ) ह्या ब्रह्मदेवाचें राहण्याचें स्थान आहे ह्मणून त्यास नारायण असें ह्मणतात, असो, त्या जळांत शिवयोगस्वरूपी झोंप घेणाऱ्या परमेश्वराला ( १६ ) जन लोकांत राहणारे साध्य लोक आणि देव सकाळचे प्रहरीं दोन्हीं हात जोडून स्तोत्र करून त्यास सावध [ जागें ] करूं लागले. ( १७ ) त्या देवांच्या आणि साध्यांच्या स्तोत्रांनीं ब्रह्मदेव जागा होऊन पाण्यांत असणाऱ्या आपल्या हांतरुणावरून उठला आणि योगनिद्रेंतून नुकता जागा झाला असल्यानें सर्व दिशांकडे डोळे चोळीत चोळीत पाहूं लागला. ( १८ ) त्यावेळीं त्याला आपली स्थिति असें होण्याला कारण काय झालें तें कांहीं एक दिसलें नाहीं, व तो आश्चर्यानें गुंग होऊन मोठी काळजी करूं लागला. ( १९ ) तो आपले मनांत ह्मणूं लागला, जी फारच मोठी आणि सुशोभित दिसत होती ती पृथ्वी कोठें आहे? तिच्यावर अनेक प्रकारचे मोठमोठाले पर्वत

तु मनोज्ञा महती मही ॥ नानाविधमहाशैलनदीनगरकानना ॥ १९ ॥ एवं संचिन्तयन्ब्रह्मा बुबुधे नैव भूस्थितिम् ॥ तदा सस्मार पितरं भगवन्तं त्रिलोचनम् ॥ २० ॥ स्मरणाद्देवदेवस्य भवस्यामिततेजसः ॥ ज्ञातवान्सलिले मग्नां धरणीं धरणीपतिः ॥ २१ ॥ ततो भूमेः समुद्धारं कर्तुकामः प्रजापतिः ॥ जलक्रीडोचितं दिव्यं वाराहं रूपमस्मरत् ॥ २२ ॥ महापर्वतवर्ष्माणं महाजलदनिस्वनम् ॥ नीलमेघप्रतीकाशं दीप्तशब्दं भयानकम् ॥ २३ ॥ पीनवृत्तघनस्कन्धं पीनोन्नतकटीतटम् ॥ ह्रस्ववृत्तोरुजंघाग्रं सुतीक्ष्णखुरमण्डलम् ॥ २४ ॥ पद्मरागमणिप्रख्यं वृत्त-

होते, मोठमोठ्या नद्या होत्या, मोठमोठीं शहरें आणि अरण्यें त्या पृथ्वीच्या पाठीवर होतीं तीं सर्व कोणीकडे गेलीं? (२०) असा ब्रह्मदेव विचार करूं लागला, परंतु त्यास पृथ्वीचा पत्ता मुळींच कांहीं लागेना, तेव्हां त्यानें आपल्या मनांत आपला पिता परमेश्वर त्रिनयन [ शंकर ] ह्याचें स्मरण केलें. (२१) शंकराचें सामर्थ्य अलौकिक आहे त्याचें मनांत स्मरण केल्याबरोबर त्या पृथ्वीच्या अधिपतीला [ ब्रह्मदेवाला ] आपोआप असें ज्ञान झालें कीं, पृथ्वी पाण्यांत बुडून गेली आहे, (२२) मग त्या पृथ्वीला समुद्राच्या पाण्यांतून वर काढण्याकरितां ब्रह्मदेवानें पाण्यांत पोहण्याचें उपयोगीं पडण्यासारखें वराहरूपाचें स्मरण केलें. (२३) त्या वराहाचा देह मोठ्या थोरल्या पर्वता एवढा होता, मोठ्या थोरल्या मेघगर्जनेसारखा [ गडगडण्यासारखा ] त्याचा शब्द होता. निळ्या ढगासारखा त्याचा रंग काळा होता, तो एकवेळ ओरडला ह्मणजे सर्वांस भिववून टाकील इतका तो वराह भयंकर [ अकराळ विकराळ ] होता. (२४) त्याचा गळा लठ्ठ आणि वाटोळा होता, त्याच्या कमरेचा भाग लठ्ठ आणि उंच होता, त्याचे पायाच्या गुढघ्या खालील भाग आंखूड आणि वाटोळे होते. त्याच्या पायाचे खुर फारच तीक्ष्ण होते, (२५) पद्मरागमण्यासारखे त्याचे डोळे लाल असून भयंकर होते, त्याचें

भीषणमीक्षणम् ॥ वृत्तदीर्घमहागात्रं स्तब्धकर्णस्थलोज्वलम् ॥२५॥ उदीर्णोच्छ्वासनिश्वासघूर्णितप्रलयार्णवम् ॥ विस्फुरत्तुसटाच्छन्न कपोलं स्कन्धबन्धुरम् ॥ २६ ॥ मणिभिर्भूषणैश्चित्रैर्महारत्नैः परिष्कृतैः ॥ विराजमानं विद्युद्भिर्मेघसंघमिवोन्नतम् ॥ २७ ॥ आस्थाय विपुलं रूपं वाराहममितं विधिः ॥ पृथिव्युद्धरणार्थाय प्रविवेश रसातलम् ॥ २८ ॥ स तदा शुशुभेऽतीव सूकरो गिरिसन्निभः ॥ लिंगाकृतेर्महेशस्य पादमूलगतो यथा ॥ २९ ॥ ततः स सलिले मग्नां पृथिवीं पृथिवीधरः ॥ उद्धृत्यालिंग्य दंष्ट्राभ्यामुन्ममज्ज रसातलात् ॥ ३० ॥ तं दृष्ट्वा मुनयः सिद्धा

---

आंग वाटोळे आणि लांब होतें, त्याच्या कानाच्या बाजू ताठ आणि सुशोभित होत्या. ( २६ ) तो श्वास घेऊं लागला आणि श्वास सोडूं लागला म्हणजे प्रळयसमुद्रास दणाणून सोडीत इतका सशक्त होता, त्याच्या आंगावर ज्या सटा होत्या त्या रांठ व सरळ केशांनीं त्याचा गळा व गाल अगदीं गच्च गेले होते. ( २७ ) त्याच्या अंगावर अनेक प्रकारचे हिऱ्यांचे व रत्नांचे अलंकार होते त्यांमुळें वीजामुळें जसा ढगांचा समुदाय शोभावा तसा तो उंच शरीराचा वराह शोभत होता. ( २८ ) अशा रीतीचें मोठें थोरलें अक्राळ विक्राळ वराहाचें रूप घेऊन ब्रह्मदेव पृथ्वीला समुद्राच्या पाण्यांतून वर काढण्याकरितां रसातलांत शिरला. ( २९ ) त्या वेळेस तो पर्वता सारखा धिप्पाड वराह लिंगस्वरूपी महादेवाच्या पायाचा तळ पाहण्यास पूर्वी वराहाचें रूप घेऊन गेला होता तेव्हां जसा शोभला तसाच शोभू लागला. ( ३० ) ब्रह्मदेव रसातलांत वराहाचें रूप घेऊन शिरल्यावर त्यानें त्या समुद्राच्या पाण्यांत बुडालेल्या पृथ्वीस आपल्या दोन्हीं दाढांनीं धरून वर उचललें व तिला बळकट धरून तो रसातलांतून वर येण्यांस निघाला. ( ३१ ) ब्रह्मदेव पृथ्वीस पाण्यांतून वर घेऊन आला असें पाहतांच

जनलोकनिवासिनः ॥ मुमुदुर्ननृतुर्मूर्ध्नि तस्य पुष्पैरवाकिरन्
॥ ३१ ॥ वपुर्महावराहस्य शुशुभे पुष्पसंवृतम् ॥ पतद्भिरिव
खद्योतैः प्रांशुरंजनपर्वतः ॥ ३२ ॥ ततः संस्थानमानीय वराहो
महतीं महीम् ॥ स्वमेव रूपमास्थाय स्थापयामास वै प्रभुः
॥ ३३ ॥ पृथिवीं च समीकृत्य पृथिव्यां स्थापयन्गिरीन् ॥
भूराद्यांश्चतुरोलोकान्कल्पयामास पूर्ववत् ॥ ३४ ॥ वृत्तं ॥
इति सह महतीं च महीं महीध्रैः प्रलयमहाजलधेरधस्थमध्यात् ॥
उपरि च विनिवेश्य स विश्वकर्मा चरमचरं च जगत्ससर्ज
भूयः ॥ ३५ ॥ इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्व-
भागे नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

---

मुनीश्वरांस आणि जनलोकांत राहणाऱ्या साध्यांस फारच आनंद झाला, त्यांस मोठा आनंद होऊन त्या आनंदानें ते नाचूं लागले व त्यांनीं ब्रह्मदेवाच्या मस्तकांवर पुष्पवर्षाव केला. (३२) त्या अकराळ विकराळ वराहाचें रूप घेतलेल्या ब्रह्मदेवाचे आंगावर जेव्हां मुनीश्वरांनीं व साध्यांनीं फुलें टाकिलीं तेव्हां अंजनपर्वतावर काजव्यांचे समुदाय बसले ह्मणजे तो जसा शोभतो तसा तो ब्रह्मदेव शोभूं लागला. (३३) मग त्या वराहानें त्या मोठ्या थोरल्या पृथ्वीस तिच्या पूर्वीचे ठिकाणीं आणून आपलें पूर्वीचे (ब्रह्मदेवाचें) रूप घेऊन पृथ्वीस जागचे जागीं स्थापन केलें. [३४] पृथ्वीची चांगली व्यवस्था केल्यावर त्या पृथ्वीवर त्यानें पर्वत ठेविले, तसेच भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक आणि महर्लोक हे पूर्वीप्रमाणें जागच्या जागीं बसविले. (३५) ह्या प्रमाणें त्या विश्वकर्त्या ब्रह्मदेवानें प्रळयकाळच्या महासमुद्रांतून पृथ्वीस तिजवरील पर्वतांसह वर काढलें आणि तिला जागचे जागीं ठेवून पुन्हां स्थावर जंगम विश्व उत्पन्न करण्यास आरंभ केला.

ह्या प्रमाणें शैवनांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेपैकीं पूर्वभागांतील नववा अध्याय संपला.

---

## ॥ अथ दशमोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ सर्गं चिंतयतस्तस्य तदा वै बुद्धिपूर्वकम् ॥ प्रध्यानकाले मोहस्तु प्रादुर्भूतस्तमोमयः ॥ १ ॥ तमो मोहो महामोहस्तामिस्रश्चान्धसंज्ञितः ॥ अविद्या पञ्चमी चैषा प्रादुर्भूता महात्मनः ॥ २ ॥ पंचधावस्थितः सर्गो ध्यायतस्त्वभिमानिनः ॥ सर्वतस्तमसातीव बीजकुम्भवदावृतः ॥ ३ ॥ बहिरन्तश्चाप्रकाशः स्तब्धो निःसंज्ञ एव च ॥ तस्मात्तेषां वृता बुद्धिर्मुखानि करणानि च ॥ ४ ॥ तस्मात्ते संवृतात्मानो नगा मुख्याः प्रकीर्तिताः ॥ तं दृष्ट्वाऽसाधकं ब्रह्मा प्रथमं सर्गमीदृशम् ॥ ५ ॥ अप्रसन्नमना भूत्वा द्वितीयं सोऽभ्यमन्यत ॥ तस्याभिध्यायतः

---

वायु ह्मणतोः— १ ऋषीश्वरहो, तो ब्रह्मदेव नीट विचारपूर्वक सृष्टि कशी उत्पन्न करावी ह्याचा विचार करीत बसला असतां त्या विचाराच्या वेळीं त्याला तमोरूपी मोह उत्पन्न झाला. ( २ ) मोह पांच प्रकारचे आहेत ते असेः—तमोमोह, महामोह, तामिस्रमोह, अंधमोह आणि पांचवा अविद्यामोह. हे पांचही मोह त्या महासामर्थ्यवान् ब्रह्मदेवाला उत्पन्न झाले. ( ३ ) त्यामुळें त्या सृष्टीविषयीं विचार करणाऱ्या अभिमानी ब्रह्मदेवापासून पांच प्रकारची सृष्टि उत्पन्न झाली. एखाद्या घागरींत अगदीं कोंबून धान्य भरल्यासारखें त्या सृष्टीची स्थिति झाली, ती सृष्टि चोहोंकडून तमानें व्याप्त झाली. ( ४ ) त्यास [ त्या सर्गास ] आंत प्रकाश नाहीं, आणि बाहेरही प्रकाश नाहीं. तो सर्ग अगदीं निश्चल आणि निर्जीव असा झाला. त्यामुळें त्यांची बुद्धि, तोंडें आणि इंद्रियें हीं सर्व गुप्त होतीं ( ५ ) त्या झांकलेले बुद्धीचे प्रजेंत पर्वत हे मुख्य होत. ब्रह्मदेवानें त्या सृष्टीकडे पाहिलें तों त्यास ही सृष्टि निरुपयोगी आहे असें वाटलें. ( ६ ) त्यामुळें ब्रह्मदेवाच्या मनास अतिशय वाईट वाटून त्यानें दुसरी सृष्टि निर्माण

सर्गं तिर्यक्स्रोतोऽभ्यवर्तत ॥ ६ ॥ अन्तः प्रकाशास्तिर्यंच आवृताश्च बहिः पुनः ॥ पश्वात्मानस्ततो जाता उत्पथग्राहिणश्च ते ॥ ७ ॥ तमप्यसाधकं ज्ञात्वा सर्गमन्यममन्यत ॥ तदोर्ध्वस्रोतसो वृत्तो देवसर्गस्तु सात्विकः ॥ ८ ॥ ते सुखप्रीतिबहुला बहिरन्तश्च नावृताः ॥ प्रकाशा बहिरन्तश्च स्वभावाद्देवसंज्ञिताः ॥ ॥ ९ ॥ ततोऽभिध्यायतोऽव्यक्तादर्वाक्स्रोतस्तु साधकः ॥ मनुष्यनामा संजातः सर्गो दुःखसमुत्कटः ॥ १० ॥ प्रकाशा बहिरन्तस्ते तमोद्रिक्ता रजोऽधिकाः ॥ पंचमोऽनुग्रहः सर्गश्चतुर्धा संव्यवस्थितः ॥ ११ ॥ विपर्ययेण शक्त्या च तुष्ट्या सिद्ध्या

---

करण्याचा विचार केला. ब्रह्मदेव असा विचार करीत असतां त्यापासून वांकडा एक प्रवाह उत्पन्न झाला. ( ७ ) त्या सृष्टीस मनांत मात्र ज्ञान असून ते बाहेरून अज्ञानानें व्यापलेले होते, ते तिर्यक् प्राण्यासारखे झाले, व त्यांचे देह पशूच्या देहासारखे होते. व ते भलत्या मार्गानें जाऊं लागले, त्यांस चांगलें काय आणि वाईट काय ? हें मुळींच समजेना. ( ८ ) तो सर्गही ब्रह्मदेवास आवडला नाहीं, ह्मणून तो दुसरा सर्ग उत्पन्न करण्याचा विचार करूं लागला. तेव्हां त्या ब्रह्मदेवाला ऊर्ध्वस्रोता [ प्रवाहापासून ] देवसृष्टि उत्पन्न झाली, आणि ती सृष्टिही सत्वगुणी होती. ( ९ ) ते देव नेहमीं सुखांत निमग्न असत, त्यांस आंत आणि बाहेर दोहोंकडेही ज्ञान होतें, त्यांस देव असें नांव पडलें, ( १० ) त्यानंतर आणखीही सृष्टि उत्पन्न करण्याचा ब्रह्मदेव विचार करूं लागला, तेव्हां त्याला अव्यक्त नांवाच्या अर्वाक् [ खालचे बाजूच्या ] प्रवाहापासून मनुष्य नांवाची सृष्टि उत्पन्न झाली, ती सृष्टि मात्र त्याच्या उपयोगीं पडण्यासारखी होती. ह्या मनुष्यजातीमध्यें दुःखें अतिशयित होतीं. ( ११ ) त्या मनुष्यांस आंत बाहेर ज्ञान असून त्यांच्या अंगीं तमोगुणही जास्त होता आणि रजोगुणही जास्त होता. पांचवा सर्ग तो अनुग्रह सर्ग होय. तो चार प्रकारचा होऊन राहिला. [ झाला. ] ( १२ ) विपर्यय, शक्ति, तुष्टि आणि सिद्धि हे त्या

तथैव च ॥ तेऽपरिग्राहिणः सर्वे संविभागरताः पुनः ॥ १२ ॥
खादनाश्चाप्यशीलाश्च भूताद्याः परिकीर्तिताः ॥ प्रथमो महतः
सर्गो ब्रह्मणः परमेष्ठिनः ॥ १३ ॥ तन्मात्राणां द्वितीयस्तु भूत-
सर्गः स उच्यते ॥ वैकारिकस्तृतीयस्तु सर्ग ऐन्द्रियकः स्मृतः ॥
॥ १४ ॥ इत्येष प्रकृतेः सर्गः सम्भूतोऽबुद्धिपूर्वकः ॥ मुख्यस-
र्गश्चतुर्थस्तु मुख्या वै स्थावराः स्मृताः ॥ १५ ॥ तिर्यक्स्रो-
तस्तु यः प्रोक्तस्तिर्यग्योनिः स पंचमः ॥ तदोर्ध्वस्रोतसः षष्ठो
देवसर्गस्तु स स्मृतः ॥ १६ ॥ ततोऽर्वाक्स्रोतसां गः सप्तमः
स तु मानुषः ॥ अष्टमोऽनुग्रहः सर्गः कौमारो नवमः स्मृतः ॥
॥ १७ ॥ प्राकृताश्च त्रयः पूर्वे सर्गास्तेऽबुद्धिपूर्वकाः ॥ बुद्धिपूव

---

सर्गाचे चार भेद होत, ते सर्वजण परिग्रह करणारे जरी नव्हते तरी एकमेकांचा विभाग करण्यांत नेहमीं गुंतलेले असत. (१३) ते सर्व खादाड असून दुर्वर्तनी होते, त्यांस भूत प्रेत पिशाच वगैरे ह्मणतात, परमेष्ठी ब्रह्मदेवाचा हाच पहिला सर्ग होय. (१४) तन्मात्रांचा दुसरा सर्ग होय, त्यास भूतसर्ग असें ह्मणतात, वैका-रिक हा तिसरा सर्ग. त्यास ऐंद्रियक सर्ग असें ह्मणतात. ( १५ ) हा सर्ग प्रकृतीपासून उत्पन्न झाला, ह्या सर्गास बुद्धिपूर्वक उत्पन्न झालेला सर्ग असें ह्मणतात. मुख्य सर्ग हा चवथा सर्ग होय, आणि मुख्यालाच स्थावर असें ह्मणतात. ( १६ ) तिर्यक्स्रोत ज्याला ह्मणतात तीच पशुपक्ष्यांची योनि होय. हा पांचवा सर्ग समजावा. त्यानंतर ऊर्ध्वस्रोत ह्मणून जो सांगितला हा सहावा सर्ग होय, ह्याला देवसर्ग असें ह्मणतात. ( १७ ) ह्या सहाव्या स-र्गानंतर अर्वाक्स्रोतांचा जो सर्ग सांगितला त्यास सातवा सर्ग ह्मणतात, तीच मनुष्यसृष्टि होय. आठव्या सर्गाचें नांव अनुग्रह-सर्ग असें असून नवव्या सर्गास कौमारसर्ग असें ह्मणतात. (१८) ह्या नऊ सर्गांपैकीं पहिले तीन सर्ग प्राकृत सर्ग होत, हे अबुद्धी-पासून [ अज्ञानापासून ] उत्पन्न झाले. मुख्यापासून पुढले जे पांच

प्रवर्तन्ते मुख्याद्याः पंच वैकृताः ॥ १८ ॥ अग्रे ससर्ज वै ब्रह्मा मानसानात्मनः समान् ॥ सनन्दं सनकं चैव विद्वांसं च सनातनम् ॥ १९ ॥ ऋभुं सनत्कुमारं च पूर्वमेव प्रजापतिः ॥ सर्वे ते योगिनो ज्ञेया वीतरागा विमत्सराः ॥ २० ॥ ईश्वरासक्तमनसो न चक्रुः सृष्टये मतिम् ॥ तेषु सृष्ट्यनपेक्षेषु गतेषु सनकादिषु ॥ २१ ॥ स्रष्टुकामः पुनर्ब्रह्मा ततप परमं तपः ॥ तस्यैवं तप्यमानस्य न किंचित्समवर्तत ॥ २२ ॥ ततो दीर्घेण कालेन दुःखात्क्रोधो व्यजायत ॥ क्रोधाविष्टस्य नेत्राभ्यां प्रापतन्नश्रुबिन्दवः ॥ २३ ॥ ततस्तेभ्योऽश्रुबिन्दुभ्यो भूताः

---

सर्ग आहेत ते बुद्धीपासून उत्पन्न झाले व त्या पांच सर्गांस वैकृत सर्ग असें ह्मणतात. ( १९ ) ब्रह्मदेवानें अगोदर आपल्या मनापासून आपल्यासारखे सामर्थ्यवान् असे पांचजण मानसपुत्र उत्पन्न केले, त्यांचीं नांवें १ सनंदन २ सनक ३ सनातन (२०) ४ ऋभु ५ सनत्कुमार अशीं होतीं, ते सर्वजण मोठे योगी होते, त्यांस कोणत्याही गोष्टीची आवड नसून ते कोणाचाही हेवा करीत नव्हते. ( २१ ) त्यांचीं मनें नेहमीं ईश्वर भजनांत गढून गेलीं होतीं, त्यांनीं सृष्टि उत्पन्न करण्याकडे आपलें लक्षच दिलें नाहीं. मग सृष्टि उत्पन्न करण्याचे कामीं दुर्लक्ष्य करणारे ते सनकादिक मानसपुत्र निघून गेल्यावर ( २२ ) सृष्टि उत्पन्न करण्याकरितां ब्रह्मदेव पुन्हां तपश्चर्या करूं लागला, ब्रह्मदेव तपश्चर्या करूं लागला खरा, परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. ( २३ ) आपण फार दिवस तपश्चर्या केली तरी तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं असें पाहून ब्रह्मदेवास फारच वाईट वाटलें, आणि त्यास ह्या गोष्टीचा मोठा राग आला; तेव्हां त्याच्या रागानें तारवटलेल्या [ लाल झालेल्या ] डोळयांतून दुःखाश्रूचे थेंब पडले. ( २४ ) तेव्हां त्या दुःखाश्रूंपासून लागलेच भूतप्रेत उत्पन्न झाले,

प्रेतास्तदाऽभवन् ॥ सर्वांस्तानश्रुजान्दृष्ट्वा ब्रह्माऽऽत्मानमनिन्दत ॥ ॥ २४ ॥ तस्य तीव्राऽभवन्मूर्च्छा क्रोधामर्षसमुद्भवा ॥ मूर्च्छितस्तु जहौ प्राणान्क्रोधाविष्टः प्रजापतिः ॥ २५ ॥ ततः प्राणेश्वरो रुद्रो भगवान्नीललोहितः ॥ प्रसादमतुलं कर्तुं प्रादुरासीत्प्रभोर्मुखात् ॥ २६ ॥ दशधा चैकधा चक्रे स्वात्मानं प्रभुरीश्वरः ॥ ते तेनोक्ता महात्मानो दशधा चैकधा कृताः ॥ २७ ॥ यूयं सृष्टा मया वत्सा लोकानुग्रहकारणात् ॥ तस्मात्सर्वस्य लोकस्य स्थापनाय हिताय च ॥ २८ ॥ प्रजासन्तानहेतोश्च प्रयतध्वमतंद्रिताः ॥ एवमुक्ताश्च रुरुदुर्दुद्रुवुश्च समन्ततः ॥ २९ ॥ रोदनाद्द्रावणाच्चैव ते रुद्रा नामतः स्मृताः ॥ ये

---

आपल्या दुःखाश्रूंपासून अनेक प्रेतें व भूतें उत्पन्न झालीं असें पाहून ब्रह्मदेव आपली आपणच निंदा करूं लागला. ( २५ ) व त्या रागामुळें त्याला तर एकदम घेरी आली, आणि तो बेसावध होऊन जमीनीवर पडला. आणि तशा रागावलेल्या स्थितींतच ब्रह्मदेव बेसावध असतांनाच मरण पावला. ( २६ ) तेव्हां प्राणांचा ईश्वर, रुद्र, भगवान्, नीललोहित [ शंकर ] त्या ब्रह्मदेवावर मोठी कृपा [ अनुग्रह ] करण्याकरितां ब्रह्मदेवाच्या मुखापासून प्रकट झाला. ( २७ ) त्या परमेश्वर श्रीशंकरानें एकदम आपल्या शरीरापासून अकरा प्रकारचीं रूपें घेतलीं आणि त्या महात्म्या अकरा रुद्रांस उद्देशून परमेश्वर ह्मणूं लागला. ( २८ ) मुलानों, तुह्मी माझ्या कृपेपासून उत्पन्न झाला आहां, [ तुह्मांस मीं उत्पन्न केलें आहे ] ह्यासाठीं तुह्मी सर्वजण लोकांचें कल्याण करण्यास झटा व त्यांचें कल्याण होईल असें करा. ( २९ ) तुह्मी आळस न करतां प्रजावृद्धि करण्याकरितां प्रयत्न करा. शंकरांनीं त्या अकरा रुद्रांस असें ह्मटल्यावरोबर ते सर्वजण रडूं लागले व आजूबाजूस पळून जाऊं लागले. ( ३० ) शंकरांनीं "तुह्मीं सर्वजण प्रजावृद्धि करा" ह्मटल्यावरोबर ते अकराजण

रुद्रास्ते खलु प्राणा ये प्राणास्ते महात्मकाः ॥ ३० ॥ ततो मृतस्य
देवस्य ब्रह्मणः परमेष्ठिनः ॥ घृणी ददौ पुनः प्राणान्ब्रह्मपुत्रो महे-
श्वरः ॥ ३१ ॥ प्रहृष्टवदनो रुद्रः प्राणप्रत्यागमाद्विभोः ॥ अभ्यभाष-
त विश्वेशो ब्रह्माणं परमं वचः ॥ ३२ ॥ मा भैर्मा भैर्महाभाग वि-
रिंच जगतां गुरो ॥ मया ते प्राणिताः प्राणाः सुखमुत्तिष्ठ सुव्रत
॥ ३३ ॥ स्वप्नानुभूतमिव तच्छ्रुत्वा वाक्यं मनोहरम् ॥ हरं निरी-
क्ष्य शनकैर्नेत्रैः फुल्लाम्बुजप्रभैः ॥ ३४ ॥ तथा प्रत्यागतप्राणः स्नि-
ग्धगम्भीरया गिरा ॥ उवाच वचनं ब्रह्मा तमुद्दिश्य कृताञ्जलिः
॥ ३५ ॥ भो भो वद महाभाग आनन्दयसि मे मनः ॥ को भवा-
न्विश्वमूर्तिस्त्वं स्थित एकादशात्मकः ॥ ३६ ॥ तस्य तद्वचनं

---

रडूं लागले व पळून जाऊं लागले त्यामुळें त्यांस रुद्र असें नांव पडलें. जे अकरा रुद्र तेच प्राण होत. आणि जे प्राण तेच महातत्वस्वरूप होत. ( ३१ ) त्या दयाळु महेश्वरानें आपण स्वतः ब्रह्मदेवाचा पुत्र होऊन त्या मरण पावलेल्या ब्रह्मदेवास पुन्हां प्राण आणले, [ त्यास जिवंत केलें. ] ( ३२ ) मग तो सर्व विश्वांचा अधिपति श्रीशंकर हास्यमुख करून पुन्हां जिवंत झालेल्या ब्रह्मदेवास मधुर शब्दानें ह्मणूं लागला. ( ३३ ) हे ब्रह्मदेवा, तूं सर्व जगांचा अधिपति आहेस, तूं भिऊं नकोस, भिऊं नकोस. मी तुझे तुला प्राण परत आणून दिले आहेत, हे सदाचारी ब्रह्मदेवा, तूं आतां सुखानें ऊठ. [ ३४ ] तें गोड गोड भाषण ऐकून ब्रह्मदेवास गमतीचें स्वप्न पडल्यासारखें वाटलें. मग तो आनंदानें हळू हळू प्रफुल्लित कमलाप्रमाणें सुशोभित दिसणारे डोळे उघडून शंकराकडे पाहूं लागला. ( ३५ ) आणि पुन्हां जिवंत झालेला तो ब्रह्मदेव कोमल आणि प्रौढ शब्दांनीं त्या शिवाला उद्देशून दोन्ही हात जोडून ह्मणूं लागला. ( ३६ ) अरे अरे सज्जन मनुष्या, तूं माझ्या मनास संतोष देत आहेस, तूं कोण आहेस ? तूं त्रैलोक्यस्वरूप आहेस, तरी आतां ह्यावेळीं माझ्या समोर अकरा रूपें घेऊन उभा राहिला आहेस ? ( ३७ ) ब्रह्मदेवाचें तें बोलणें

श्रुत्वा व्याजहार महेश्वरः ॥ स्पृशन्कराभ्यां ब्रह्माणं सुमुखा भ्यां सुरेश्वरः ॥ ३७ ॥ मां विद्धि परमात्मानं तव पुत्रत्वमागतम् ॥ एते चैकादश रुद्रास्त्वां सुरक्षितुमागताः ॥ ३८ ॥ तस्मात्त्विमा- मिमां मूर्च्छां विधूय मदनुग्रहात् ॥ प्रबुद्धश्च यथापूर्वं प्रजा वै स्रष्टुमर्हसि ॥ ३९ ॥ एवं भगवता प्रोक्तो ब्रह्मा प्रीतमना बभूव ॥ नामाष्टकेन विश्वात्मा तुष्टाव परमेश्वरम् ॥ ४० ॥

ब्रह्मोवाच ॥ नमस्ते भगवन्रुद्र भास्करामिततेजसे ॥ न- मो भवाय देवाय रसायाम्बुमयात्मने ॥ ४१ ॥ शर्वाय क्षितिरूपा- य नंदीसुरभिणे नमः ॥ ईशाय वसवे तुभ्यं नमः स्पर्शमयात्मने ॥ ॥ ४२ ॥ पशूनां पतये चैव पावकायातितेजसे ॥ भीमाय व्योम

---

ऐकून महेश्वर देवाधिदेवानें अगोदर आपले दोन्ही हात ब्रह्मदेवाचे अंगावर फिरवून त्यास कुरवाळिलें. आणि मग ह्मणाले. (३८) ब्रह्मदेवा, मी स्वतः परमेश्वर आहे, तरी हल्लीं मी तुझा पुत्र झालों आहें, हे अकराजण रुद्र आहेत, हे सर्वजण तुझें रक्षण करावया- साठीं येथें आले आहेत. [ ३९ ] ह्यासाठीं तुला इतका वेळ जी भयंकर मूर्च्छा आली होती, ती सर्व सोडून दे. माझी तुजवर पूर्ण कृपा आहे, त्या कृपेच्या सामर्थ्यानें सावध हो, आणि पूर्वीं जशीं तूं सृष्टि उत्पन्न करण्याचीं कामें करीत होतास, तशीं आतांही कर. [ ४० ] असें परमेश्वर श्रीशिवानें ह्मटल्याबरोबर ब्रह्मदेवास मोठा संतोष वाटला, आणि त्या विश्वस्वरूपी ब्रह्मदेवानें आठ नांवें घेऊन शिवाची स्तुति करण्यास आरंभ केला.

(४१) ब्रह्मदेव ह्मणालाः— हे परमेश्वरा, रुद्रा, तुझें सूर्या- पेक्षां देखील जास्त तेज आहे, तुला भव, देव आणि रस अशीं नांवें आहेत, तूं जलस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. [४२] तूं शर्व असें नांव धारण करितोस, तूं पृथ्वीस्वरूप आहेस, तुला नंदि आणि सुरभि असेंही नांव आहे, तुला ईश्वर आणि वसु अ- सेंही ह्मणतात, तूं परिसमण्यासारखा आहेस, त्या तुला नमस्कार असो. [ ४३ ] तुला पशुपति असें ह्मणतात, तूं अग्नीपेक्षांही जास्त

रूपाय शब्दमात्राय ते नमः ॥ ४३ ॥ उग्रायोग्रस्वरूपाय यजमानात्मने नमः ॥ महादेवाय सोमाय नमोऽस्त्वमृतमूर्तये ॥ ४४ ॥ एवं स्तुत्वा महादेवं ब्रह्मा लोकपितामहः ॥ प्रार्थयामास विश्वेशं गिरा प्रणतिपूर्वया ॥ ४५ ॥ भगवन्भूतभव्येश मम पुत्र महेश्वर ॥ सृष्टिहेतोस्त्वमुत्पन्नो ममाङ्गेऽनंगनाशन ॥ ४६ ॥ तस्मान्महति कार्येऽस्मिन्व्यापृतस्य मम प्रभो ॥ साहाय्यं कुरु सर्वत्र स्रष्टुमर्हसि सुप्रजाः ॥ ४७ ॥ तेनैवं याचितो देवो रुद्रस्त्रिपुरमर्दनः ॥ बाढमित्येव तां वाणीं प्रतिजग्राह शंकरः ॥ ४८ ॥ ततः स भगवान्ब्रह्मा त्हृष्टस्तमभिवन्द्य च ॥ स्रष्टुं तेनाभ्यनुज्ञातस्तथान्याश्चासृजत्प्र-

---

तेजस्वी आहेस, तुला भीम ह्मणतात, तूं आकाशस्वरूप असून शब्दस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. ( ४४ ) तुला उग्र ह्मणतात, तसें तुझें स्वरूपही उग्रच आहे, तूं यजमानाचा आत्मा आहेस, तुला नमस्कार असो, तुला महादेव आणि सोम अशीं नांवें आहेत, तूं अमृतस्वरूपी आहेस. [ ४५ ] ह्याप्रमाणें सर्व त्रैलोक्याचा पितामह तो ब्रह्मदेव त्या त्रैलोक्यपति महादेवाची स्तुति करून नम्रतेनें ह्मणूं लागला. [ ४६ ] परमेश्वरा, तूं भूत आणि वर्तमानकाळाचा अधिपति आहेस, हे महेश्वरा, तूं माझा मुलगा झालास, तूं मदनाला जाळून टाकिलेंस. माझ्या हातून सृष्टीचीं कामें पूर्वींप्रमाणें चालावीं ह्मणून तूं माझ्या शरीरापासून उत्पन्न झालास. ( ४७ ) मीं हें आरंभिलेलें काम फारच मोठें आहे, त्यांमध्यें मी नेहमीं गुंतलेला असतों, त्यांत मला तूं सहाय्य कर आणि तूं माझे हातून सर्व ठिकाणीं प्रजा उत्पन्न करीव आणि तूंही प्रजा उत्पन्न कर. (४८) ब्रह्मदेवानें अशी शंकराची प्रार्थना केल्यावर त्या त्रिपुरांचा विध्वंस करणाऱ्या महादेवानें “ बरें आहे ” ह्मणून त्याची विनंति मान्य केली. ( ४९ ) शंकरानें आपली विनंति मान्य केली असें पाहून त्या परमेश्वर ब्रह्मदेवाला मोठा संतोष झाला, त्यानें शंकरास नमस्कार केला व सृष्टि उत्पन्न करण्याची शिवाची आज्ञा घेऊन त्यानें आणखी

जाः॥ ४९॥ मरीचिभृग्वंगिरसः पुलस्त्यं पुलहं क्रतुम् ॥ दक्षमत्रिं वसिष्ठं च सोऽसृजन्मनसैव च ॥ ५० ॥ पुरस्तादसृजद्ब्रह्मा धर्मं संकल्पमेव च ॥ इत्येते ब्रह्मणः पुत्रा द्वादशादौ प्रकीर्तिताः ॥५१॥ सह रुद्रेण सम्भूताः पुराणा गृहमेधिनः ॥ तेषां द्वादशवंशाः स्युर्दिव्या देवगणार्चिताः ॥ प्रजावन्तः क्रियावन्तो महर्षिभिरलंकृताः ॥ ५२ ॥ अथ देवासुरपितॄन्मनुष्यांश्च चतुष्टयम् ॥ मह रुद्रेण सिसृक्षुरम्भस्येतानि वै विधिः ॥ ५३॥ सृष्ट्यर्थं वै समाधाय ब्रह्मात्मानमयूयुजत् ॥ मुखादजनयद्देवान्पितॄंश्चैवोपपक्षतः ॥ ५४ ॥ जघनादसुरान्सर्वान्प्रजनाद्दपिमानुषान् ॥ अवस्करे क्षुधाविष्टा रा-

---

दुसऱ्या प्रजा उत्पन्न केल्या. [ ५० ] मरीची, भृगु, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, ऋतु, दक्ष, अत्रि आणि वसिष्ठ असे नऊ मानसपुत्र ब्रह्मदेवानें मनापासूनच उत्पन्न केले. [ ५१ ] हे नऊ मानसपुत्र उत्पन्न करण्याच्या आधींच ब्रह्मदेवानें धर्म आणि संकल्प हे दोन पुत्र उत्पन्न केले होते, असे हे बारा मुलगे ब्रह्मदेवाचे अगोदरच सांगितले आहेत. [ ५२ ] ते सर्वजण रुद्राबरोबर उत्पन्न झाले, ते अनादिकालापासून जन्मलेले असून ते सर्व गृहस्थाश्रमी होते. त्या ब्रह्मदेवाच्या बारा मुलांचे बारा वंश झाले, ते सर्व अत्यन्त तेजस्वी असून ते देवादिकांच्या समुदायास वंद्य होते. [ देवादिक त्यांस मानीत असत. ] ते सर्व मुलेंबाळें असणारे, क्रियाकर्म [ यज्ञ देवपूजा वगैरे सदाचारांचीं कृत्यें ] करणारे, आणि महान्‌महान् ऋषींनें प्रशंसा करण्यासारखे असे होते. ( ५३ ) मग ब्रह्मदेव श्रीशिवाच्या ( रुद्राच्या ) सहाय्यानें देव, दैत्य, पितृ आणि मनुष्य अशीं चार जातींची प्रजा उत्पन्न करण्याचा विचार करूं लागला. ( ५४ ) त्यानें ही चार जातीची प्रजा उत्पन्न करण्याकरितां एकाग्र मन करून ध्यान धरिलें, त्यानें आपल्या तोंडापासून देवांस उत्पन्न केलें, आणि दोन्ही बगलांपासून पितरांस उत्पन्न केलें. ( ५५ ) त्यानें आपल्या पुढल्या बेंबीखालील भागापासून दैत्यांस उत्पन्न करून शिश्नापासून मनुष्यांस उत्पन्न केलें. त्याच्या

क्षसास्तस्य जज्ञिरे ॥ ५५ ॥ पुत्रास्तमोरजःप्राया बलिनस्ते निशा-
चराः ॥ सर्पा यक्षास्तथा भूता गन्धर्वाः सम्प्रजज्ञिरे ॥ ५६ ॥ व-
यांसि पक्षतः सृष्टाः पक्षिणो वक्षसोऽसृजत् ॥ मुखतोऽजांस्तथा
पार्श्वादुरगांश्च विनिर्ममे ॥ ५७ ॥ पद्भ्यां चाश्वान्समातंगाञ्छर-
भान्गवयान्मृगान् ॥ उष्ट्रानश्वतरांश्चैव न्यंकूनन्यांश्च जातयः
॥ ५८ ॥ ओषध्यः फलमूलानि रोमभ्यस्तस्य जज्ञिरे ॥ गा-
यत्रीञ्च ऋचश्चैव त्रिवृत्स्तोमं रथन्तरम् ॥ अग्निष्टोमं च यज्ञानां
निर्ममे प्रथमान्मुखात् ॥ ५९ ॥ यजूंषि त्रैष्टुभं छन्दः स्तोमं पंच-
दशं तथा ॥ बृहत्साम तथोक्थं च दक्षिणादसृजन्मुखात् ॥ ६० ॥
सामानि जगतीच्छन्दः स्तोमं सप्तदशं तथा ॥ वैरूपमतिरात्रं च प-
श्चिमादसृजन्मुखात् ॥ ६१ ॥ एकविंशमथर्वाणमाप्तोऽर्यामाणमेव च ॥

---

मलमूत्रापासून भुकेनें कासाविस झालेले राक्षस जन्मले. ( ५६ ) ते सर्व राक्षस ब्रह्मदेवाचे मुलगे असून ते रजोगुणी व तमोगुणी होते, ते सर्व मोठे बळकट असून ते नेहमीं रात्रीं फिरावयास निघतात. तसेच ब्रह्मदेवापासून साप, यक्ष, भूत आणि गंधर्व हे उत्पन्न झाले. ( ५७ ) त्यानें आपल्या उराच्या दोन्ही बाजूकडून पक्षी उत्पन्न केले. त्यानें आणखी आपल्या तोंडापासून शेळ्या मेंढ्या उत्पन्न केल्या, आणि पाठीकडील बाजूपासून सर्प उत्पन्न केले. ( ५८ ) त्यानें आपल्या पायापासून घोडे, हत्ती, शरभ, गवय, मृग, तसेच उंट, खेंचर, हरिण आणि अशाच प्रकारचीं दुसरीं जनावरें उत्पन्न केलीं. ( ५९ ) औषधि, फळें आणि मूळें हीं सर्व त्या ब्रह्मदेवाच्या अंगावरील रोमांपासून उत्पन्न झालीं. गायत्री, ऋचा, त्रिवृत्स्तोम, रथन्तर आणि अग्निष्टोम हे सर्व त्यानें यज्ञाकरितां आपल्या पहिल्या मुखापासून उत्पन्न केले. ( ६० ) यजुर्वेद, त्रैष्टुभछंद, पंचदशस्तोम, बृहत्साम, आणि उक्थ हे त्या ब्रह्मदेवानें दक्षिणेकडील मुखापासून उत्पन्न केले. ( ६१ ) साम, जगतीच्छंद, तसाच सप्तदशस्तोम, वैरूप आणि अतिरात्र हीं सर्व ब्रह्मदेवानें पश्चिमेकडील मुखापासून उत्पन्न केलीं. ( ६२ ) एकविंश अथर्वाण, आप्तोर्यामाण, अनुष्टुभ

अनुष्टुभं स वैराजमुत्तरादसृजन्मुखात् ॥ उच्चावचानि भूतानि गात्रेभ्यस्तस्य जज्ञिरे ॥ ६२ ॥ यक्षाः पिशाचा गंधर्वास्तथैवाप्सरसां गणाः ॥ नरकिन्नररक्षांसि वयःपशुमृगोरगाः ॥ ६३ ॥ अव्ययं चैव यदिदं जगत्स्थावरजंगमम् ॥ तेषां वै यानि कर्माणि प्राक्सृष्ट्यां प्रतिपेदिरे ॥ ६४ ॥ तान्येव ते प्रपद्यंते सृज्यमानाः पुनः पुनः ॥ हिंस्राहिंस्रे मृदुक्रूरे धर्माधर्मावृतानृते ॥ तद्भाविताः प्रपद्यंते तस्मात्तत्तस्य रोचते ॥ ६५ ॥ महाभूतेषु नानात्वमिंद्रियार्थेषु मुक्तिषु ॥ विनियोगं च भूतानां धातैव विदधत्स्वयम् ॥ ६६ ॥ ॥ नामरूपं च भूतानां प्राकृतानां प्रपंचनम् ॥ वेदशब्देभ्य एवादौ निर्ममेऽसौ पितामहः ॥ ६७ ॥ आर्षाणि चैव नामानि याश्च वेदेषु दृष्टयः ॥ शर्वर्यंते प्रसूतानां तान्येवैभ्यो ददावजः ॥ ६८ ॥

---

आणि वैराज हे त्यानें उत्तरेकडील तोंडापासून उत्पन्न केलीं. ह्याखेरीज इतर लहान प्राणी हे सर्व त्या ब्रह्मदेवाच्या शरीरापासून उत्पन्न झाले. ( ६३ ) यक्ष, पिशाच, गंधर्व, तसेच अप्सरांचे समुदाय, मनुष्य, किन्नर, राक्षस, पक्षी, ग्राम्यपशु, आणि वनपशु, साप ( ६४ ) तसेंच जें हें स्थावर जंगम विश्व दिसत आहे तें सर्व अविनाशी आहे, त्यांचीं जीं जीं कांहीं कर्मे आहेत तीं तीं सर्व पहिल्यां सृष्टींत ब्रह्मदेवानें निर्माण करून ठेविलीं आहेत. ( ६५ ) प्राणिमात्र पुन्हां पुन्हां जन्मास आले ह्मणजे तीं तीं कर्मे त्यांस त्यांस जाऊन मिळतात. जीव घेणारें, जीव न घेणारें, शांतपणाचें, क्रूरपणाचें, धर्माचरणाचें, दुराचाराचें, खरें आणि खोटें हें ज्या प्राण्याला जसें आवडते ते ते गुण त्याच्या अंगांत शिरतात. आणि पुढें त्याला तेंच बरें वाटूं लागतात. ( ६६ ) महाभूतांमध्यें, इंद्रियांमध्यें आणि मुक्तीमध्यें अनेकपणा आणि प्राणिमात्रांची अदलाबदल हीं सर्व कामें स्वतः ब्रह्मदेवच करितो. ( ६७ ) प्राणिमात्रांचें नांव आणि रूप, आणि प्राकृतांची व्यवस्था ही सर्व ब्रह्मदेवानें वेदाच्या शब्दावरून अगोदरच लाविलेली आहे. ( ६८ ) वेदांत जीं कांहीं आर्ष नांवें आहेत व ज्या कांहीं दृष्टि आहेत तीं सर्व नांवें आणि त्या सर्व दृष्टि रात्र संपून उजाडल्यावर त्या प्रजेस तीं ब्रह्मदेव देतो.

यथर्तुऋतुलिंगानि नानारूपातिपर्यये ॥ दृश्यंते तानि तान्येव तथा भावा युगादिषु ॥ ६९ ॥ इत्येष करणोद्भूतो लोकसर्गः स्वयंभुवः ॥ महदाद्यो विशेषान्तो विकारः प्रकृतेः स्वयम् ॥ ७० ॥ चन्द्रसूर्यप्रभाजुष्टो ग्रहनक्षत्रमण्डितः ॥ नदीभिश्च समुद्रैश्च पर्वतैश्च स मण्डितः ॥ ७१ ॥ पुरैश्च विविधैरम्यैः स्फीतैर्जनपदैस्तथा ॥ तस्मिन्ब्रह्मवने व्यक्तो ब्रह्मा चरति सर्ववित् ॥ ७२ ॥ अव्यक्तबीजप्रभव ईश्वरानुग्रहे स्थितः ॥ बुद्धिस्कन्धमहाशाख इन्द्रियांतरकोटरः ॥ ७३ ॥ महाभूतप्रमाणश्च विशेषामलपल्लवः ॥ धर्माधर्मसुपुष्पाढ्यः सुखदुःखफलोदयः ॥ आजीव्यः सर्वभूतानां ब्रह्मवृक्षः सनातनः ॥७४॥ वृत्तं ॥ द्यां मूर्द्धानं तस्य विप्रा वदंति खं वै नाभिं चंद्रसुर्यौ च नेत्रे ॥

---

(६९) जशीं ऋतूंचीं लक्षणें, अनेक प्रकारचीं रूपें आणि पर्याय दिसतात तींच रूपें आणि तेच पर्याय प्रत्येक युगांत असतात. ( ७० ) ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाची ही लोकसृष्टि साधनांच्या द्वारानें उत्पन्न होते, त्या लोकसृष्टीचें महत्तत्व हें मूळ असून विशेषतत्व हा शेवट आहे, हा सर्व स्वतः प्रकृतीचा विकार आहे. ( ७१ ) हीं ब्रह्मदेवाची लोकसृष्टि चंद्रसूर्य यांचा प्रकाश असल्यामुळें व आकाशांत ग्रह, नक्षत्र वगैरे असल्यामुळें सुशोभित दिसते. ह्या लोकसृष्टींत नद्या आहेत, समुद्र आहेत, पर्वत आहेत, त्यामुळें त्या सृष्टीला शोभा आली आहे. ( ७२ ) ह्या लोकसृष्टींत सुशोभित नगरें अनेक आहेत, तसेंच मोठमोठाले देशही अनेक आहेत, त्या ब्रह्मवनामध्यें तो सर्व कांहीं जाणणारा ब्रह्मदेव स्पष्ट रीतीनें राहतो, ( ७३ ) अव्यक्तबीज हें त्याचें मूळकारण आहे, तो ईश्वराच्या कृपेनें राहतो, बुद्धि ही त्या वृक्षाची लहान मोठी फांदी आहे, इंद्रियें हीं त्या झाडावरील कोठे [ पक्षी राहण्याची घरें ] आहेत, ( ७४ ) महाभूत हीं त्या वृक्षाची उंची आहे, आणि विशेषतत्व हीं त्या झाडाचीं चांगलीं पानें आहेत. धर्म आणि अधर्म नांवाचीं त्याचीं दोन फुलें असून सुख आणि दुःख ही त्यांचीं दोन फळें आहेत. हा ब्रह्मवृक्ष अनादिकालापासून असून सर्व प्राणिमात्र त्यापासूनच आपलें उपजीवन करितात. ( ७५ ) ब्राह्मण ह्मणतात कीं, स्वर्गलोक हें त्या वृक्षाचा शेंडा आहे, आकाश हें त्याची

दिशः श्रोत्रे चरणौ च क्षितिं च सोऽचिंत्यात्मा सर्वभूतप्रणेता ॥ ॥ ७५ ॥ वक्त्रात्तस्य ब्राह्मणाः संप्रसूतास्तद्वक्षसः क्षत्रियाः पूर्वभागात् ॥ वैश्या ऊरुभ्यां तस्य पद्भ्यां च शूद्राः सर्वे वर्णा गात्रतः संप्रसूताः ॥ ७६ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीय संहितायां पूर्वभागे सृष्टिनिरूपणं नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

---

वेत्री आहे, आणि चंद्रसूर्य हे दोन डोळे आहेत, दहा दिशा त्याचे कान आहेत, व पृथ्वी हीं त्याचे पाय आहेत त्या परमेश्वराचें यथार्थ ज्ञान कोणासच होत नसून तो सर्व प्राणिमात्रांस आपल्या इच्छेप्रमाणें वागवितो. ( ७६ ) त्या परमेश्वराच्या तोंडापासून ब्राह्मण उत्पन्न झाले, त्या उराच्या पहिल्या भागापासून क्षत्रिय उत्पन्न झाले, त्याच्या मांड्यांपासून वैश्य उत्पन्न झाले, पायांपासून शूद्र उत्पन्न झाले आणि इतर सर्व अवयवांपासून इतर सर्ववर्ण उत्पन्न झाले.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवीय संहितेपैकीं पूर्वभागांतील सृष्टिनिरूपणनांवाचा दहावा अध्याय संपला.



## ॥ अथ एकादशोऽध्यायः ॥

ऋषय ऊचुः ॥ भवता कथिता सृष्टिर्भवस्य परमात्मनः ॥ चतुर्मुखमुखात्तत्र संशयो नः प्रजायते ॥ १ ॥ देवश्रेष्ठो विरूपाक्षो दीप्तः शूलधरो हरः ॥ कालात्मा भगवान्रुद्रः कपर्दी नीललोहितः ॥ २ ॥ सब्रह्मकमिमं लोकं सविष्णुं च सपावकम् ॥ यः संहरति संक्रुद्धो युगांते समुपस्थिते ॥ ३ ॥ यस्य ब्रह्मा च विष्णुश्च प्रणामं कुरुतो भयात् ॥ लोकसंकोचकस्यास्य यस्य तौ वशवर्तिनौ ॥ ४ ॥ योऽयं देवः स्वकादंगाद्ब्रह्मविष्णू पुरासृजत् ॥ स एव हि तयोर्नित्यं योगक्षेमकरः प्रभुः ॥ ५ ॥ स कथं भगवान्रुद्र आदिदेवः पुरातनः

---

( १ ) ऋषि ह्मणतातः— हे वायुदेवा, आपण आह्मांस त्या परमेश्वर श्रीशिवाची सृष्टि [ उत्पत्ति ] सांगितली, ही शिवसृष्टि [ शिवाची उत्पत्ति ] ब्रह्मदेवाच्या मुखापासून झाली असें आपण ह्मणतां त्याविषयीं मात्र आह्मांस संशय येतो. ( २ ) कांतर महादेव हे सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ आहेत, त्याला तीन डोळे आहेत, तो मोठा तेजस्वी आहे, त्याचे हातांत शूल आयुध आहे, त्यांला हर ह्मणतात, तो कालस्वरूप असून तो परमेश्वर रुद्र ह्या नांवानें प्रसिद्ध आहे, त्याच्या मस्तकावर जटाजूट आहे, त्याला नीललोहित असें ह्मणतात. ( ३ ) जो महादेव प्रळयकाळची वेळ आली असतां रागावून सर्व जगाचा संहार करूं लागतो त्यावेळीं ब्रह्मदेवासहित विष्णूसहित आणि अग्निसहित ह्या जगाला जाळून टाकितो. ( ४ ) ज्या महादेवाला तो ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु देखील भिऊन जाऊन नमस्कार करितात, हा सदाशिव सर्व जगाचा संहार करितो त्यामुळें ते ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु ह्याला अगदीं लवून वागतात. [ ह्याच्या आज्ञेंत राहतात. ] ( ५ ) ह्या महादेवानेंच आपल्या अंगापासून पूर्वीं ब्रह्मदेवास आणि श्रीविष्णूस उत्पन्न केले, व तोच परमात्मा महादेव त्या ब्रह्मदेवाचें आणि श्रीविष्णूचें नेहमीं कल्याण करितो. ( ६ ) तो परमात्मा श्रीरुद्र सर्व देवांचा मुख्य देव आहे आणि तो फार प्राचीन आहे, असें असतां ज्याचा जन्म

॥ पुत्रत्वमगमच्छंभुर्ब्रह्मणोऽव्यक्तजन्मनः ॥ ६ ॥ प्रजापतिश्च विष्णुश्च रुद्रस्यैतौ परस्परम् ॥ सृष्टौ परस्परस्यांगादिति प्रागपि शुश्रुम ॥ ७ ॥ कथं पुनरशेषाणां भूतानां हेतुभूतयोः ॥ गुणप्रधानभावेन प्रादुर्भावः परस्परात् ॥ ८ ॥ नापृष्टं भवता कंचिन्नाश्रुतं च कथंचन ॥ भगवच्छिष्यभूतेन भवता सकलं श्रुतम् ॥ ९ ॥ यथाह भगवान्ब्रह्मा वद त्वमपि नस्तथा ॥ सर्वमेतद्यथावृत्तं वक्तुमर्हसि मारुत ॥ १० ॥

सूत उवाच ॥ एवं पृष्टः स भगवान्वायुराकाशसंभवः ॥ सर्वमेतत्समासेन मुनीनामब्रवद्विभुः ॥ ११ ॥

वायुरुवाच ॥ स्थाने पृष्टमिदं विप्रा भवद्भिः प्रश्नकोविदैः ॥ इदमेव पुरापृष्टो मम प्राह पितामहः ॥ १२ ॥ तदहं संप्रवक्ष्या-

---

कोठें आणि कधीं झाला? हें मुळींच समजत नाहीं त्या ब्रह्मदेवाचा शंभु हा मुलगा कसा झाला? (७) ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु हे दोघेजण श्रीशंकराच्या अंगापासून एकमेक उत्पन्न झाले असें आह्मीं पहिलेंच ऐकिलें आहे. (८) हे दोघे ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु सर्व प्राणिमात्रांचे कारणभूत असतां गुणाच्या जास्तपणामुळें ते एकमेकांपासून उत्पन्न कसे झाले? (९) ही गोष्ट तुला कोणास विचारावयास नको, तुला माहीत नाहीं असें कांहींच नाहीं, कांतर तूं प्रत्यक्ष परमेश्वर ब्रह्मदेवाचा शिष्य असल्यामुळें तुला त्यानें सर्व सांगितलेंच आहे. (१०) वायो, तुला ब्रह्मदेवानें जसें कांहीं सांगितलें आहे तसेंच तूं आह्मांस सांग

(११) सूत ह्मणतातः— ह्याप्रमाणें आकाशांत उत्पन्न होणाऱ्या वायूस सर्व मुनीश्वरांनीं असा प्रश्न केल्यावर तो परमात्मा वायु, संक्षिप्त रीतीनें सर्व मुनीश्वरांस सांगूं लागला.

(१२) वायु ह्मणालाः— हे ब्राह्मणहो, तुह्मीं मला बरें विचारलें, तुह्मी सर्वजण प्रश्न करण्याचे कामांत मोठे चतुर आहां, हाच प्रश्न पूर्वीं मीं ब्रह्मदेवास विचारिला होता, त्यावेळीं त्यानें मला जें कांहीं सांगितलें. (१३) तेंच मी आतां तुह्मांस सांगतों. ऐका. रुद्राची

मि यथा रुद्रसमुद्भवः ॥ यथा च पुनरुत्पत्तिर्ब्रह्मविष्ण्वोः परस्परम् ॥ १३ ॥ त्रयस्ते कारणात्मानो जाताः साक्षान्महेश्वरात् ॥ चराचरस्य विश्वस्य सर्गस्थित्यंतहेतवः ॥ १४ ॥ परमैश्वर्यसंयुक्ताः परमेश्वरभाविताः ॥ तच्छक्त्याधिष्ठिता नित्यं तत्कार्यकरणक्षमाः ॥ १५ ॥ पित्रा नियामिताः पूर्वं त्रयोऽपि त्रिषु कर्मसु ॥ ब्रह्मा सर्गे हरिस्त्राणे रुद्रः संहरणे पुनः ॥ १६ ॥ यथाप्यन्योऽन्यमात्सर्यादन्योऽन्यातिशयाशिनः ॥ तपसा तोषयित्वा स्वं पितरं परमेश्वरम् ॥ १७ ॥ लब्धा सर्वात्मता तस्य प्रसादात्परमेष्ठिनः ॥ ब्रह्मनारायणौ पूर्वं रुद्रः कल्पान्तरेऽसृजत् ॥ १८ ॥ कल्पान्तरे पुनर्ब्रह्मा रुद्रविष्णू जगन्मयः ॥ विष्णुश्च भगवान्रुद्रं

---

उत्पत्ति कशी झाली ? आणि त्या ब्रह्मदेवाची आणि श्रीविष्णूची उत्पत्ति परस्परापासून कशी झाली ? हें मी तुह्मांस सांगतों. ( १४ ) ब्रह्मदेव, विष्णु आणि रुद्र हे तिघेही कारणस्वरूप आहेत, तिघेही महेश्वरापासून [ सदाशिवापासून ] उत्पन्न झाले. हे तिघेजण हें जें स्थावरजंगम विश्व आहे त्याच्या उत्पत्तीला, संरक्षणाला आणि लयाला कारण आहेत. ( १५ ) त्या तिघांचेंही ऐश्वर्य अपार आहे, ते परमेश्वराची मनापासून भक्ति करितात, परमेश्वराच्या सामर्थ्यानें तिघे राहतात, व नेहमीं त्याचीं कामें करण्याला तयार असतात. ( १६ ) ब्रह्मदेव, विष्णु आणि रुद्र ह्या तिघांस त्यांच्या बापानें [ महेश्वरानें ] पूर्वीं तीन कामावर नेमिलें. ब्रह्मदेवाकडे सृष्टि करण्याचें काम दिलें, विष्णूकडे रक्षण करण्याचें काम दिलें आणि रुद्राकडे संहार करण्याचें काम दिलें. (१७) तरीपण त्या तिघांत परस्पर मत्सर वाढल्यामुळें आणि एकमेकांचा उत्कर्ष एकमेकांस सहन न झाल्यामुळें आपण सर्वांपेक्षां श्रेष्ठ व्हावें ह्या इच्छेनें त्यांनीं आपला पिता महेश्वर ह्याची आराधना करून त्यास प्रसन्न करून घेतलें. ( १८ ) त्यामुळें त्या परमेश्वराचे कृपेनें त्या तिघाला सर्वात्मता प्राप्त झाली, रुद्रानें पूर्वीं कल्पांतरांत ब्रह्मदेवास आणि नारायणास उत्पन्न केलें. ( १९ ) पुनः कल्पांतरांत जगत्स्वरूप ब्रह्मदेवानें ह्या रुद्रास आणि विष्णूस पुनः विष्णनें रुद्रास आणि ब्रह्मदेवास

ब्रह्माणमसृजत्पुनः ॥ १९॥ नारायणं पुनर्ब्रह्मा ब्रह्माणं च पुनर्भवः॥ एवं कल्पेषु कल्पेषु ब्रह्मविष्णुमहेश्वराः ॥ परस्परेण जायन्ते परस्परजयैषिणः ॥ २० ॥ तत्तत्कल्पांतवृत्तान्तमाधिकृत्य महर्षिभिः ॥ प्रभावः कथ्यते तेषां परस्परसमुद्भवात् ॥ २१ ॥ शृणु तेषां कथां चित्रां पुण्यां पापप्रमोचनीम् ॥ कल्पे तत्पुरुषे वृत्तां ब्रह्मणः परमेष्ठिनः ॥ २२ ॥ पुरा नारायणो नाम कल्पे वै मेघवाहने ॥ दिव्यं वर्षसहस्रं तु मेघो भूत्वावहद्धराम् ॥ २३ ॥ तस्य भावं समालक्ष्य विष्णोर्विश्वजगद्गुरुः ॥ शर्वः सर्वात्मभावेन प्रददौ शक्तिमव्ययाम् ॥ २४ ॥ शक्तिं लब्ध्वा तु सर्वात्मा शिवात्सर्वेश्वरेश्वरात् ॥ प्रसर्ज भगवान्विष्णुर्विश्वं विश्वसृजा सह ॥ २५ ॥ विष्णोस्तद्वैभवं

---

उत्पन्न केलें. ( २० ) ब्रह्मदेवानें नारायणास उत्पन्न केलें आणि ब्रह्मदेवास पुनः शिवानें उत्पन्न केलें ह्याप्रमाणें प्रत्येक कल्पाकल्पांत ब्रह्मदेव विष्णु आणि महेश्वर एकमेकापासून उत्पन्न होतात आणि एकमेकांस जिंकण्याची इच्छा करितात. ( २१ ) त्या त्या कल्पांतील वृत्तांतास अनुसरून ऋषीश्वर त्यांचा त्यांचा पराक्रम वर्णन करितात, आणि ते तिन्ही देव एकमेकांपासून उत्पन्न झाले असें मानतात. ( २२ ) ऋषीश्वरहो, तत्पुरुषकल्पांत परमेष्ठी ब्रह्मदेवाची जी हकीकत झाली ती मी आतां तुह्मांस सांगतों, ती कथा फार मौजेची असून पवित्र आहे, ती कथा ऐकिली तर पातकांचा नाश होतो. ( २३ ) पूर्वीं मेघवाहन कल्पांत नारायण स्वतः मेघ होऊन [ मेघाचें रूप घेऊन ] त्यानें देवांचीं एक हजार वर्षेंपर्यंत पृथ्वीस धारण केलें. ( २४ ) त्याचा [ श्रीविष्णूचा ] तो अभिप्राय लक्षांत आणून अनंतब्रह्माण्डांचा अधिपति श्रीशिव ह्यानें आपण सर्व विश्वाचा अधिपति असल्यानें आपल्या अलौकिक सामर्थ्यास अनुसरून त्या श्रीविष्णूस अविनाशी अशी शक्ति दिली. ( २५ ) सर्व त्रैलोक्याचा अधिपति असणाऱ्या श्रीशंकरापासून अविनाशी शक्ति श्रीविष्णूस मिळाल्यावर त्या परमेश्वर श्रीविष्णूनें ब्रह्मदेवासहित सर्व त्रैलोक्य उत्पन्न केलें. ( २६ ) श्रीविष्णूचें तें ऐश्वर्य पाहून विष्णूपासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवानें तें श्रीविष्णूचें तें अलौकिक सामर्थ्य पाहिलें व त्यास

दृष्ट्वा सृष्टस्तेन पितामहः॥ ईर्ष्यया परया ग्रस्तः स हसन्निदमब्रवीत् ॥ २६ ॥ गच्छ विष्णो मया ज्ञातं तव सर्गस्य कारणम् ॥ आवयोरधिकश्चास्ति स रुद्रो नास्ति संशयः ॥ २७ ॥ तस्य देवादिदेवस्य प्रसादात्परमेष्ठिनः ॥ स्रष्टा त्वं भगवानाद्यः पालकः परमार्थतः ॥ २८ ॥ अहं च तपसाराध्य रुद्रं त्रिदशनायकम् ॥ त्वया सह जगत्सर्वं स्रक्ष्याम्यत्र न संशयः ॥ २९ ॥ एवं विष्णुमुपालभ्य भगवानब्जसंभवः ॥ एवं विज्ञापयामास तपसा प्राप्य शंकरम् ॥ ३० ॥ भगवन्देवदेवेश विश्वेश्वर महेश्वर ॥ तव वामांगजो विष्णुर्दक्षिणांगभवो ह्यहम् ॥ ३१ ॥ मया सह जगत्सर्वं तथाप्यसृजदच्युतः॥ स मत्सरादुपालब्धस्त्वदाश्रयबलान्मया ॥३२॥

---

विष्णूची संपत्ति सहन होईना, तो मत्सरानें पुरा ग्रासला, आणि हंसत हंसत त्यास ह्मणाला, ( २७ ) विष्णो, तूं आतां जा, तूं सृष्टि कशी उत्पन्न केलीस त्याचें मला कारण समजलें, आपणा दोघांपेक्षां तो रुद्र श्रेष्ठ आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. ( २८ ) त्या परमेश्वर देवाधिदेव श्रीरुद्राच्या कृपेनें तूं सृष्टि उत्पन्न केलीस व सर्वांच्या अगोदर तूं जन्मास आलास असें तुला वाटतें, वास्तविक तूं सृष्टीचा पालक आहेस. ( २९ ) असो हा रुद्र देवांचा अधिपति आहे, त्याची तपश्चर्या करून मी त्यास प्रसन्न करून घेतों, मग तुझ्यासहवर्तमान सर्व जग मी उत्पन्न करीन ह्यांत संशय नाहीं. ( ३० ) कमलापासून जन्मास आलेल्या त्या परमात्मा ब्रह्मदेवानें विष्णूची अशी अवहेलना [ तिरस्कार ] केली, आणि मग तेथून शंकराकडे जाऊन त्यानें शंकराची आराधना करून त्यास प्रसन्न करून घेतलें आणि त्यास विनंति करून ह्मणाला. ( ३१ ) हे परमेश्वरा, आपण सर्व देवांचे अधिपति आहां, आपण त्रैलोक्याचे अधिपति आहां, आपणास महेश्वर ह्मणतात. तुमच्या डावेकडील अंगापासून श्रीविष्णु जन्मला आणि आपल्या उजवेकडील अंगापासून मी जन्मलों. ( ३२ ) असें असतां त्या श्रीविष्णूनें माझ्यासहित सर्व जग उत्पन्न केलें, तुझा आश्रय मला मिळेल ह्या आशेवर मीं त्या विष्णूचा तिरस्कार

मद्भावादधिकस्तस्य भावस्त्वयि महेश्वर ॥ त्वत्त एव समुत्पत्तिराव-योः सदृशी यतः ॥ ३३ ॥ तस्य भक्त्या यथापूर्वं प्रसादं कृतवान-सि ॥ तथा ममापि तत्सर्वं दातुमर्हसि शंकर ॥ ३४ ॥ इति विज्ञापि-तस्तेन भगवान्भगनेत्रहा ॥ स्मयेन वै ददौ सर्वं तस्यापि स घृणा-निधिः ॥ ३५ ॥ लब्ध्वैवमीश्वरादेव ब्रह्मा सर्वात्मतां क्षणात् ॥ त्वरमाणोऽथ संगम्य ददर्श पुरुषोत्तमम् ॥ ३६ ॥ क्षीरार्णवालये शुभ्रे विमाने सूर्यसन्निभे ॥ हेमरत्नान्विते दिव्ये मनसा तेन नि-र्मिते ॥ ३७ ॥ अनंतभोगशय्यायां शयानं पंकजेक्षणम् ॥ चतुर्भु-

---

केला. ( ३३ ) हे महेश्वरा, तो श्रीविष्णु आणि मी ( ब्रह्मदेव ) तु-झ्यापासूनच जन्मास आलों त्यामुळें वास्तविक पाहतां आह्मी दोघेही तुला सारखेच असतां माझ्यापेक्षां त्याच्यावर तुमचें प्रेम अधिक दिसतें. ( ३४ ) असो त्याची भक्ति पाहून त्याच्यावर जशी तुह्मी कृपा केली तशी मजवरही करा आणि त्याला जी विद्या शिकविली ती सर्व मलाही शिकवा. ( ३५ ) ह्याप्रमाणें त्या ब्रह्मदेवानें श्रीशिवाची अशी विनंति केल्यावर तो दयाळु परमेश्वर सूर्याचे दोन्ही डोळे उपडून काढणारा किंवा इंद्रास शिक्षा करणारा श्रीशिव किंचित् हांसला आणि त्यानें पूर्वीं श्रीविष्णूला जी कांहीं विद्या शिकविली होती ती सर्व ब्रह्मदेवालाही शि-कविली. ( ३६ ) मग श्रीशंकरापासून सर्वात्मता [ सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत राहण्याची विद्या ] प्राप्त होतांच लागलाच ब्रह्मदेव घाईघाईनें तेथून निघाला आणि त्यानें अगोदर श्रीविष्णूकडे जाऊन त्याची भेट घे-तली. ( ३७ ) श्रीविष्णु क्षीरसमुद्रांत राहत होते, तो क्षीरसमुद्र पांढरा पांढरा शुभ्र होता, त्यांत श्रीविष्णूचा राहण्याचा सातमजली प्रासाद [ वाडा ] होता, तो सूर्यासारखा झळकत होता. तो वाडा तर सोन्यां-नीं व रत्नांनीं मढविलेला होता, तो मोठा सुशोभित होता. तो वाडा श्रीविष्णूंनीं आपल्या मनाप्रमाणें उत्तम रीतीनें बांधला होता. (३८) त्या वाड्यांत वासुकिसर्पाचा बिछाना करून त्यावर श्रीविष्णु निजले

जमुदारांगसर्वाभरणभूषितम् ॥ ३८ ॥ शंखचक्रधरं सौम्यं चन्द्र-
विंबसमाननम् ॥ श्रीवत्सवक्षसं देवं प्रसन्नमधुरस्मितम् ॥ ३९ ॥
धरामृदुकरांभोजस्पर्शरक्तपदांबुजम् ॥ क्षीरार्णवेऽमृतमिव शयानं
योगनिद्रया ४० ॥ तमसा कालरुद्राख्यं रजसा कनकाण्डजम् ॥
सत्त्वेन सर्वगं विष्णुं निर्गुणत्वे महेश्वरम ॥ ४१ ॥ तं दृष्ट्वा पुरुषं
ब्रह्मा प्रगल्भमिदमब्रवीत् ॥ ग्रसामि त्वामहं विष्णो त्वमात्मानं
यथा पुरा ॥ ४२ ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा प्रतिबुध्य पितामहम् ॥
उदैक्षत महाबाहुः स्मितमीषच्चकार च ॥ ४३ ॥ तस्मिन्नवसरे वि-
ष्णुर्ग्रस्तस्तेन महात्मना ॥ सृष्टश्च ब्रह्मणा सद्यो भ्रुवोर्मध्यादय-

---

होते, त्यांचे कमलासारखे डोळे होते. त्यांस चार हात असून त्यांचें स्वरूप भव्य होतें, त्यांनीं आपल्या सर्व अंगावर अलंकार घातल्यामुळें ते फार शोभत होते. ( ३९ ) त्यांनीं शंख, चक्र, गदा वगैरे आयुधें घेतलीं होतीं, त्यांचा आकार सौम्य होता, चंद्रबिंबासारखें त्यांचें तोंड सुशोभित दिसत होते. त्यांच्या उरावर श्रीवत्सलक्षण होतें, ते हंसतमुख, असून त्यांचा चेहरा नेहमीं आनंदी असा होता, (४०) पृथ्वी आपल्या कमळासारख्या नाजुक हातानें त्यांचे पाय चेपीत असल्यामुळें ते पाय लाल दिसत होते, ते योगनिद्रेनें क्षीरसमुद्रांत अमृताप्रमाणें ( मुक्तजीवासारखे ) निजले [ राहिले ] होते. ( ४१ ) तमोगुणाच्यावेळीं त्यास कालरुद्र असें ह्मणतात, रजोगुणाचेवेळीं त्यास ब्रह्मदेव असें ह्मणतात, सत्वगुणाच्यावेळीं सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत राहणारा श्रीविष्णु असें ह्मणतात आणि निर्गुणाचेवेळीं त्यास महेश्वर असें ह्मणतात (४२) त्या पुराणपुरुष श्रीविष्णूला पाहून ब्रह्मदेव मोठ्यानें ओरडून असें ह्मणाला. अरे श्रीविष्णो, पूर्वीं तूं मला जसें गिळलेंस तसें मीही आतां तुला गिळतों. ( ४३ ) त्याचें तें उद्दामपणाचें बोलणें ऐकून हा ब्रह्मदेव आहे, असें श्रीविष्णूनें तेव्हांच ओळखलें व त्या पराक्रमी श्रीविष्णूनें त्याकडे पाहून किंचित् हास्यवदन केलें. ( ४४ ) व लागलेंच त्या महासामर्थ्यवान् ब्रह्मदेवानें श्रीविष्णूस ग्रासून [ गिळून ] टाकिलें, आणि त्या ब्रह्मदेवानें विष्णूला आपल्या दोन भिवयांमधील जागेपासून पुन्हां

त्नतः ॥ ४४ ॥ तस्मिन्नवसरे साक्षाद्भगवानिंदुभूषणः ॥ शक्तिं तयोरपि द्रष्टुमरूपो रूपमास्थितः ॥ ४५ ॥ प्रसादमतुलं कर्तुं पुरा दत्तवरस्तयोः ॥ आगच्छत्तत्र यत्रेमौ ब्रह्मनारायणौ स्थितौ ॥ ४६ ॥ अथ तुष्टुवतुर्देवं प्रीतौ भीतौ च कौतुकात् ॥ प्रणेमतुश्च बहुशो बहुमानेन दूरतः ॥ ४७ ॥ भवोऽपि भगवानेतावनुगृह्य पिनाकधृक् ॥ सादरं पश्यतोरेव तयोरंतरधीयत ॥ ४८ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे शेषशायिनारायणवर्णनं नामैकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

---

सहज रीतीनें उत्पन्न केले. ( ४५ ) त्याचवेळीं चंद्राचे मस्तकावर भूषण असणारा श्रीशंकर त्या दोघांची शक्ति पाहण्यासाठीं प्रत्यक्ष आपण निराकार असतांना साकार [ देहधारी ] झाला. ( ४६ ) आणि आपण ज्यांस [ ब्रह्मदेवास आणि श्रीविष्णूस ) वर दिला आहे त्यांवर कृपा करून त्यांस कृतार्थ [ प्रसाद ] करावयासाठीं ज्या ठिकाणीं ते दोघेजण [ ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु ] होते तेथें आला. ( ४७ ) श्रीशंकर तेथें आलेले पाहतांच त्या दोघांस मोठा संतोष झाला व भयही वाटलें, त्यांनीं मोठ्या सन्मानानें दूर उभे राहून त्या शंकरास कौतुकानें वारंवार वारंवार नमस्कार केले. ( ४८ ) अजगवधनुष्य धारण करणारा परमात्मा श्रीशंकर देखील त्या दोघां ब्रह्मदेवावर आणि श्रीविष्णूवर कृपा करून ते दोघे प्रीतिपूर्वक पहात असतां त्या दोघांसमक्ष गुप्त झाला.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवीय संहितेच्या पूर्वभागापैकीं शेषशायीनारायणाचें वर्णन नांवाचा अकरावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ द्वादशोऽध्यायः ॥

वायुरवाच ॥ प्रतिकल्पं प्रवक्ष्यामि रुद्राविर्भावकारणम् ॥ यतोविच्छिन्नसंताना ब्रह्मसृष्टिः प्रवर्त्तते ॥ १ ॥ कल्पे कल्पे प्रजां सृष्ट्वा ब्रह्मा ब्रम्हाण्डसम्भवः ॥ अवृद्धिहेतोर्भूतानां मुमोह भृशदुःखितः ॥ २ ॥ तस्य दुःखप्रशांसर्थं प्रजानां च विवृद्धये ॥ तत्तत्कल्पेषु कालात्मा रुद्रो रुद्रगणाधिपः ॥ ३ ॥ निर्दिष्टः परमेशेन महेशो नीललोहितः ॥ पुत्रो भूत्वानुगृण्हाति ब्रम्हाणं ब्रम्हणोऽनुजः ॥ ४ ॥ स एव भगवानीशस्तेजोराशिरनामयः ॥ अनादिनिधनो धाता भृतसंकोचको विभुः ॥ ५ ॥ परमैश्वर्यसंयुक्तः परमेश्वरभावितः ॥ तच्छक्त्याधिष्ठितः शश्वत्तच्चिह्नैरपि चिन्हितः ॥६ ॥ तन्ना-

---

( १ ) वायु म्हणालाः—प्रत्येक कल्पांत रुद्राचें उत्पन्न होण्याचें ( जन्म घेण्याचें ) काय कारण होतें तें सांगतों. रुद्र जन्मास आल्यामुळें ब्रह्मदेवाच्या सृष्टीला कोठेंही खंड न पडतां ती सदोदित वाढत जातें. ( २ ) प्रत्येक कल्पांत ब्रह्माण्डापासूनच उत्पन्न झालेला ब्रह्मदेव प्रजा उत्पन्न करितो व प्राणिमात्रांची वाढ होत नाहीं असें पाहिल्यावर दुःखानें अतिशय मोह पावतो. ( ३ ) त्या ब्रह्मदेवाचें दुःख शांत करण्याकरितां व प्रजेची वृद्धि करण्यासाठीं त्या त्या कल्पांत कालस्वरूपी रुद्र रुद्रगणांचा अधिपति ( ४ ) परमेश्वरानें आज्ञा केलेला महेश्वर नील लोहित ब्रह्मदेवाचा मुलगा होऊन त्याच्यावर अनुग्रह करितो, तो ब्रह्मदेवाच्या मागाहून जन्मास येतो ( ५ ) तोच भगवान् परमेश्वर तेजांचा राशी आहे, त्यास कोणताही रोग नाहीं त्याला जन्म नाहीं व मरणही नाहीं, तो ब्रह्मदेव आहे, तो रक्षण केलेल्या प्राण्यांचा संहार करितो तो, समर्थ आहे. ( ६ ) तो मोठा ऐश्वर्यवान् आहे, तो नेहमीं परमेश्वराची भक्ति करितो. तो परमेश्वराच्या शक्तीच्या आधारानेंच राहतो, व नेहमीं त्या परमेश्वराची चिन्हेंच तो आपल्या शरीरांवर धारण करितो. ( ७ ) परमे-

मनामा तद्रूपस्तत्कार्यकारणक्षमः ॥ तत्तुल्यव्यवहारश्च तदाज्ञापरिपालकः ॥ ७ ॥ सहस्रादित्यसंकाशश्चंद्रावयवभूषणः ॥ भुंजगहारकेयूरवलयो मुंजमेखलः ॥ ८ ॥ जलंधरविरंचींद्रकपालशकलोज्वलः ॥ गंगातुंगतरंगार्द्रपिंगलाननमूर्द्धजः ॥ ९ ॥ भग्नदंष्ट्रांकुराक्रांतप्रांतकांतधराधरः ॥ सव्यश्रवणपाशांतमण्डलाकृतकुण्डलः ॥ १० ॥ महावृषभनिर्याणो महाजलदनिस्वनः ॥ महानलसमप्रख्यो महाबलपराक्रमः ॥ ११ ॥ एवं घोरमहारूपो ब्रम्हपुत्रो महेश्वरः ॥ विज्ञानं ब्रम्हणे दत्वा सर्गे सह करोति च ॥ १२ ॥ तस्मा

---

श्वराचें नांवच आपण धारण करितो, त्याचें रूपच आपण घेतो, त्या परमेश्वरानें करावयाचीं सर्व कामें करण्याची त्यास शक्ति असते, त्या परमेश्वरासारखेच तो व्यवहार करितो व त्या परमेश्वराची आज्ञा पाळतो. ( ८ ) तो हजार सूर्यासारखा तेजस्वी आहे, चंद्राच्या अर्धभागाचें त्यानें आपल्या मस्तकावर भूषण केलें आहे, त्यानें आपल्या गळ्यांत सर्पांच्या माळा घातल्या असून मनगटावर बाहूभूषण आणि हातांत कडेतोडेही सापांचेच केले आहेत. व आपल्या कमरेस त्यानें मुंजगवताचा कडदोरा केला आहे. ( ९ ) जलंधर, ब्रह्मदेव, व इंद्र यांच्या कपालांच्या तुकड्यांची त्यानें आपल्या गळ्यांत माळ घातली आहे. मस्तकावरील गंगेच्या मोठमोठ्या लाटांमुळें त्याच्या डोक्यावरील पिंगटरंगाच्या जटा भिजून जातात. ( १० ) फुटलेल्या दाढांच्या तेजामुळें त्याचे आजूबाजूस असणारे पर्वत फार शोभतात, तसेंच त्यानें आपल्या डाव्या कानांत सर्पाचें वेंटाळें घातलें आहे.( ११ )तो बाहेर फिरावयास निघतांना आपल्या मोठ्या थोरल्या नंदीवर बसून निघतो, मोठ्या थोरल्या ढगाच्या गडगडण्यासारखा त्याचा शब्द आहे, मोठ्या थोरल्या पेटलेल्या विस्तावासारखा तो तेजस्वी असून त्याचें सामर्थ्य आणि शौर्य फार मोठें आहे. ( १२ ) अशा रीतीचा भयंकर स्वरूपाचा तो ब्रह्मदेवाचा मुलगा महेश्वर सृष्टि उत्पन्न करावयाच्या वेळीं ब्रह्मदेवास सृष्टीचें ज्ञान शिकवितो आणि आपण स्वतः त्याचे बरोबर सृष्टि उत्पन्न करितो. ( १३ ) ह्यासाठीं त्या रुद्राच्या

तस्माद्रुद्रप्रसादेन प्रतिकल्पं प्रजापतेः ॥ प्रवाहरूपतो नित्या प्रजा-
सृष्टिः प्रवर्तते ॥१३॥ कदाचित्प्रार्थितः स्रष्टुं ब्रह्मणा नीललोहितः॥
स्वात्मना सदृशान्सर्वान्ससर्ज मनसा विभुः ॥ १४ ॥ कपर्दिनो
निरातंकान्नीलग्रीवांस्त्रिलोचनान् ॥ जरामरणनिर्मुक्तान्दीप्तशूलव-
रायुधान् ॥ १५ ॥ तैस्तु संछादितं सर्वं चतुर्दशविधं जगत् ॥
तान्दृष्ट्वा विविधान्रुद्रान्रुद्रमाह पितामहः ॥ १६ ॥ नमस्ते देव-
देवेश मास्राक्षीरीदृशाः प्रजाः ॥ अन्याः सृज ह भद्रं ते प्रजा
मृत्युसमन्विताः ॥ १७ ॥ इत्युक्तः प्रहसन्प्राह ब्रह्माणं परमे-
श्वरः ॥ नास्ति मे तादृशः सर्गः सृज त्वमशुभाः प्रजाः ॥१८॥ ये
त्विमे मनसा सृष्टा महात्मानो महाबलाः ॥ चरिष्यंति मया सार्द्धं

---

कृपेनें प्रत्येक कल्पांत प्रजापतीची ( ब्रह्मदेवाची ) प्रजासृष्टिखंड न प-डतां सारखी वाढत असते ( १४ ) कोणी एकेवेळीं ब्रह्मदेवानें तूं स्वतःच सृष्टि कर ह्मणून परमेश्वर श्रीशंकराची प्रार्थना केली तेव्हां त्या सामर्थ्य-वानानें आपल्या सारखेच सर्वजण मनापासून उत्पन्न केले. ( १५ ) त्या सर्वांच्या मस्तकावर जटाजूट होता, त्यांस कोणतीही मनोव्यथा नव्हती, ते सर्व नीलकंठ होते, त्यांस तीन डोळे होते, त्यांस जन्ममरण नसून त्या सर्वांच्या हातांत एकेक तेजस्वी उत्तम प्रकारचा शूल होता. ( १६ ) अशा तऱ्हेच्या शंकरांनीं उत्पन्न केलेल्या प्रजेनें चवदा भुवनें अगदीं गच्च भरून गेलीं. त्या अनेक प्रकारच्या रुद्रांस पाहून ब्रह्मदेव श्रीशि-वास ह्मणाला. ( १७ ) हे देवाधिदेवा, तुला नमस्कार असो, अशा री-तीची प्रजा पुन्हां उत्पन्न करूं नकोस. तुझें नेहमीं कल्याण असो, जिला मरण आहे अशा तऱ्हेची दुसऱ्या रीतीची प्रजा उत्पन्न कर. ( १८ ) ब्रह्मदेवाचें तें बोलणें ऐकून शंकर हांसले आणि पुन्हा ब्रह्म देवास ह्मणाले. मजपासून उत्पन्न होणारी प्रजा तूं ह्मणतोस तशी म-रण पावणारी होणार नाहीं. तूंच पाहिजे तर तशी अकल्याणकारक प्रजा उत्पन्न कर. मी करणार नाहीं. ( १९ ) ज्यांस मी आपल्या म-नापासून उत्पन्न केले आहे ते सर्वजण मोठ्या मनाचे असून मोठे ब-

सर्वे एव हि याज्ञिकाः ॥ १९ ॥ इत्युक्त्वा विश्वकर्माणं विश्व-
भूतेश्वरो हरः ॥ सह रुद्रैः प्रजासर्गान्निवृत्तात्मा व्यतिष्ठत ॥२०॥
ततःप्रभृति देवोऽसौ न प्रसूते शुभाः प्रजाः ॥ ऊर्ध्वरेताः स्थितः
स्थाणुर्यावदाभूतसंप्लवम् ॥ २१ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे रुद्रोत्पत्तिर्नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

लवान् आहेत. ते सर्वजण यज्ञयाग करतील व मजबरोबरच राहतील. ( २० ) सर्व त्रैलोक्यांचें आधिपत्य असणाऱ्या श्रीशंकरांनीं सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवास असें सांगितलें आणि तेव्हांपासून मानस सृष्टि उत्पन्न करण्याचें बंद करून बाकीच्या रुद्रांसहित श्रीशंकर तसेच स्वस्थ बसले. ( २१ ) तेव्हांपासून त्या परमेश्वरानें कल्याणकारक प्रजा उत्पन्न केली नाहीं. ब्रह्मचर्यव्रतानें प्राणिमात्रांचा संहार होईपर्यंत ते ( शिव ) एखाद्या झाडासारखे निश्चल राहिले.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवीय संहितेच्या पूर्व भागांतील रुद्रांची उत्पत्ति नांवाचा बारावा अध्याय संपला.



## ॥ अथ त्रयोदशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ यदा पुनः प्रजाः सृष्टा न व्यवर्द्धन्त वेधसः ॥ तदा मैथुनजां सृष्टिं ब्रह्मा कर्त्तुममन्यत ॥ १ ॥ न निर्गतं पुरा यस्मान्नारीणां कुलमीश्वरात् ॥ तेन मैथुनजां सृष्टिं न शशाक पितामहः ॥ २ ॥ ततः स विदधे बुद्धिमर्थनिश्चयगामिनीम् ॥ प्रजानामेव वृद्ध्यर्थं प्रष्टव्यः परमेश्वरः ॥ ३ ॥ प्रसादेन विना तस्य न वर्द्धेरन्निमाः प्रजाः ॥ एवं संचिन्त्य विश्वात्मा तपः कर्त्तुं प्रच क्रमे ॥ ४ ॥ तदाद्या परमा शक्तिरनंता लोकभाविनी ॥ आद्या सूक्ष्मतरा शुद्धा भावगम्या मनोहरा ॥ ५ ॥ निर्गुणा निष्प्रपंचा

---

( १ ) वायु ह्मणालाः— जेव्हां पुनः उत्पन्न केलेल्या ब्रह्मदेवाच्या प्रजा वृद्धिंगत होईनात तेव्हां ब्रह्मदेवानें मैथुनापासून उत्पन्न होणारी सृष्टि निर्माण करण्याचा विचार केला. ( २ ) पूर्वी जेव्हां ईश्वरानें सृष्टि उत्पन्न केली त्यावेळीं स्त्रीजाति उत्पन्न केली नव्हती त्यामुळें ब्रह्मदेवास मैथुनापासून उत्पन्न होणारी सृष्टि निर्माण करितां येईना. ( ३ ) तेव्हां ब्रह्मदेवानें आतां आपण काय केलें असतां प्रजावृद्धि होईल हा विचार चालविला. शेवटीं त्यानें निश्चय केला कीं, प्रजावृद्धि कशी होईल हें आपण प्रत्यक्ष महादेवासच विचारावें, ( ४ ) कांतर त्याच्या कृपेवांचून ह्या प्रजा वाढणार नाहीं. असा विचार करून त्या विश्वात्मा ब्रह्मदेवानें विचार तपश्चर्या करण्यास आरंभ केला. ( ५ ) त्यावेळीं ब्रह्मदेवानें शक्तीसहित शंकराची आराधना आरंभिली. ती शक्ती जगाच्या प्रारंभापासून असून तिचें सामर्थ्य अगाध आहे, तिचा अंत नसून तिला सर्व जगाचें ज्ञान आहे, ती मूलकारण असून फारच सूक्ष्म आहे, निष्पाप असून भक्ति केली तरच तिचें ज्ञान होतें तशींच ती मनोहर आहे. ( ६ ) ती आदिशक्ति निर्गुण आहे, निष्प्रपंच आहे,

च निष्कला निरुपप्लुवा ॥ निरंतरतरा नित्या नित्यमीश्वरपा-
र्श्वगा ॥ ६ ॥ तया परमया शक्त्या भगवंतं त्रियम्बकम् ॥
संचिंत्य हृदये ब्रह्मा तताप परमं तपः ॥ ७ ॥ तीव्रेण तपसा
तस्य युक्तस्य परमेष्ठिनः ॥ अचिरेणैव कालेन पिता संप्रतुतोष
ह ॥ ८ ॥ ततः केनचिदंशेन मूर्तिमाविश्य कामपि ॥ अर्द्धनारी-
श्वरो भूत्वा ययौ देवः स्वयं हरः ॥ ९ ॥ तं दृष्ट्वा परमं देवं तमसः
परमव्ययम् ॥ अद्वितीयमनिर्देश्यमदृश्यदकृतात्मभिः ॥ १० ॥ स-
र्वलोकविधातारं सर्वलोकेश्वरेश्वरम् ॥ सर्वलोकविधायिन्या
शक्त्या परमया युतम् ॥ ११ ॥ अप्रतर्क्यमनाभासममेयमजरं ध्रु-

---

ष्कल असून निरुपप्लव आहेस, अतिशय निरंतर [ भरीव ] असून नित्य आहे, आणि ती नेहमीं परमेश्वराच्या बाजूस राहते. ( ७ ) त्या परशक्तीसहित परमेश्वर श्रीशंकराचे हृदयांत चिंतन करून ब्रह्मदेवानें खडतर तपश्चर्या करण्यास आरंभ केला. ( ८ ) परमात्मा ब्रह्मदेव अशी खडतर तपश्चर्या करूं लागल्यावर त्या तपश्चर्येमुळें थोड्याच दिवसांत [ पिता ] परमेश्वर महादेव संतुष्ट झाला. ( ९ ) नंतर त्या महादेवानें आपल्या कांहीं एक विशिष्टशक्तीच्या सामर्थ्यानें विचित्र प्रकारचें रूप घेतलें आणि अर्धशरीर पुरुष आणि अर्धशरीर स्त्री होऊन आपण स्वतः ब्रह्मदेव तपश्चर्या करीत होता तेथें आला. ( १० ) ब्रह्मदेवानेंही श्रीशंकरास अशा विचित्र रूपानें आलेलें पाहिलें, ते शंकर सर्व देवांत श्रेष्ठ देव असून ते तमोगुणातीत आहेत, ते अविनाशी आहेत. त्यांच्यासारखा परमेश्वर जगांत दुसरा नाहींच. जे लोक दुष्ट आहेत अशांस त्यांचें दर्शन कधींच होत नाहीं. ( ११ ) त्यांनीं सर्व जग निर्माण केलें, सर्व त्रैलोक्याचे जे परमेश्वर आहेत त्यांचेही महादेव परमेश्वर आहेत. सर्वलोकांस उत्पन्न करणारी आपली श्रेष्ठ शक्ति तिच्यासहित ते नेहमीं राहतात. ( १२ ) त्यांच्या अलौकिक सामर्थ्याचा तर्कच करितां येत नाहीं, त्यांच्या स्वरूपासारखें जगांत एकाचेंही स्वरूप नाहीं. त्यांच्या शक्तीचें प्रमाण करितां येत नाहीं, त्यांस वृद्धावस्था नसून त्यांस क्षय

वम् ॥ अचलं निर्गुणं शान्तमनन्तमहिमास्पदम् ॥ १२ ॥ सर्वदं सर्वगं सर्वसदसव्द्यक्तिवर्जितम् ॥ सर्वोपमाननिर्मुक्तं शरण्यं शाश्वतं शिवम् ॥ १३ ॥ प्रणम्य दण्डवद्ब्रह्मा समुत्थाय कृतांजलिः ॥ श्रद्धाविनयसम्पन्नैः श्राव्यैः संस्कारसंयुतैः ॥ १४ ॥ यथार्थयुक्तसर्वार्थैर्वेदार्थपरिबृंहितैः ॥ तुष्टाव देवं देवीं च सूक्तैः सूक्ष्मार्थगोचरैः ॥ १५ ॥

ब्रह्मोवाच ॥ जय देव महादेव जयेश्वर महेश्वर ॥ जय सर्वगुणश्रेष्ठ जय सर्वसुराधिप ॥ १६ ॥ जय प्रकृतिकल्याणि जय प्रकृतिनायिके ॥ जय प्रकृतिदूरांगि जय प्रकृतिसुन्दरि ॥ १७ ॥

---

नाहीं. ते अचल असून निर्गुण आहेत, शांत स्वभावाचे असून त्यांच्या माहात्म्याचा अंत लागत नाहीं, तें मोठेपणाचें घरच आहेत. ( १३ ) ते आपल्या भक्तांला सर्व कांहीं देतात, सर्व ठिकाणीं त्यांस जातां येतां येते [ ते सर्वत्र व्यापलेले आहेत. ] सत् आणि असत् व्यक्ति त्यांस नाहीं, जगांत जितक्या कांहीं सुंदर वस्तु आहेत त्या सर्वांत शिवाच्या स्वरूपाची बरोबरी करणारी दुसरी वस्तुच नाहीं, ते शरण आलेल्या लोकांचें रक्षण करणारे असून ते अनंतकाल राहणारे आहेत. त्या श्रीशिवास ( १४ ) आपले समोर आलेले पाहतांच ब्रह्मदेवानें दण्डप्रणाम केला व लागलाच उठून उभा राहून दोन्ही हात जोडले व भक्तिपूर्वक नम्रतेनें मंजुळ आणि शुद्ध रीतीनें ( १५ ) ज्यांत शिवाची वास्तविक स्तुति आहे, अशा वेदार्थास अनुसरून असणाऱ्या व सूक्ष्म अर्थाला दाखविणाऱ्या मधुर मधुर शद्बांनीं शिवाची व पार्वतीची स्तुति करूं लागला.

( १६ ) ब्रह्मदेव ह्मणालाः— परमेश्वरा, महादेवा, ईश्वरा, महेश्वरा, तुझा जय असो, जगांत जितके चांगले चांगले गुण आहेत ते सर्व तुमच्या अंगीं आहेत, तुह्मी सर्वदेवांचे अधिपति आहात, तुमचा जय असो. ( १७ ) हे पार्वति, तूं स्वभावतः कल्याण करणारी आहेस, तूं प्रकृतीची मुख्य अधिदेवता आहेस, तुझा जय असो. प्रकृतीहून तुझें शरीर भिन्न आहे, तूं स्वभावानें निष्कपट आहेस तुझा जय असो.

जयामोघमहामाय जयामोघमनोरथ ॥ जयामोघमहालील जयामोघमहाबल ॥ १८॥ जय विश्वजगन्मातर्जय विश्वजगन्मयि ॥ जय विश्वजगद्धात्रि जय विश्वजगत्सखि ॥ १९ ॥ जय शाश्वतिकैश्वर्य जय शाश्वतिकालय ॥ जय शाश्वतिकाकार जय शाश्वतिकानुग ॥ २० ॥ जयात्मत्रयनिर्मात्रि जयात्मत्रयपालनि ॥ जयात्मत्रयसंहर्त्रि जयात्मत्रयनायिके ॥ २१ ॥ जयावलोकनायत्तजगत्कारणबृंहण ॥ जयोपेक्षाकटाक्षोत्थहुतभुग्भुक्तमौक्तिक ॥ २२ ॥ जय देवाद्यविज्ञेयस्वात्मसूक्ष्मदृशोज्ज्वले ॥ जय स्थूलात्मशक्त्यंशव्या-

---

(१८)हे श्रीशंकरा, तुझी माया अगाध असून ती कधींही निष्फळ होत नाहीं, तुझे सर्व मनोरथ परिपूर्ण होतात, तुझी लीला विचित्र प्रकारची असून ती कधींही व्यर्थ जात नाहीं तुझा जय असो. ( १९ ) हे पार्वति, तूं सर्वत्रैलोक्याची आदिमाता आहेस, तूं सर्व विश्वस्वरूप असून त्रैलोक्यस्वरूप आहेस, तूं सर्वविश्वाचें व जगाचें रक्षण करणारी आहेस, तूं सर्वजगाचें व विश्वाचें हित करणारी आहेस तुझा जय असो. (२०) हे श्रीशंकरा, तुझें ऐश्वर्य चिरकाल राहणारें आहे, तुझें स्थानही चिरकाल राहणारें आहे, क्षणभंगुर नव्हे. तुझें स्वरूप चिरकाल राहणारें आहे, तुझे भक्तलोकही चिरकाल राहणारे आहेत तुझा जय असो. ( २१ ) हे पार्वति, तूंच स्वतः स्थूलात्मा, सूक्ष्मात्मा आणि कारणात्मा हे तीन आत्मे निर्माण केलेस, तूंच स्वतः ह्या तिन्ही आत्म्यांचें रक्षण करितेस, तिन्ही आत्म्यांचा तूंच संहार करितेस, तूं तिन्ही आत्म्यांची अधिदेवता आहेस. तुझा जय असो. ( २२ ) हे श्रीशंकरा, तूं कृपादृष्टीनें सर्वजगाकडे एकवेळ पाहिलेस ह्मणजे हें सर्व जग उत्पन्न होतें आणि त्याचें रक्षण होतें, तूं उपेक्षापूर्वक एकवेळ जगाकडे पाहिलेस ह्मणजे विस्तवांत जसें मोती जळून जावें त्याप्रमाणें तुझ्या कपाळावरील तिसऱ्या नेत्रांतून अग्नि उत्पन्न होऊन हें जग जळून जातें. ( २३ ) हे पार्वति, तूं देवादिकांनीं जाणावयासारखी आहेस, देवादिकांस तुझें यथार्थज्ञान होत नाहीं. तुझी आत्मदृष्टि फार सूक्ष्म आहे, तूं निर्दोष आहेस तूं आपल्या स्थूल शक्तीच्या अंशानें हें सर्व स्थावर जंगम विश्व व्यापून टा-

प्रविश्वचराचरे ॥ २३ ॥ जय नानैकविन्यस्तविश्वतत्वसमुच्चय ॥ जयासुरशिरोनिष्ठश्रेष्ठानुगकदंबक ॥ २४ ॥ जयोपाश्रितसंरक्षा-संविधानपटीयसि ॥ जयोन्मूलितसंसारविषवृक्षांकुरोद्गमे ॥ २५ ॥ जय प्रादेशिकैश्वर्यवीर्यशौर्यविजृंभण ॥ जय विश्वबहिर्भूत-निरस्तपरवैभव ॥ २६ ॥ जय प्रणीतपंचार्थप्रयागपरमामृत ॥ जय पंचार्थविज्ञानसुधास्रोतःस्वरूपिणि ॥ २७ ॥ जयातिघोरसंसारम-हारोगभिषग्वर ॥ जयानादिमलाज्ञानतमःपटलचन्द्रिके ॥ २८ ॥ जय त्रिपुरकालाग्ने जयत्रिपुरभैरवि ॥ जय त्रिगुणनिर्मुक्त जय-

---

किलें आहेस, तुझा जय असो. ( २४ ) हे श्रीशंकरा तूं आपला विश्वतत्वाचा समुदाय एक प्रकारानें पसरला असून अनेक रीतीनेंही पसरलेला आहे, दैत्यांतील मुख्य मुख्य दैत्यांचे समुदाय तुमची आज्ञा मस्तकावर पुष्पमालेप्रमाणें वागवितात. तुझा जय असो. ( २५ ) हे पार्वति, तुला जे लोक शरण येतात त्यांचें रक्षण करण्याचे कामांत फार चतुर आहेस, संसाररूप विषवृक्षाचा मोड तूं मुळापासून उपटून टाकणारी आहेस, तुझा जय असो. ( २६ ) हे परमेश्वरा श्रीशंकरा, प्रादेशिक तुमच्या ऐश्वर्याची, तुमच्या पराक्रमाची, तुमच्या शूरपणाची फार फार प्रशंसा करितात, तुमचे जे कोणी शत्रु असतील त्यांचें ऐश्वर्य तुम्ही ज[illegible]च्या बाहेर घालवून देता. तुमचा जय असो. ( २७ ) श्रीशंकरा, पंचा[illegible]नीं सांगितलेल्या मोठमोठ्या यज्ञामुळें आपण उत्तम प्रकारच्या मोक्षसु[illegible]चा अनुभव घेत आहां, तुमचा जय असो, हे पार्वति पंचार्थज्ञानामुळें तूं अमृतप्रवाहस्वरूप आहेस. तुझा जय असो. (२८) श्रीशंकरा, हा भयंकर संसाररूपी अपरिहार्य दुर्धर रोग आहे तो दूर करणारे आपण प्रत्यक्ष अश्विनी कुमार आहां, तुमचा जय असो, हे पार्वति तूं अनादिमल आणि अज्ञानरूपी तमःपटलाचा नाश करणारा प्रत्यक्ष चंद्राचा प्रकाश [ चांदणें ] आहेस तुझा जय असो. ( २९ ) श्रीशंकरा, त्रिपुरास आपण प्रळयकाळच्या अग्नीसारखे आहां, तुमचा जय असो, हे पार्वति, तूं त्रिपुराला मोठी भयंकर देवता भासलीस [झालीस] तुझा जय असो. हे श्रीशंकरा आपणास सत्वगुण, रजोगुण आणि ता-

त्रिगुणमर्दिनि ॥ २९ ॥ जय प्रमथसर्वज्ञ जय सर्वप्रबाधिके ॥ जय प्रचुरदिव्यांग जय प्रार्थितदायिनि ॥ ३० ॥ क्व देवते परं धाम क्व वयं क्व च नो वचः ॥ तथापि भगवन्भक्त्या प्रलपंतं क्षमस्व माम् ॥ ३१ ॥ विज्ञाप्यैवंविधैः सूक्तैर्विश्वकर्मा चतुर्मुखः ॥ नमश्चकार रुद्राय रुद्राण्यै च मुहुर्मुहुः ॥ ३२ ॥ इदं स्तोत्रवरं पुण्यं ब्रह्मणा समुदीरितम् ॥ अर्धनारीश्वरं नाम शिवयोर्हर्षवर्धनम् ॥ ३३ ॥ य इदं कीर्तयेद्भक्त्या यस्य कस्यापि लिप्सया ॥ स तत्फलमवाप्नोति शिवयोः प्रीतिकारणात् ॥ ३४ ॥ सकलभुवन-

---

मसगुण ह्यांचा कांहींच संबंध नाहीं, तुमचा जय असो. हे पार्वति तूं सत्वरजोतमोगुणांचा समूळ नाश करणारी आहेस, तुझा जय असो ( ३० ) हे श्रीशंकरा, प्रमथगणांचे आपण अधिपति असून आपणास भूत, भविष्य आणि वर्तमान तीन्ही काळांचें ज्ञान आहे, तुमचा जय असो, हे पार्वति तूं सर्व प्राणिमात्रांचीं दुःखें दूर करून त्यांचें सर्व मनोरथ परिपूर्ण करितेस तुझा जय असो, हे श्रीशंकरा, तुझें आंग फार विस्तीर्ण असून सुशोभित आहे तुझा जय असो, हे पार्वति, तुझे भक्त तुला जे जे पदार्थ मागतात ते ते पदार्थ त्यांस देऊन त्यांचे मनोरथ तूं परिपूर्ण करितेस तुझा जय असो. ( ३१ ) हे पार्वतीशंकरा, तुमचें अलौकिक सामर्थ्य कोणीकडे ? आह्मी कोणीकडे ? आणि आमचें बोलणें कोणीकडे ? तरी पण परमेश्वरा, मी तुमच्या भक्तीमुळें अशी गडबड करीत आहे त्याची मला क्षमा करा. ( ३२ ) ह्याप्रमाणें त्या विश्वनिर्माण करणाऱ्या व चार तोंडें असणाऱ्या ब्रह्मदेवानें गोड गोड शब्दांनीं शंकरपार्वतीची स्तुति केली व त्या शंकरपार्वतीस वारंवार नमस्कार केले. ( ३३ ) हें ब्रह्मदेवानें स्वतः केलेलें शंकरपार्वतीचें स्तोत्र सर्व स्तोत्रांत उत्तम असून पुण्यकारक आहे, हें स्तोत्र शिवानें जेव्हां अर्धनारीश्वररूप घेतलें होतें त्यावेळीं केलें ह्मणून ह्यांचें नांवही अर्धनारीश्वरस्तोत्र असेंच आहे, हें स्तोत्र शिवपार्वतीला फारच प्रिय आहे. ( ३४ ) जो कोणी मनुष्य आपल्या मनांत कोणत्याही रीतीची इच्छा धरून हें स्तोत्र भक्तीनें पठण करील तर शिवपार्वतीच्या कृपेनें त्याची ती इच्छा पूर्ण होईलच. ( ३५ ) जे शिवपार्वती सर्वत्रैलोक्यांतील प्राणिमात्र उत्पन्न

भूतभावनाभ्यां जननविनाशविहीनविग्रहाभ्याम् ॥ नरवरयुवतिवपुर्धराभ्यां सततमहं प्रणतोऽस्मि शंकराभ्याम् ॥ ३८ ॥ इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे रुद्रब्रह्मसंवादे त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

---

करण्याला मूळ कारण आहेत, ज्यांच्या [ शिवपार्वतीच्या ] शरीराला जन्म नाहीं व मरणही नाहीं अशी स्थिति आहे, त्या शरीराचा अर्धभाग पुरुषाचा असून अर्धभाग स्त्रीचा आहे, त्या शिवपार्वतीला मीं नेहमीं नमस्कार करितों.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवयिसंहितेच्या पूर्वभागापैकीं, रुद्र आणि ब्रह्मदेव ह्यांच्या संवादांतील तेरावा अध्याय संपला.



## ॥ अथ चतुर्दशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ अथ देवो महादेवो महाजलदनादया ॥ वाचा मधुरगंभीरविशदश्लक्ष्णवर्णया ॥ १ ॥ अर्थसंपन्नपदया राजलक्षणयुक्तया ॥ अशेषविषयारंभरक्षाविलयदक्षया ॥ २ ॥ मनोहरतरोदारमधुरास्मितपूर्वया ॥ संबभाषे सुसंप्रीतो विश्वकर्माणमीश्वरः ॥ ३ ॥

ईश्वर उवाच ॥ वत्स वत्स महाभाग मम पुत्र पितामह ॥ ज्ञातमेव मया सर्वं तव वाक्यस्य गौरवम् ॥ ४ ॥ प्रजानामेव वृद्ध्यर्थं तपस्तप्तं त्वयाऽधुना ॥ तपसानेन तुष्टोऽस्मि ददामि च तवेप्सितम् ॥ ५ ॥ इत्युक्त्वा परमोदारः स्वभावमधुरं वचः ॥ ससर्ज वपुषो भागाद्देवीं देववरो हरः ॥ ६ ॥ यामाहुर्ब्रह्म वि-

---

( १ ) वायु ह्मणाला.—मग तो देव महादेव मोठ्या मेघाच्या गडगडण्याप्रमाणें अवाजाच्या, गोड, गंभीर स्पष्ट व शुद्ध वर्णोच्चार असणाऱ्या, ( २ ) ज्यांत कोणत्याही पदाचा निरर्थक उपयोग नाहीं, जी राजलक्षणास अनुसरून आहे, सर्व प्रकारच्या विषयांचे आरंभ, त्यांचें रक्षण आणि त्यांचा लय ह्याविषयीं दक्ष असणाऱ्या, ( ३ ) मनास गोड वाटेल अशा प्रौढ शब्दांनीं हांसत हांसत प्रसन्न मुद्रेनें विश्व उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवास ह्मणूं लागले.

( ४ ) शिव ह्मणाले—मुला, अरे मुला, तूं मोठा दैववान आहेस, ब्रह्मदेवा, तूं माझा मुलगा आहेस. तूं जी इतका वेळ माझी स्तुति केलीस, त्यावरून तुझ्या बोलण्याचें महत्व ( तात्पर्य ) मला समजून आलें. ( ५ ) आपण निर्माण केलेल्या प्रजेची वृद्धि व्हावी ह्मणून तूं आतां तपश्चर्या केलीस, त्या तपश्चर्येमुळें मी संतुष्ट झालों आणि तुझ्या इच्छेप्रमाणें तुला मी इच्छित वर देतों. ( ६ ) त्या अतिशय उदार स्वभावाच्या देवाधिदेव. श्रीशंकरानें असें प्रेमळ अंतःकरणानें सांगून आपल्या शरीराच्या एका भागापासून पार्वतीस ( देवीस ) उत्पन्न केलें. ( ७ ) त्या देवीला विद्वान् लोक ब्रह्म असें ह्मण-

द्रांसो देवीं दिव्यगुणान्विताम् ॥ परस्य परमां शक्तिं भवस्य परमात्मनः ॥७॥ यस्या न खलु विद्यंते जन्ममृत्युजरादयः ॥ या भवानी भवस्यांगात्समाविरभवत्किल ॥ ८ ॥ यस्या वाचो निवर्तंते मनसा चेंद्रियैः सह ॥ सा भर्तुर्वपुषो भागाज्जातेव समदृश्यत ॥ ९ ॥ या सा जगदिदं कृत्स्नं महिम्ना व्याप्य तिष्ठति ॥ शरीरिणीव सा देवी विचित्रा समलक्ष्यत ॥ १० ॥ सर्वं जगदिदं यैषा संमोहयति मायया ॥ ईश्वरात्सैव जाताभूदजाता परमार्थतः ॥११॥ न यस्याः परमो भावः सुराणामपि गोचरः ॥ विश्वामरेश्वरा चैव विभक्ता भर्तुरंगतः ॥ १२ ॥ तां दृष्ट्वा परमेशानीं सर्वलोकमहेश्वरीम् ॥ सर्वज्ञां सर्वगां सूक्ष्मां सदसद्व्यक्तिवर्जिताम् ॥ १३ ॥ परया

---

तात, तिच्या आंगीं अलौकिक गुण आहेत, ती परमात्म्या श्रेष्ठ शिवाची श्रेष्ठ शक्ति होय. ( ८ ) वास्तविक पाहिलें तर त्या देवीला जन्म नाहीं, मरण नाहीं, म्हातारपण वगैरे कोणत्याही अवस्था नाहींत. तिला भवानी ह्मणतात, आणि ती शंकराच्या शरीरापासून उत्पन्न झाली. ( ९ ) तिचें वर्णन करूं लागले तर वाचा मनासह आणि इंद्रियांसह परत फिरते कांतर पार्वतीचें यथार्थ वर्णन करणें हे वाचेच्या, मनाच्या आणि इंद्रियांच्या शक्तीबाहेरील काम आहे. ती आपल्या पतीच्या शरीराच्या भागापासून उत्पन्न झाली असे दिसली. ( १० ) ती पार्वती आपल्या अलौकिक सामर्थ्यानें सर्व त्रैलोक्य व्यापून राहतें, ती देवी प्रत्यक्ष देहधारी असल्याप्रमाणें दिसली, तिचें सामर्थ्य अगाध आहे. ( ११ ) ती देवी हें सर्व त्रैलोक्य आपल्या मायेनें भुलवून टाकिते, तीच देवी प्रत्यक्ष परमेश्वर श्रीशिवापासून उत्पन्न झाली, वास्तविक ती उत्पन्न झाली नाहींच, ती मूळचीच आहे. ( १२ ) तिचा जो वास्तविक विचार आहे तो देवादिकांसही समजत नाहीं. त्रैलोक्याची आणि देवाची परमेश्वरी आहे, ती आपल्या पतीच्या शरीरापासून वेगळी झाली. ( १३ ) ती परमेश्वरी होय, तिला सर्व लोक महेश्वरी असें ह्मणतात. ती सर्वज्ञ आहे, ती सर्वत्र व्यापिलेली असून तिला पाहिजे तेथें जाण्यायेण्याची शक्ति आहे, तिचें तत्व फार गहन आहे, ती सत् आणि असत् ह्या व्यक्तीहून वेगळी आहे. ( १४ ) ती आ-

निखिलभासा भासयंतीमिदं जगत् ॥ प्रणिपत्य महादेवीं प्रार्थयामास वै विराट् ॥ १४ ॥ ब्रह्मोवाच ॥ देवि देवेन सृष्टोऽहमादौ सर्वजगन्मयि ॥ प्रजासर्गे नियुक्तश्च सृजामि सकलं जगत् ॥ १५॥ मनसा निर्मिताः सर्वे देवि देवादयो मया ॥ न वृद्धिमुपगच्छंति सृज्यमानाः पुनः पुनः ॥ १६ ॥ मिथुनप्रभवामेव कृत्वा सृष्टिमतःपरम् ॥ संवर्धयितुमिच्छामि सर्वा एव मम प्रजाः ॥१७॥ न निर्गतं पुरा त्वत्तो नारीणां कुलमव्ययम् ॥ तेन नारीकुलं स्रष्टुं शक्तिर्मम न विद्यते ॥ सर्वासामेव शक्तीनां त्वत्तः खलु समुद्भवः ॥ ॥ १८ ॥ तस्मात्सर्वत्र सर्वेषां सर्वशक्तिप्रदायिनि ॥ त्वामेव वरदामद्य प्रार्थयामि सुरेश्वरीम् ॥ १९ ॥ चराचरविवृद्ध्यर्थमंशेनैकेन स-

---

पल्या श्रेष्ठ तेजानें हें सर्व जग प्रकाशित करितें त्या देवीला पाहून ब्रह्मदेवानें नमस्कार केला, आणि त्या महादेवीची तो विराटस्वरूपी ब्रह्मदेव प्रार्थना करूं लागला.

( १५ ) ब्रह्मदेव ह्मणाला—हे परमेश्वरी, तूं सर्वत्रैलोक्यस्वरूप आहेस, मला अगोदर परमेश्वरानें उत्पन्न केलें व प्रजा उत्पन्न करण्याच्या कामावर नेमलें ह्मणून मी सर्व जग उत्पन्न करितों. ( १६ ) हे परमेश्वरी, मीं देवादिक सर्व मनापासूनच उत्पन्न केले परंतु, मी वरचेवर सृष्टि उत्पन्न करितों तरी त्याची वृद्धि होत नाहीं. ( १७ ) ह्यासाठीं आतांपासून स्त्रीपुरुषांपासून संतति उत्पन्न व्हावी असें इच्छितों ह्मणजे मग मात्र माझ्या सर्व प्रजेची वृद्धि होण्यास हरकत पडणार नाहीं. ( १८ ) हे परमेश्वरी, तुजपासून पूर्वी बायकांची जाति उत्पन्न झाली नाहीं त्यामुळें स्त्रीजाति उत्पन्न करण्याची शक्ति माझ्या अंगीं नाहीं. कांतर, सर्व प्रकारच्या शक्ति खरोखर तुजपासूनच उत्पन्न होतात, ( १९ ) तूं सर्व प्राणिमात्रांस सर्व ठिकाणीं सर्व प्रकारच्या शक्ति प्राप्त करून देणारी आहेस, ह्यासाठीं मी आतां तुझीच प्रार्थना करितों, तूं वर देणारी असून सर्व देवाची अधिदेवता आहेस. ( २० ) तूं सर्व ठिकाणीं व्यापिलेली आहेस, व संसारदुःख दूर करणारी आहेस, तूं

वेगे ॥ दक्षस्य मम पुत्रस्य पुत्री भव भवार्दिनि ॥ २० ॥ एवं सा याचिता देवी ब्रह्मणा ब्रह्मयोनिना ॥ शक्तिमेकां भ्रुवोर्मध्यात्ससर्जात्मसमप्रभाम् ॥ २१ ॥ तामाह प्रहसन्प्रेक्ष्य देवदेववरो हरः ॥ ब्रह्माणं तपसाराध्य कुरु तस्य यथेप्सितम् ॥ २२ ॥ तामाज्ञां परमेशस्य शिरसा प्रतिगृह्य सा ॥ ब्रह्मणो वचनाद्देवी दक्षस्य दुहिताभवत् ॥ २३ ॥ दत्वैवमतुलां शक्तिं ब्रह्मणे ब्रह्मरूपिणी ॥ विवेश देहं देवस्य देहश्चांतरधीयत ॥ २४ ॥ तदाप्रभृति लोकेऽस्मिन्स्त्रिया भोगः प्रतिष्ठितः ॥ प्रजासृष्टिश्च विप्रेंद्रा मैथुनेन प्रवर्तते ॥ २५ ॥ एतद्वः सर्वमाख्यातं देव्याः शक्तिसमुद्भवम् ॥ पुण्यमृद्धिकरं श्राव्यं भूतसर्गानुषंगतः ॥ २६ ॥ य इदं कीर्तयेन्नित्यं देव्याः शक्तिसमुद्भ-

---

आतां स्थावरजंगम विश्वाची वृद्धि होण्यासाठीं तूं आपल्या एका अंशानें माझा मुलगा दक्ष प्रजापति ह्याची मुलगी हो. ( २१ ) परब्रह्मापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवानें त्या पार्वतीची अशी स्तुति केली तेव्हां तिनें आपल्या दोन्ही डोळ्यांच्या मधल्या भागापासून आपल्या सारखी अंगकांति असणारी एक शक्ति उत्पन्न केली. ( २२ ) त्या शक्तीकडे पाहून हांसत हांसत तो देवाधिदेव शंकर तिला ह्मणाला, अगे, तूं तपश्चर्या करून ब्रह्मदेवाचें आराधन कर, आणि त्याचे मनांत जी इच्छा असेल ती पूर्ण कर. ( २३ ) परमेश्वर श्रीशंकराची ती आज्ञा त्या शक्तीनें शिरसामान्य केली, आणि मग ती देवी( शक्ति ) ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें दक्ष प्रजापतीची मुलगी झाली. ( २४ ) ह्याप्रमाणें ब्रह्मस्वरूप असणारी ती देवी ( पार्वती ) ब्रह्मदेवाला अलौकिक एक शक्ति देऊन पुन्हा परमेश्वराच्या शरीरांत शिरली. तो देहही अंतर्धान पावला ( २५ ) तेव्हांपासून ह्या लोकांस स्त्रिया ह्या उपभोगाच्या वस्तु आहेत असें ठरलें, आणि हे ब्राह्मणहो, तेव्हांपासून स्त्रीपुरुषांच्या मैथुनानें प्रजा उत्पन्न होऊं लागली. ( २६ ) ब्राह्मणहो, सृष्टिक्रमाच्या प्रसंगानें तुह्मांस मी देवी ( पार्वती ) पासून शक्तीची उत्पत्ति कशी झाली हें सर्व सांगितलें, हें चरित्र ऐकण्यासारखें असून पवित्र आणि ऐश्वर्यप्राप्ती करून देणारे आहे. ( २७ ) जो कोणी मनुष्य देवीपासून शक्तीची

वम् ॥ पुण्यं सर्वमवाप्नोति पुत्रांश्च लभते शुभान् ॥ २७ ॥
इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे सृष्टिनिरूपणं नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

---

उत्पत्ति कशी झाली हें पवित्र चरित्र ऐकेल त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील, त्यांस मुलगे होतील व सर्व प्रकारे त्याचें कल्याण होईल.

ह्याप्रमाणें शैवनांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेच्या पूर्वभागापैकीं सृष्टिनिरूपणनांवाचा चवदावा अध्याय संपला.



## ॥ अथ पंचदशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ एवं लब्ध्वा परां शक्तिमीश्वरादेव शाश्वतीम् मैथुनप्रभवां सृष्टिं कर्तुकामः प्रजापतिः ॥ १ ॥ स्वयमप्यर्धतो नारी चार्धेन पुरुषोऽभवत् ॥ याऽर्धेन नारी सा तस्माच्छतरूपा व्यजायत ॥ २ ॥ विराजमसृजद्ब्रह्मा सोऽर्धेन पुरुषो विराट् ॥ स वै स्वायंभुवः पूर्वं पुरुषो मनुरुच्यते ॥ ३ ॥ सा देवी शतरूपा तु तपः कृत्वा सुदुश्चरम् ॥ भर्तारं दीप्तयशसं मनुमेवाभ्यपद्यत ॥ ४ ॥ तस्मात्तु शतरूपा सा पुत्रद्वयमसूयत ॥ प्रियव्रतोत्तानपादौ पुत्रौ पुत्रवतां वरौ ॥५॥ कन्ये द्वे च महाभागे याभ्यां जातास्त्विमाः प्रजाः ॥ आकूतिरेका विज्ञेया प्रसूतिरपरा स्मृता ॥ ६ ॥ स्वायं

---

वायु ह्मणालाः— ( १ ) ह्याप्रमाणें परमेश्वर श्रीशंकरापासून चिरकाल राहणारी शक्ति मिळाल्यावर ब्रह्मदेवानें मैथुनापासून उत्पन्न होणारी सृष्टि उत्पन्न करण्याचा विचार केला. ( २ ) मग ब्रह्मदेवच आपण स्वतः अर्धशरीर बायको आणि अर्धशरीर पुरुष असा झाला, ज्या आंगानें बायको झाला त्या आंगापासून शतरूपा नांवाची स्त्री झाली. ( ३ ) ज्या आपल्या शरीराच्या अर्धभागानें ब्रह्मदेव पुरुष झाला होता, त्या शरीरापासून [ भागापासून ] विराट् ब्रह्मदेवानें विराजास उत्पन्न केलें. तोच पूर्वीचा स्वायंभुव पुरुष होय, त्यालाच स्वायंभुव मनु असें ह्मणतात. ( ४ ) ती देवी शतरूपा अतिशय कडक तपश्चर्या करून तपश्चर्येच्या सामर्थ्यानें अतिशय तेजस्वी अशा मनूचीच बायको झाली. ( ५ ) त्या स्वायंभुव मनूपासून शतरूपेला दोन मुलगे झाले त्यांचीं नावें, प्रियव्रत आणि उत्तानपाद अशीं होतीं, पुत्रवान् लोकांच्या पोटीं उत्पन्न झालेल्या पुत्रांमध्यें हे दोघे श्रेष्ठ होते. ( ६ ) आणखी स्वायंभुव मनूपासून शतरूपेच्या पोटीं दोन मुली जन्मल्या, त्या दोन मुलींपासूनच ह्या सर्व प्रजा उत्पन्न झाल्या. एका मुलीचें नांव आकूति असें असून दुसरीचें प्रसूति असें होतें. ( ७ ) स्वायंभुव म-

भुवः प्रसूतिं तु ददौ दक्षाय तां प्रभुः ॥ रुचेः प्रजापतेश्चैव आकूतिं प्रत्यपादयत् ॥ ७ ॥ आकूत्यां मिथुनं जज्ञे मानसस्य रुचेः शुभम् ॥ यज्ञश्च दक्षिणा चैव याभ्यां संवर्धितं जगत् ॥ ८ ॥ स्वायंभुवसुतायां तु प्रसूत्यां लोकमातरः ॥ चतस्रो विंशतिं कन्या दक्षस्त्वजनयत्प्रभुः ॥ ९ ॥ श्रद्धा लक्ष्मीर्धृतिः पुष्टिस्तुष्टिर्मेधा क्रिया तथा ॥ बुद्धिर्लज्जा वपुः शांतिः सिद्धिः कीर्तिस्त्रयोदशी ॥ १० ॥ पत्न्यर्थं प्रतिजग्राह धर्मो दाक्षायणीः प्रभुः ॥ ताभ्यः शिष्टा यवीयस्य एकादश सुलोचनाः ॥ ११ ॥ ख्यातिः सत्यथ संभूतिः स्मृतिः प्रीतिः क्षमा तथा ॥ सन्नतिश्चानसूया च ऊर्जा स्वाहा स्वधा तथा ॥ १२ ॥ भृगुः शर्वो मरीचिश्च अंगिराः पुलहः क्रतुः ॥ पुलस्त्योऽत्रिर्वसिष्ठश्च पाव-

---

नूनें आपली प्रसूति नांवाची मुलगी दक्षास दिली, आणि रुचिनांवाच्या प्रजापतीला आकूति नांवाची मुलगी दिली. ( ८ ) ब्रह्मदेवाचा मानसपूत्र रुचि ह्याच्यापासून आकूतीच्या पोटीं एक मुलगा आणि एक मुलगी असे स्त्रीपुरुष जन्मले, मुलाचें नांव यज्ञ असें असून मुलीचें नांव दक्षिणा असें होतें. त्या दोघांनीं ह्या जगाची वृद्धि केली. ( ९ ) स्वायंभुव मनूच्या मुलीच्या [ प्रसूतीच्या ] पोटीं दक्ष प्रजापतीनें चोवीस मुली उत्पन्न केल्या, त्या सर्वजणी ह्या जगाच्या माता होत. (१०) त्यांचीं नावें १ श्रद्धा २ लक्ष्मी ३ धृति ४ पुष्टि ५ तुष्टि ६ मेधा ७ क्रिया ८ बुद्धि ९ लज्जा १० वपुः ११ शांति १२ सिद्धि १३ कीर्ति अशीं होतीं. ( ११ ) ह्या दक्ष प्रजापतीच्या तेरा मुली धर्माच्या बायका झाल्या. त्याहून बाकी उरलेल्या लहान लहान सुंदर डोळे असणाऱ्या अकरा मुली होत्या. ( १२ ) त्यांचीं नावें—१ ख्याति २ सती ३ संभूति ४ स्मृति ५ प्रीति ६ क्षमा ७ सन्नति ८ अनसूया ९ ऊर्जा १० स्वाहा ११ स्वधा अशीं होतीं. ( १३ ) त्या अकरा मुलींस भृगु, शर्व, मरीचि, अंगिरा, पुलह, क्रतु, पुलस्त्य, अत्रि, वसिष्ठ, पावक,

कः पितरस्तथा ॥ ख्यात्याद्या जगृहुः कन्या मुनयो मुनिसत्तमाः ॥ १३ ॥ कामाद्यास्तु यशोऽन्ता ये ते त्रयोदश सूनवः ॥ धर्मस्य जज्ञिरे तासु श्रद्धाद्यासु सुखोत्तराः ॥ १४ ॥ दुःखोत्तराश्च हिंसायामधर्मस्य च संततौ ॥ निकृत्यादय उत्पन्नाः पुत्राश्चाधर्मलक्षणाः ॥ १५ ॥ नैषां भार्याश्च पुत्रा वा सर्वे ह्यनियमाः स्मृताः स एष तामसः सर्गो जज्ञेऽधर्मनियामकः ॥ १६ ॥ या सा दक्षस्य दुहिता रुद्रस्य दयिता सती ॥ भर्तृनिंदाप्रसंगेन त्यक्ता दाक्षायणीं तनुम् ॥ १७ ॥ दक्षं च दक्षभार्यां च विनिंद्य सह बंधुभिः ॥ सा मेनायामाविरभूत्पुत्री हिमवतो गिरेः ॥ १८ ॥ रुद्रस्तु तां सतीं दृष्ट्वा रुद्रांस्त्वात्मसमप्रभान् ॥ यथासृजदसंख्यातांस्तथा कथितमेव च ॥ १९ ॥ भृगोः ख्यात्यां समुत्पन्ना लक्ष्मीर्नारायणप्रिया ॥

---

[ अग्नि ] पितर ह्यांनीं अनुक्रमानें एक एका मुलीस ऋषीश्वरहो, आपली बायको करून घेतलें. ( १४ ) कामापासून यशापर्यंत जे तेरा मुलगे होते ते धर्मप्रजापतीस श्रद्धा वगैरे तेरा बायकांपासून एकएकीपासून एकेक प्रमाणें जन्मले होते, ते सर्वजण वरचेवर सुख भोगणारे असे होते. ( १५ ) अधर्माला हिंसेच्या पोटीं निकृति वगैरे मुलगे जन्मले ते सर्वजण अधर्म लक्षणांचे [ दुष्टलक्षणी ] होते. आणि उत्तरोत्तर [ एका पेक्षां एक ] दुःखदेणारे होते. ( १६ ) त्यास बायका नव्हत्या व मुलेंही नव्हतीं, ते सर्व अनियमितपणानें वागणारे होते. ह्या सर्गास तामससर्ग असें नांव होते हा सर्ग अधर्माला वाढविणारा होता. ( १७ ) जी दक्षाची मुलगी सती नांवाची रुद्राची आवडती बायको होती तिनें आपल्या नवऱ्याची निंदा आपणास ऐकावी लागली ह्मणून रागारागानें आपला देहत्याग केला, ( १८ ) तिनें आपल्या बापाची, [ दक्षाची ] आपल्या आईची, [ प्रसूतीची ] आपल्या सर्व नातलगांचीसुद्धां फार निंदा केली, आणि आपण पुढें हिमालय पर्वतापासून मेनेच्या पोटीं जन्मास आली, ( १९ ) रुद्रानेंही त्या पूर्वजन्मांतील आपल्या स्त्रियेस पाहून आपल्यापासून आपल्यासारखे पराक्रमी असंख्यात रुद्र उत्पन्न केले हें मागें सांगितलेंच आहे. ( २० ) भृगूला ख्यातीच्या पोटीं लक्ष्मी

देवौ धातविधातारौ मन्वंतरविचारिणौ ॥ २०॥ तयोर्वै पुत्रपौत्राद्याः शतशोऽथ सहस्रशः ॥ स्वायंभुवेंऽतरेऽतीताः सर्वे ते भार्गवा मताः ॥२१॥ मरीचेरपि संभूतिः पौर्णमासमसूयत ॥ कन्याचतुष्टयं चैव महीयांसस्तदन्वयाः ॥ येषां वंशे समुत्पन्नो बहुपुत्रः स काश्यपः ॥ २२॥ स्मृतिश्चांगिरसः पत्नी जनयामास वै सुतौ ॥ आग्नीध्रं शरभश्चैव तथा कन्याचतुष्टयम् ॥ २३ ॥ तदीयाः पुत्रपौत्राश्च येऽतीतास्ते सहस्रशः ॥ प्रीत्यां पुलस्त्यभार्यायां दंतोऽग्निरभवत्सुतः ॥ २४ ॥ पूर्वजन्मनि योऽगस्त्यः स्मृतः स्वायंभुवेंऽतरे ॥ तत्संततीया बहवः पौलस्त्या इति विश्रुताः ॥ २५ ॥ क्षमा तु सुषुवे पुत्रान्पुलहस्य प्रजापतेः ॥ कर्दमश्चासुरीयश्च सहिष्णुश्चेति ते त्रयाः ॥

---

नांवाची मुलगी झाली, ती पुढें श्रीविष्णूची बायको झाली. धाता आणि विधाता नांवाचे दोन देव प्रत्येक मन्वंतरांत फिरणारे होते. ( २१ ) त्यांचे मुलगे, नातु वगैरे शेंकडों हजारों स्वायंभुवमन्वंतरांत होऊन गेले, त्या सर्वांस भार्गव असें ह्मणतात. ( २२ ) मरीचि ऋषीपासून संभूतीच्या पोटीं पौर्णमा नांवाची मुलगी झाली, आणखीही चार मुलीच झाल्या त्यांचे वंश सर्व जगांत प्रसिद्ध आहेत. त्यांच्या वंशांत तो काश्यपऋषि जन्मला, त्यास मुलगे पुष्कळ होते. ( २३ ) अंगिरस ऋषीची बायको स्मृति हिच्या पोटीं दोन मुलगे झाले त्यांचीं नावे आग्नीध्र आणि शरभ अशीं होतीं, आणखी तशाच चार मुली झाल्या. ( २४ ) त्यांचे मुलगे व नातु आजपर्यंत शेंकडों हजारों होऊन गेले. पुलस्त्याची बायको प्रीति हिच्या पोटीं दंताग्नि नांवाचा मुलगा झाला. ( २५ ) स्वायंभुव मनूच्यावेळीं पूर्वजन्मांत जो अगस्त्य नांवाचा ऋषि होता, त्यांच्या वंशांत जन्मलेल्या पुष्कळ लोकांस पौलस्त्य असें नांव पडलें होतें, ( २६ ) पुलह प्रजापतीची बायको क्षमा नांवाची होती तिचें पोटीं तीन मुलगे जन्मले, त्यांचीं नावें कर्दम, आसुरीय आणि सहिष्णु अशीं होतीं, ते तिघेजण दक्षिणाग्नि, गार्हपत्य आणि आहवनीय

त्रेताग्निवर्चसः सर्वे एषां वंशः प्रतिष्ठितः ॥ २६ ॥ क्रतोः क्रतुसमान्पुत्रान्सन्नतिः सुषुवे सुतान् ॥ नैषां भार्याश्च पुत्राश्च सर्वे ते ह्यूर्ध्वरेतसः ॥ २७ ॥ षष्ठिस्तानि सहस्राणि वालखिल्या इति स्मृताः ॥ अनूरुणाग्रतो यान्ति परिवार्यदिवाकरम् ॥२८॥अत्रेर्भार्यानसूया च पंचात्रेयानसूयत ॥ कन्यकांच श्रुतिर्नाम माता शंखपदस्य या ॥२९॥ सत्यनेत्रश्च हव्यश्च आपोमुर्त्तिः शनैश्चरः ॥ सोमश्च पंचमस्त्वेते पंचात्रेयाः प्रकीर्त्तिताः ॥ ३० ॥ तेषां पुत्राश्च पौत्राश्च आत्रेयाणां महात्मनाम् ॥ स्वायंभुवेऽतरेऽतीताः शतशोऽथ सहस्रशः ॥ ३१ ॥ ऊर्जायां तु वसिष्ठस्य पुत्रा वै सप्त जज्ञिरे ॥ ज्यायसी च स्वसा तेषां पुण्डरीका सुमध्यमा ॥ ३२॥ रजोगात्रोर्ध्वबाहू च सवनश्चानयश्चयः॥ सुतपाः शुक्र इत्येते सप्त सप्तर्षयः स्मृताः ॥३३॥ गोत्राणि

---

ह्या तीन अग्नीसारखे शुद्ध आणि तेजस्वी होते त्यांचा वंश जगांत प्रसिद्धीस आला. ( २७ ) क्रतुपासून सन्नतीच्या पोटीं क्रतूसारखेच पराक्रमी मुलगे जन्मले, त्यांस बायका किंवा मुलें वगैरे कांहीं नव्हतीं ते सर्वजण ब्रह्मचारी होते. ( २८ ) त्या मुलांची संख्या साठ हजार होती, त्यांस वालखिल्य असें ह्मणतात. ते सर्वजण सूर्याला वेढा घालून दररोज मांड्या नसलेल्या अरुणाच्या पुढें सूर्याबरोबर चालतात. ( २९ ) अत्रीची बायको अनुसूया हिला अत्रिऋषीपासून पांच मुलगे झाले त्यांस आत्रेय असें ह्मणतात, आणखी एक मुलगी झाली तिचें नांव श्रुति असें असून तिला पुढें शंखपद नांवाचा मुलगा झाला. ( ३० ) अत्रिऋषीच्या पांच मुलांचीं नावें सत्यनेत्र, हव्य, आपोमूर्ति, शनैश्वर आणि सोम अशीं होतीं, ह्या पांचजणांस आत्रेय असें ह्मणतात. ( ३१ ) ह्या महात्म्या आत्रेयांचे स्वायंभुव मन्वंतरांत शेंकडों हजारों मुले आणि नातु होऊन गेले. ( ३२ ) वसिष्ठऋषीला ऊर्जेच्या पोटीं सात मुलगे झाले, त्या सातजण बंधूनी एक वडील वहीण पुंडरीका नांवाची होती. तिची कंबर फार चांगली होती. ( ३३ ) त्या सातजण वसिष्ठाच्या मुलांची नावें रजोगात्र, ऊर्ध्वबाहु, सवन, आनय, चय, सुतपा, आणि शुक्र, अशीं होतीं. ( ३४ ) त्या माहात्म्या वसिष्ठपुत्रांचीं गोत्रें त्यांच्या नांवा-

नामभिस्तेषां वासिष्ठानां महात्मनाम् ॥ स्वायंभुवेंऽतरेऽतीते न्यर्बुदानि शतानि च ॥ ३४ ॥ इत्येष ऋषिसर्गस्तु सानुबंधः प्रकीर्तितः ॥ समासाद्विस्तराद्वक्तुमशक्योऽयमिति द्विजाः ॥ ३५ ॥ योऽसौ रुद्रात्मको वन्हिर्ब्रह्मणो मानसः सुतः ॥ स्वाहा तस्य प्रिया लेभे पुत्रांस्त्रीनमितौजसः ॥ ३६ ॥ पावकः पवमानश्च शुचिरित्येव ते त्रयः ॥ निर्मन्थ्यः पवमानः स्याद्वैद्युतः पावकः स्मृतः ॥ सूर्ये तपति यश्चासौ शुचिः सौर उदाहृतः ॥ ३७ ॥ हव्यवाहः कव्यवाहः सहरक्षा इति त्रयः ॥ त्रयाणां क्रमशः पुत्रा दैवपित्र्यासुराश्च ते ॥ ३८ ॥ एतेषां पुत्रपौत्राश्च चत्वारिंशन्नवैव ते ॥ काम्यनैमित्तिकाजस्रकर्मसु त्रिषु संस्थिताः ॥ ३९ ॥ सर्वे तपस्विनो ज्ञेयाः सर्वे व्रतभृतस्तथा ॥

---

वरून पडलीं होतीं ते वंश स्वायंभुव मन्वंतरांत शेंकडों लक्ष होऊन गेले. ( ३५ ) असा हा ऋषींचा वंश क्रमापासून तुह्मांला अगदीं थोडक्यांत सांगितला, ब्राह्मणहो, हा सविस्तर रीतीनें सांगूं ह्मटलें तर सांगतां येणें शक्यच नाहीं. ( ३६ ) जो हा रुद्रस्वरूपी अग्नि ब्रह्मदेवाचा मानसपुत्र होता, त्याची बायको स्वाहा नांवाची होती तिच्या पोटीं अतिशय पराक्रमी असे तीन मुलगे झाले. ( ३७ ) त्यांची नावें पावक, पवमान आणि शुचि अशीं होतीं. एकमेकांवर एक पदार्थ घांसले ह्मणजे त्यापासून उत्पन्न होणाऱ्या अग्नीस पवमान असें ह्मणतात, विजेचा जो अग्नि असतो त्यास पावक ह्मणतात, आणि सूर्य प्रकाशमान असतां त्याच्या उन्हानें सूर्यकांत मण्यापासून जो अग्नि उत्पन्न होतो त्यास शुचि असें ह्मणतात. ( ३८ ) हव्यवाह, कव्यवाह आणि सहरक्षा अशीं तीन नांवें असणारे अग्नि आहेत. त्या तिघांचे अनुक्रमानें दैव, पित्र्य आणि आसुर असे तीन मुलगे आहेत. ( ३९ ) ह्यांचे मुलगे आणि नातु एकोणपन्नास आहेत, ते काम्य, नैमित्तिक आणि नित्यकर्म ह्या तीन कर्मांत राहतात. ( ४० ) ते सर्वजण तपस्वी आहेत असें जाणावें, तसेच ते सर्वजण व्रतें पाळणारे आहेत, ते सर्व

सर्वे रुद्रात्मकाश्चैव सर्वे रुद्रपरायणाः ॥४०॥ तस्मादग्निमुखे यत्तद्दत्तं स्याद्येन केनचित् ॥ तत्सर्वं रुद्रमुद्दिश्य दत्तं स्यान्नात्र संशयः॥४१॥ इत्येवं निश्चयोऽग्नीनामनुक्रांतो यथातथम् ॥ नातिविस्तरतो विप्राः पितॄन्वक्ष्याम्यतःपरम् ॥ ४२ ॥ ब्रह्मणः पितृवर्ष्मत्वात्सृजतो जज्ञिरे तदा ॥ मध्वादयः षड्ऋतवः स्वान्पितॄन्परिचक्षते ॥ ४३ ॥ यस्मात्षड्ऋतवस्तेषां स्थानं स्थानाभिमानिनाम् ॥ ऋतवः पितरस्त स्मादित्येषा वैदिकी श्रुतिः ॥ ४४ ॥ यस्मादृतुषु सर्वे हि जायंते स्थाणुजंगमाः ॥ तस्मादेतेऽपि पितर आर्तवा इति च श्रुतम् ॥४५॥ एवं पितॄणामेतेषामृतुकालाभिमानिनाम्॥ऋतुत्वमार्तवत्वं च पितृत्वं च प्रकीर्तितम् ॥४६ ॥ मन्वंतरेषु सर्वेषु पितरस्तेऽभिमानिनः ॥ आसै- श्वर्या महात्मानस्तिष्ठंतीहाभ्रसंगमात् ॥ ४७ ॥ अग्निष्वात्ता बर्हिषदः

---

रुद्रस्वरूप असून सर्वजण रुद्राची भक्ति करण्यांत दक्ष असतात. ( ४१ ) ह्यासाठीं जर कोणी कांहींही वस्तु अग्नीच्या मुखांत अर्पण केली तर तें दान शिवाला उद्देशून अर्पण केल्यासारखें आहे, ह्यांत संशय नाहीं. ( ४२ ) ह्याप्रमाणें हा अग्नीविषयीं विचार जसा होता तसा तुह्मांस सांगितला. हे ब्राह्मणहो, आतां ह्यापुढें फारसा विस्तार न करितां पितराविषयीं विचार तुह्मांस सांगतों. ( ४३ ) पितृशरीर धारण करून सृष्टि उत्पन्न करणाऱ्या त्या ब्रह्मदेवापासून त्यावेळीं व- संत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत आणि शिशिर हे सहा ऋतु उत्पन्न झाले, त्यांसच पितृ असें ह्मणतात. ( ४४ ) ज्याअर्थीं स्थानांचा अ- भिमान धारण करणाऱ्या त्या पितरांचें स्थानही सहा ऋतूच आहेत त्या अर्थीं त्या ऋतुंलाही पितृ असेंच नांव पडलें असें वेदांतील वाक्यें सां- गतात. ( ४५ ) ज्याअर्थी ऋतूमध्येंच सर्व स्थावर जंगम विश्व उ- त्पन्न होतें त्यामुळें त्या पितरांसही आर्तव असेंच प्रसिद्ध नांव पडलें. ( ४६ ) ह्याप्रमाणें ऋतुकालाचा अभिमान बाळगणाऱ्या ह्या पितरांस ऋतुत्व, आर्तवत्व आणि पितृत्व अशीं तीन धर्में मिळालीं. हीं तिन्हीहीं धर्में एकाच अर्थाचीं आहेत. ( ४७ ) सर्व मवंतरांत ते अभिमानी मोठे धनवान् आणि मोठ्या मनाचे पितर ढगाच्या आश्रयानें राहतात. ( ४८ ) पितरांचे अग्निष्वात्त आणि बर्हिषद असे दोन भेद आहेत.

पितरो द्विविधाः स्मृताः ॥ अयज्वानश्च यज्वानः क्रमात्ते गृहमेधिनः ॥ ४८ ॥ स्वधासूत पितृभ्यश्च े कन्ये लोकविश्रुते ॥ मेनां च धरणीं चैव याभ्यां विश्वमिदं धृतम् ॥ ४९ ॥ अग्निष्वात्तसुता मेना धरणी बर्हिषत्सुता ॥ मना हिमवतः पत्नी मैनाकं क्रौंचमेव च ॥ गौरीं गंगां च सुषुवे भवांगाश्लेषपावनीम् ॥ ५० ॥ मेरोस्तु धरणी पत्नी दिव्यौषधिसमन्वितम् ॥ मंदरं सुषुवे पुत्रं चित्रसुंदरकंदरम् ॥ ५१ ॥ स एव मंदरः श्रीमान्मेरुपुत्रस्तपोबलात् ॥ साक्षाच्छ्रीकंठनाथस्य शिवस्यावासतां गतः ॥ ५२ ॥ सासूत धरणी भूयास्तिस्रः कन्याश्च विश्रुताः ॥ वेलां च नियतिं चैव तृतीयामपि चायतिम् ॥ ५३ ॥ आयतिर्नियतिश्चैव पत्न्यौ द्वे भृगुपुत्रयोः ॥ स्वायंभुवेऽत-

---

त्यांतील अग्निष्वात्तांस अयज्व असें ह्मणतात आणि बर्हिषदांस यज्व असें ह्मणतात हे दोन्हीही पितर गृहस्थाश्रमी आहेत. ( ४९ ) स्वधेला पितरापासून दोन मुली झाल्या त्या लोकांत प्रसिद्ध आहेत. एकीचें नांव मेना असें असून दुसरीचें नांव धरणी असें होतें. या दोघी मुलींनीं हें सर्व जग रक्षण [ धारण ] केलें. ( ५० ) अग्निष्वात्तपितरांची मुलगी मेना आणि बर्हिषत् पितरांची मुलगी धरणी होय. मेना ही हिमालयाची बायको झाली तिचे पोटीं मैनाक आणि क्रौंच नांवाचे दोन मुलगे झाले व गौरी आणि गंगा नांवाच्या दोन मुली झाल्या. त्यांत गंगेला शंकराच्या शरीराचा स्पर्श झाला असल्यानें ती लोकांस पवित्र करणारी झाली. ( ५१ ) मेरु पर्वताची बायको धरणी हिच्यापासून मंदर पर्वत जन्मास आला त्या मंदर पर्वतावर सर्व तऱ्हांच्या उत्तम उत्तम औषधि आहेत आणि त्यावर मोठमोठ्या चित्रविचित्र सुंदर गुहा आहेत. (५२) मेरुपर्वताचा पुत्र तोच मंदर पर्वत मोठा भाग्यशाली आहे त्यानें मोठी खडतर तपश्चर्या करून तपश्चर्येच्या सामर्थ्यानें प्रत्यक्ष श्रीशंकराचें मुख्य राहण्याचें स्थान आपणच झाला. ( ५३ ) पुन्हां त्या धरणीला मेरुपर्वतापासून तीन मुली झाल्या हें सर्वांस माहीतच आहे. त्यांचीं नांवें १ वेला २ नियति आणि आयति अशीं होतीं. ( ५४ ) त्यापैकीं आयति आणि नियति ह्या दोन मुली भृगु ऋषीच्या दोन मुलांच्या दोघी

रे पूर्वं कथितस्तु तदन्वयः ॥ ५४ ॥ सुषुवे सागराद्वेला कन्यामेका-
मनिंदिताम् ॥ सवर्णां नाम सामुद्रीं पत्नीं प्राचीनबर्हिषः ॥ ५५ ॥
सामुद्री सुषुवे पुत्रान्दश प्राचीनबर्हिषः ॥ सर्वे प्राचेतसा नाम धनुर्वे-
दस्य पारगाः ॥ ५६ ॥ एषां स्वायंभुवे दक्षः पुत्रत्वमगमत्पुरा ॥
त्रियंबकस्य शापेन चाक्षुषस्यांतरे मनोः ॥ ५७ ॥ इत्येते ब्रह्मपुत्रा-
णां धर्मादीनां महात्मनाम् ॥ नातिसंक्षेपतो विप्रा नातिविस्तरतः
क्रमात् ॥ ५८ ॥ वर्णिता वै मया वंशा दिव्यदेवगणान्विताः ॥ क्रि-
यावंतः प्रजावंतो महर्द्धिभिरलंकृताः ॥ ५९ ॥ प्रजानां सन्निवेशोऽ
यं प्रजापतिसमुद्भवः ॥ न हि शक्यः प्रसंख्यातुं वर्षकोटिशतैरपि
॥ ६० ॥ राज्ञामपि च यो वंशो द्विधा सोऽपि प्रवर्तते ॥ सूर्यवंशः

---

बायका झाल्या, त्यांचा वंश स्वायंभुव मन्वंतरांत पूर्वी सांगितलाच आहे. ( ५५ ) सागराची वेला ही बायको झाली तिला समुद्रापासून एक फारच सुशील मुलगी झाली, तिचें नांव सवर्णा असें होतें, ही समुद्राची मुलगी सवर्णा [ सामुद्री ] ही प्राचीन बर्हीची बायको झाली. ( ५६ ) प्राचीनबर्हीपासून [ सुवर्णेच्या ] सामुद्रीच्या पोटीं दहा मुलगे झाले. त्या सर्वांस प्राचेतस असें ह्मणतात, ते सर्वजण धनुर्विद्येंत फार निष्णात होते. ( ५७ ) चाक्षुष मनूच्यावेळीं श्रीशंकराचा शाप झाल्यामुळें दक्षप्रजापति स्वायंभुवमनूच्या मन्वंतरांत ह्या दहा प्राचेतसांचा मुलगा झाला होता. असो. ( ५८ ) ह्याप्रमाणें धर्म वगैरे महान् महान् सामर्थ्यवान् ब्रह्मदेवाचे मानसपुत्र होते त्यांचे वंश मी तुह्माला फार संक्षिप्त रीतीनें नव्हेत आणि फार विस्तार करूनही नव्हेत अशा रीतीनें तुह्मांस सांगितले, ( ५९ ) ते वंश इतके श्रेष्ठ होते कीं, ते मोठमोठ्या देवांस देखील मान्य होते. ते सर्व वंश यज्ञयागादिक क्रिया करणारे होते, त्यांस मुलेंबाळें वगैरे पुष्कळ होतीं व त्या वंशांत मोठमोठाले ऋषि जन्मास आल्यामुळें त्या वंशास एक प्रकारचें महत्व होतें. ( ६० ) असो. हा सर्व प्रजांचा समुदाय ब्रह्मदेवापासूनच उत्पन्न झाला आहे, ह्याची सर्व गणती करूं लागलें तर शंभर कोटि वर्षें देखील पुरणार नाहींत. ( ६१ ) राजांचा जो वंश आहे तोही दोन प्रकारचा चालू

सोमवंश इति पुण्यतमः क्षितौ ॥ ६१ ॥ इक्ष्वाकुरंबरीषश्च ययातिर्नहुषादयः ॥ पुण्यश्लोकाः श्रुता येऽत्र तेऽपि तद्वंशसंभवाः ॥ ६२ ॥ अन्ये च राजऋषयो नानावीर्यपराक्रमाः ॥ किं तैः फलमनुक्रांतैरुक्तपूर्वैः पुरातनैः ॥ ६३ ॥ किंचेश्वरकथा वृत्ता यत्र तत्रान्यकीर्तनम् ॥ न सद्भिः संमतं मत्वा नोत्सहे बहु भाषितुम् ॥ ६४ ॥ प्रसंगादीश्वरस्यैव प्रभावद्योतनादपि ॥ सर्गादयो पि कथ्यंत इत्यलं तत्प्रविस्तरैः ॥ ६५ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे स्वायंभुववंशवर्णनं नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

---

आहे, त्याला सूर्यवंश आणि चंद्रवंश अशीं नांवें आहेत ते दोन्ही वंश पृथ्वीवर पुण्यकारक मानले आहेत. (६२) इक्ष्वाकु, अंबरीष, ययाति, नहुष वगैरे जे जे [ पुण्यश्लोक ] कीर्तिमान् आणि प्रसिद्ध राजे झाले ते देखील ह्याच वंशांत जन्मले होते. (६३) ह्याखेरीज आणखी अनेक दुसरे राजे मोठे पराक्रमी आणि कीर्तिमान् होऊन गेले, ते पूर्वीं सांगितले आहेत आणखी पुन्हां तेंच तें सांगत बसण्यांत काय फळ आहे? (६४) कां तर, ज्या ठिकाणीं ईश्वराची कथा चालली आहे. त्या ठिकाणीं दुसऱ्याच्च भलत्या सलत्या गोष्टी सांगत बसणें सज्जनांस संमत पडणार नाहीं. ह्यासाठीं ह्यापेक्षां जास्त विस्तारानें सांगावेंसें मला वाटत नाहीं. (६५) ईश्वराची कथा सांगत असतां सहज ओघास आलें ह्मणून आणि ईश्वराच्या प्रभावालाच जास्त बळकटी येण्यासाठीं हे शिवसृष्टीचे प्रकार वगैरे सांगितले. आतां सांगितलें तितकेंच पुरे आहे.

ह्याप्रमाणें शैवनांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेच्या पूर्वभागापैकीं स्वायंभुववंशाचें वर्णन नांवाचा पंधरावा अध्याय संपला.

---

## ॥ षोडशोऽध्यायः ॥

ऋषय ऊचुः ॥ देवी दक्षस्य तनया त्यक्त्वा दाक्षायणी तनुम् ॥ कथं हिमवतः पुत्री मेनायामभवत्पुरा ॥ १ ॥ कथं च निंदितो रुद्रो दक्षेण च महात्मना ॥ निमित्तमत्र किं तत्र येन स्यान्निंदितो भवः ॥ २ ॥ उत्पन्नश्च कथं दक्षो अपि शापाद्भवस्य तु ॥ चाक्षुषस्यांतरे पूर्वं मनोः प्रब्रूहि मारुत ॥ ३ ॥

वायुरुवाच ॥ शृण्वंतु कथयिष्यामि दक्षस्य लघुचेतसः ॥ वृत्तं पापात्प्रमादाच्च विश्वामरविदूषणम् ॥ ४ ॥ पुरा सुरासुराः सर्वे सिद्धाश्च परमर्षयः ॥ कदाचिद्द्रष्टुमीशानं हिमवच्छिखरं ययुः ॥ ५ ॥ तदा देवश्च देवी च दिव्यासनगतावुभौ ॥ दर्शनं दद-

---

( १ ) ऋषि ह्मणतातः— वायो, दक्षप्रजापतीची मुलगी देवी सती आपला देहत्याग करून हिमालयपर्वतापासून मेनेच्या पोटीं पूर्वी कशी जन्मली ? ( २ ) त्या मोठ्या मनाच्या दक्षप्रजापतीनें रुद्राची निंदा तरी काय ह्मणून केली ? असें त्यावेळीं कारण तरी काय झालें ? कीं, दक्षप्रजापतीस शिवाची निंदा करावी लागली त्यापुढें यानें शिवाची निंदा केली ? ( ३ ) वायु वा, दक्षप्रजापतीला शिवाचा चाक्षुष मनुच्यावेळीं शाप झाल्यामुळें स्वायंभुव मनूच्या वेळीं तो कसा जन्मास आला ? हा सर्व कथाभाग तूं आह्मांस सांग.

( ४ ) वायु ह्मणालाः—ऋषीश्वरहो, मी तुह्माला त्या क्षुद्रबुद्धीच्या दक्षप्रजापतीच्या शापाचें कारण सांगेन. त्या दक्षानें पाप फार झालें ह्मणून त्याच्या हातून असें सर्व लोक निंदा करतील असें दुर्वर्तन घडलें. ( ५ ) पूर्वी एकवेळ सर्व देव, दैत्य, सिद्ध, महान् महान् ऋषि परमेश्वर श्रीशंकरांचें दर्शन घ्यावयासाठीं हिमालयपर्वताच्या शिखरावर [ कैलासास ] आले. ( ६ त्यावेळीं देवदेवी [ शिवपार्वती ] मिळून दोघेही एका उत्तम आसनांवर बसले होते, आणि हे ब्राह्मणहो जे दे

त्वस्तेषां देवादीनां द्विजोत्तमाः ॥ ६ ॥ तदानीमेव दक्षोऽपि गतस्तत्र सहामरैः ॥ जामातरं हरं द्रष्टुं द्रष्टुं चात्मसुतां सतीम् ॥७॥ तदात्मगौरवादेव देव्या दक्षे समागते ॥ देवादिभ्यो विशेषेण न काचिदभवत्स्तुतिः ॥ ८ ॥ तस्य तस्याः परं भावमज्ञातुश्चापि केवलम् ॥ पुत्रीत्येवं विमूढस्य तस्यां वैरमजायत ॥ ९ ॥ ततस्तेनैव वैरेण विधिना च प्रचोदितः ॥ नाजुहाव भवं दक्षो दीक्षितस्तामपि द्विषन् ॥ १० ॥ अन्यान् जामातरः सर्वानाहूय स यथाक्रमम् ॥ शतशः पुष्कलामर्चां चकार च पृथक्पृथक् ॥ ११ ॥ तथा तान्संगतान् श्रुत्वा नारदस्य मुखात्तदा ॥ ययौ रुद्राय रुद्राणी विज्ञाप्य

---

वादिक दर्शनास येत होते त्यांस दर्शन देत होते. ( ७ ) त्यावेळेलाच दक्षप्रजापतीही आपल्या बरोबर देवमंडळी घेऊन आपल्या जावयाची ( रुद्राची ) आणि आपल्या मुलीची ( सतीची ) भेट घ्यावयाकरितां कैलासपर्वतावर आला. ( ८ ) त्यावेळीं आपल्या योग्यतेमुळें स्वाभाविकरीतीनें सतीनें ( देवीनें ) दक्षप्रजापती आला असतां हा प्रत्यक्ष आपला बाप आहे असें समजून दर्शनास आलेल्या देवादिकांपेक्षां त्याचा जास्त सन्मान केला नाहीं. तिला त्याचें आदरातिथ्य करण्याचें स्मरणच राहिलें नाहीं. ( ९ ) हें कृत्य त्या सतीच्या हातून विस्मृतीनें घडतानाहीं झालें खरें परंतु ही माझी मुलगी असता हिनें उद्धटपणानें मुद्दाम माझा अपमान केला असें समजून तो मूर्ख दक्षप्रजापती सतीचा द्वेष करूं लागला. ( १० ) त्या वैरामुळें आणि त्या दक्षप्रजापतीचें दुर्दैव त्यामुळें त्यानें यज्ञ करण्याकरितां दीक्षा घेतली त्यावेळीं यज्ञसमारंभ पाहण्यास शंकरास आणि सतीस मुळींच बोलाविलें नाहीं. ( ११ ) रुद्राखेरीज दुसरे जितके तेवीस जावई होते त्या सर्वांस बोलाविलें आणखी निरनिराळ्यास शेंकडों तऱ्हेनें पुष्कळ पाहुणचार त्या जावयांचा मानसन्मान फार चांगल्या तऱ्हेनें केला. ( १२ ) आपला बाप दक्षप्रजापती यज्ञ करितो आहे. व त्या समारंभाकरितां आपल्या सर्व बहिणी आपआपल्या पतीसहीत तेथें आल्या आहेत असें नारदाकडून वर्तमान समजतांच सती श्रीरुद्राची आज्ञा

भवनं पितुः ॥ १२ ॥ अथ सन्निहितं दिव्यं विमानं विश्वतोमुखम् ॥ लक्षणाढ्यं सुखारोहमतिमात्रमनोहरम् ॥ १३ ॥ तप्तजांबूनदप्रख्यं चित्ररत्नपरिष्कृतम् ॥ मुक्तामयवितानाग्र्यस्रग्दामसमलंकृतम् ॥ १४ ॥ तप्तकांचननिर्व्यूहं रत्नस्तंभशतावृतम् ॥ वज्रकल्पितसोपानं विद्रुमस्तंभतोरणम् ॥ १५ ॥ पुष्पपट्टपरिस्तीर्णं चित्ररत्नमहासनम् ॥ वज्रजालकिरच्छिद्रमच्छिद्रमणिकुट्टिमम् ॥ १६ ॥ मणिदंडमनोज्ञेन महावृषभलक्ष्मणा ॥ अलंकृतपुरोभागमभ्रशुभ्रेण केतुना ॥ १७ ॥ रत्नकंचुकगुप्तांगैश्चित्रवेत्रैकपाणिभिः ॥ अधिष्ठि-

---

घेऊन आपल्या बापाच्या ( दक्षप्रजापतीच्या ) घरीं जाण्यास निघाली. ( १३ ) सतीनें दक्षाचे येथें जाण्याकरितां जवळ असलेलें एक उत्तम विमान तयार केलें, त्याला चोहोंकडे दरवाजे होते. त्याची बांधणूक फारच चांगली होती, व त्यांत वर जाण्याकरितां सोप्यासोप्या अशा अनेक पायऱ्या असून तें विमान दिसण्यांत फारच नामी होतें. ( १४ ) तें विमान तापविलेल्या सोन्यासारखें झळकत होतें. त्याच्या भिंतीला अनेक प्रकारचीं रत्नें जडविली होतीं. विमानांत मोत्यांचे छत मारिलें असून जागोजाग मोत्यांच्या माळा लोंबत सोडलेल्या होत्या. ( १५ ) तापविलेल्या सोन्यासारख्या त्या विमानाच्या सभोंवतीं भिंती झळकत होत्या व त्यांत शेंकडों रत्नाचे खांब होते. इंद्रनील मण्याच्या पायऱ्या असून पोंवळ्यांची खांबास तोरणें बांधलेलीं होतीं. ( १६ ) जाण्यायेण्याच्या रस्त्यावर तेथें जागोजाग सुवासिक फुलें पसरलेलीं होतीं व अनेक प्रकारचीं रत्नांचीं आसनें तेथें पसरलीं होतीं. त्यांत रत्नांची फरशी केली होती त्यांत जागोजाग वैडूर्यमणी बसविलेले असल्यामुळें शोभत होते. ( १७ ) त्या विमानाला एक रत्नांचा दांडा असणारा ध्वज होता आणि त्यावर वृषभाचें चिन्ह होतें, तो ध्वज शरदृतूंतील पांढऱ्या शुभ्र मेघाप्रमाणें शोभत असून त्या ध्वजामुळें विमानाची पुढची बाजूही फार शोभिवंत दिसत होती. ( १८ ) त्या विमानांत रत्नांचे आंगरखे आंगांत घालून हातांत अनेक प्रकारच्या सुशोभीत वेताच्या छड्या घेतलेले मोठमोठे बलिष्ठ शि-

तमहाद्वारमप्रधृष्यैर्गणेश्वरैः ॥ १८ ॥ मृदंगतालगीतादिवेणुवीणा-
विशारदैः ॥ विदग्धवेषभाषैश्च बहुभिः स्त्रीजनैर्वृतम् ॥ आरुरोह
महादेवी सह प्रियसखीजनैः ॥ १९ ॥ चामरव्यजने तस्या वज्र-
दंडे मनोहरे ॥ गृहीत्वा रुद्रकन्ये द्वे विवीजतुरुभे शुभे ॥ २० ॥
तदा चामरयोर्मध्ये देव्या वदनमाबभौ ॥ अन्योन्यं युध्यतोर्मध्ये हंस-
योरिव पंकजम् ॥ २१ ॥ छत्रं शशिनिभं तस्याश्चूडोपरि सुमालिनी ॥
धृतमुक्तापरिक्षिप्तं बभार प्रेमनिर्भरा ॥ २२ ॥ तच्छत्रमुज्वलं देव्या
रुरुचे वदनोपरि ॥ उपर्यमृतभांडस्य मंडलं शशिनो यथा ॥ २३ ॥
अथ चाग्रे समासीना सुस्मितास्या शुभावती ॥ अक्षद्यूतविनोदेन
रमयामास पार्वतीम् ॥ २४ ॥ सुयशाः पादुके देव्याः शुभे रत्नपरि-
ष्कृते ॥ स्तनयोरंतरे कृत्वा तदा देवीमसेवत ॥ २५ ॥ अन्या कां-

---

वगैरे उभे राहिले होते. ( १९ ) मृदंग, ताल गाणें आणि वेणु, वीणा वगैरे वाजविण्यांत प्रवीण असणारे चतुरगणाचे वेष आणि भाषा वापरणारे स्त्रीसमुदाय त्या विमानांत पुष्कळ होते, त्या विमानांत महादेवी ( शिवपत्नीसती ) आपल्या मैत्रिणीसहीत जाऊन बसली. ( २० ) तिच्या बाजूस उभ्या राहून दोन रुद्रकन्या रत्नांचे दांडे असलेले शानदार चवरी आणि पंखे घेऊन तिजवर वारीत होत्या. ( २१ ) दोन हंसांचें परस्पर भांडण लागलें ह्मणजे त्यांच्या मध्यभागीं असणारें कमळ जसें शोभावें तसेंच सतीचें तोंड तिजवर दोन बाजूस दोन रुद्रकन्या चवऱ्या वारीत असतां त्यांचे छायेखालीं शोभूं लागले. ( २२ ) त्या सतीचें छत्र चंद्रासारखें असून त्याचे सभोंवतीं मोती गुंफलेले होते तें सतीच्या मस्तकावर सुमालिनी नांवाच्या मैत्रिणीनें धरिलें होतें. ( २३ ) एखादें अमृतानें भरलेलें भांडें असून त्यावर चंद्राचें मंडळ जसें शोभतें त्याप्रमाणें सतीच्या मस्तकावरील तें तेजःपुंज छत्र शोभूं लागलें. ( २४ ) मग त्या सतीच्या पुढेंच बसलेली हंसतमुख असणारी शुभावती नांवाची तिची मैत्रीण फांशाचा डाव काढून तिचें मन रमवूं लागली. ( २५ ) सुयशा नांवाच्या दासीनें पायांत घालावयाच्या दोन पादुका ज्यांच्यावर अनेक प्रकारचीं रत्नें बसविलीं होतीं त्या आपल्या उरावर घेऊन ती सतीची सेवा करीत होती. ( २६ ) दुसऱ्या कोणी

चनचार्वंगी दीप्तं जग्राह दर्पणम् ॥ अपरा तालवृंतंच परा तांबूलपेटिकाम् ॥ २६ ॥ काचित्क्रीडाशुकं चारु करे चकार भामिनी ॥ काचित्तु सुमनोज्ञानि पुष्पाणि सुरभीणि च ॥ २७ ॥ काचिदाभरणाधारं बभार कमलेक्षणा ॥ काचिच्च पुनरालेपं सप्रसूनं सभाजनम् ॥२८॥अन्याश्च सुदृशस्तास्ता यथास्वमुचितक्रियाः॥ आवृत्त्यांतरं महादेवीमसेवंत समंततः॥२९॥अतीव शुशुभे तासामंतरे परमेश्वरी ॥ तारापरिषदोर्मध्ये चंद्रलेखेव शारदी ॥ ३० ॥ ततः शंखसमुत्थस्य नादस्य समनंतरम् ॥ प्रास्थानिको महानादः पटहः समताड्यत ॥ ३१॥ ततो मधुरवाद्यानि सह तालोद्यतैः स्वनैः॥ अ-

---

एका सुस्वरूप स्त्रीनें सतीपुढें एक सुशोभित आरसा धरिला होता, दुसऱ्या एकीनें ताडाचा पंखा घेतला होता व आणखी एकीनें सतीच्या विड्याचा डबा घेतला होता. ( २७ ) दुसऱ्या कोणी एका बाईनें आपल्या हातांत बाळगलेला राघु घेतला होता. दुसरी एकजण बाई सुवासिक आणि दिसण्यांत शानदार अशीं फुलें गोळा करून सतीपुढें घेऊन उभी होती. ( २८ ) कोणी एकीनें सतीच्या अलंकाराची पेटी आपले जवळ घेतली होती, दुसरी कोणी एकजण सतीच्या आणि इतर स्त्रियांच्या अंगास उटी लावित होती व सुवास घेण्याकरितां फुलें देत होती. ( २९ ) दुसऱ्याही आणखी कितएिक सुंदर नेत्र असणाऱ्या स्त्रिया सतीच्या आसपास [ सभोंवती ] बसून त्यावेळेस योग्य असें आपापलें काम करीत होत्या, ( ३० ) जशी भोंवतालीं अनेक चांदण्या चमकत असतां त्यांच्यामध्यें चंद्राची कोर शोभावी त्याप्रमाणें परमेश्वरी सती त्या मैत्रिणींच्या आणि दासीजनांच्या मंडळींत फारच शोभली. ( ३१ ) अशा सर्व दासींसहित आणि मैत्रिणीसहित सती त्या विमानांत जाऊन बसल्यावर लागलाच शंखनाद होऊं लागला व प्रयाण करावयाच्या वेळेचा पटहाचा आवाज मोठमोठ्यानें होऊं लागला. ( ३२ ) त्यावेळीं तालाला अनुसरून सुस्वर गाणी सुरू झालीं व मधुर मधुर वाद्यें वाजूं लागलीं. तसींच शेंकडों काहलवामध्यें वाजूं

नाहतानि सन्नेदुः काहलानां शतानि च ॥ ३२॥ सायुधानां गणेशा नां महेशसमतेजसाम् ॥ सहस्राणि शतान्यष्टौ तदानीं पुरतो ययुः ॥ ॥ ३३ ॥ तेषां मध्ये वृषारूढो गजारूढो यथा गुहः ॥ जगाम गण ; श्रीमान्सोमनंदी सुरार्चितः ॥ देवदुंदुभयो नेदुर्दिवि दिव्यसुखस्वनाः॥३४॥ननृतुर्मुनयः सर्वे मुमुदुः सिद्धयोगिनः॥ ससृजुः पुष्पवृष्टिं च विमानोपरि वारिदाः ॥३५॥ तदा देवगणैश्चान्यैः पथि सर्वत्र संगता ॥ क्षणादिव पितुर्गेहं प्रविवेश महेश्वरी ॥ ३६ ॥ तां दृष्ट्वा कुपितो दक्षश्चात्मनः क्षयकारणात् ॥ तस्या यवीयसीभ्योऽपि चक्रे पूजामसत्कृताम् ॥ ३७ ॥ तदा शशिमुखी देवी पितरं सदसि स्थितम् ॥

---

लागली. ( ३३ ) त्या विमानाच्या पुढील बाजूस शिवासारखे पराक्रमी असणारे आठ लक्ष शिवगण आपापल्या हातांत शस्त्रास्त्रें घेऊन चालूं लागले. ( ३४ ) त्या सर्व शिवगणांच्या मध्यभागीं कार्तिकस्वामी जसा हत्तीवर बमून चालतो तसा तो सर्वगुणसंपन्न सोमनंदी गणेश्वर स्वतः देवादिकांस मान्य होता तरी सर्वांबरोबर विमानापुढें चालूं लागला ( ३५ ) त्यावेळीं आकाशांत देव दुंदुभि ( नगारे ) वाजवूं लागलें, व उत्तम रीतीनें कानास गोड लागेल अशा मधुर स्वरानें देवांगना गायन करूं लागल्या. सर्व मुनीश्वर आनंदानें नाचूं लागलें, सिद्धांस व योगीश्वरांस तर मोठा आनंद झाला. विमानावर मेघ फुलांचा वर्षाव करूं लागले. ( ३६ ) त्यावेळीं आणखी दुसरे देवांचे समुदायही विमानास वाटेंत येऊन मिळाले आणि समारंभानें लवकरच महादेवी दक्षप्रजापतीच्या [ आपल्या, बापाच्या ] घरीं येऊन पोहोंचली. ( ३७ ) त्या सतीला आपल्या घरीं आलेली पाहिल्याबरोबर दक्षास मोठा राग आला आणि त्याचा नाश होण्याची वेळ जवळ आली असल्यानें दुर्जन लोक जसा योग्य मनुष्याचा सन्मान न करितां भलत्याच मनुष्याचा सन्मान करितात त्याप्रमाणें त्यानें सतीचे आदरातिथ्य वगैरे कांहींएक न करितां सतीच्या लहान बहिणीचें आदरातिथ्य केलें. ( ३८ ) त्यावेळीं चंद्रमंडलाप्रमाणें सुशोभितमुखें असणारी देवी [ सती ] यज्ञशाळेंत

अंबिका युक्तमव्यग्रमुवाच कृपणं वचः ॥ ३८ ॥

देव्युवाच ॥ ब्रह्मादयः पिशाचांता यस्याज्ञावशवर्तिनः ॥ स देवः सांप्रतं तात विधिना नार्चितः किल ॥ ३९ ॥ तदास्तां मम ज्यायस्याः पुत्र्याः पूजां किमीदृशीम् ॥ असत्कृतामवज्ञाय कृतवानासि गर्हिताम् ॥ ४० ॥ एवमुक्तोऽब्रवीदेनां दक्षः क्रोधादमर्षितः ॥ त्वत्तः श्रेष्ठा वरिष्ठाश्च पूज्या बालाः सुता मम ॥४१॥ तासां तु ये च भर्तारस्ते मे बहुमता मुदा ॥ गुणैश्चाप्यधिकाः सर्वे भर्तुस्ते त्र्यंबकादपि ॥ ४२ ॥ स्तब्धात्मा तामसः सर्वस्त्वामिमं समुपाश्रिता ॥ तेन त्वामवमन्येऽहं प्रतिकूलो हि मे भवः ॥४३॥ तथोक्ता पितरं दक्षं क्रुद्धा देवीदमब्रवीत् ॥ शृण्वतामेव सर्वेषां

---

बसलेल्या आपल्या बापाजवळ [ दक्षप्रजापतीजवळ ] जाऊन सावकाशपणाणें हळूच नम्रतेनें योग्यरीतीनें तिला काय बोलावयाचें होतें तें बोलूं लागली.

( ३९ ) सती ह्मणालीः—ब्रह्मदेवापासून तो तहत पिशाचापर्यंत सर्व प्राणिमात्र ज्या शिवाच्या आज्ञेंत राहतात, तो सदाशिव, ताता, तुह्मी ह्या यज्ञांत यथाविधीनें पूजिला नाहीं. ( ४० ) बरें तें असो, परंतु माझ्या लहान बहिणींचा आदरसत्कार मजपेक्षां इतका जास्त कां केला. हें असें करणें चांगुलपणाची रीति नव्हे ह्याची लोक निंदा करितात. हें तुह्मांस समजावयास पाहिजे होतें. ( ४१ ) सतीनें असें ह्मटल्याबरोबर रागानें लाल होऊन दक्षप्रजापति तिला ह्मणूं लागला. अगे, तुझ्या लहान बहिणी जरी असल्या तरी त्या माझ्या मुली तुझ्यापेक्षां जास्त योग्यतेच्या आहेत, आणि तुझ्यापेक्षां त्या श्रेष्ठ आहेत. ( ४२ ) त्यांचे नवरे देखील मला मान्य आहेत, त्यांस पाहून मला समाधान वाटतें, ते सर्वजण प्रत्यक्ष तुझ्या पतीपेक्षां [ त्र्यंबकापेक्षां ] देखील गुणांनीं जास्त आहेत. ( ४३ ) तो तुझा पति शर्व निव्वळ जड आणि तामसी आहे. आणि त्याचा तूं आश्रय केलास, त्यामुळेंच मी तुझा अपमान करितो, तुझा पति सदाशिव मला बिलकुल आवडत नाहीं. ( ४४ ) दक्षप्रजापतीनें असें ह्मटल्याबरोबर सतीस फारच राग आला, व ती त्या यज्ञ-

ये यज्ञसदसि स्थिताः ॥ ४४ ॥ अकस्मान्मम भर्तारमजाताशेषदूषणम् ॥ वाचा दूषयसे दक्ष साक्षाल्लोकमहेश्वरम् ॥ ४५ ॥ विद्याचरो गुरुद्रोही देवेश्वरविदूषकः ॥ त एते बहुपाप्मानः सद्यो दंड्या इति श्रुतिः ॥ ४६ ॥ तस्मादत्युत्कटस्यास्य पापस्य सदृशो भृशम् ॥ सहसा दारुणो दंडस्तव देवाद्भविष्यति ॥ ४७ ॥ त्वया न पूजितो यस्माद्देवदेवस्त्रियंबकः ॥ तस्मात्तव कुलं दुष्टं नष्टमित्यवधारय ॥ ४८ ॥ इत्युक्त्वा पितरं रुष्टा सती संसज्य साव्यया ॥ तदीयां च तनुं त्यक्त्वा हिमवंतं ययौ गिरिम् ॥ ४९ ॥ स पर्वतवरः श्रीमाँल्लब्धपुण्यफलोदयः ॥ तदर्थमेव कृतवान्सुचिरं दुश्चरं तपः ॥ ५० ॥ तस्मात्तमनुगृण्हाति भूधरेश्वरमीश्वरी ॥ स्वेच्छया

---

सभेंत बसलेल्या सर्व लोकांसमक्ष दक्षप्रजापतीस पुन्हा ह्मणूं लागली. ( ४५ ) दक्षप्रजापते [ ताता, ] माझा पति फार सज्जन आहे. त्याचे अंगीं कोणत्याही प्रकारचा दुर्गुण नाहीं, तो प्रत्यक्ष सर्व त्रैलोक्याचा पपरमेश्वर आहे, असें असतां तूं विनाकारण त्याला तोंडानें तूं अपशब्द बोलून त्याची निंदा करितो आहेस. ( ४६ ) जो कोणी विद्येची चोरी करितो, आपल्या गुरूचा द्वेष करितो, देवाची व ईश्वराची निंदा करितो, ते सर्वजण महापातकी होत, त्यांस अवश्य शिक्षा करावी असें वेद सांगतो. ( ४७ ) ह्यासाठीं तूं जें अशा रीतीचें दारुण पाप केलें आहेस त्याच्या योग्य दंड तुला त्या परमेश्वर श्रीशिवापासून होईलच होईल. ( ४८ ) ज्यापक्षीं तूं सर्व देवांचा अधिपति श्रीशंकर ह्याची पूजा केली नाहींस त्यापक्षीं तुझा हा वंश वाईट चालीचा आहे आणि त्याचा समूळ नाश होईल हें पक्कें समज. ( ४९ ) असें बोलून ती बापावर रागावलेली अविनाशी शरीर असणारी सती त्या दक्षप्रजापतीपासून उत्पन्न झालेल्या आपल्या शरीराचा त्याग करून पुन्हा जन्म घेण्याकरितां हिमालय पर्वताकडे गेली. ( ५० ) तो पर्वतश्रेष्ठही मोठा धनाढ्य आहे, त्याचें पुण्य फलद्रूप होण्याचाही प्रसंग आलाच होता आणि त्यानें आपणास सदाचारी सुस्वभावी मुलगी व्हावी ह्मणून अनेक काळपर्यंत खडतर तपश्चर्याही केली होती. ( ५१ ) ह्यासाठीं त्या

पितरं चक्रे स्वात्मनो योगमायया ॥ ५१ ॥ यदा गता सती दक्षं विनिंद्य भयविव्हला ॥ तदा तिरोहिता मंत्रा विहतश्च ततोऽध्वरः ॥ ५२ ॥ तदुपश्रुत्य गमनं देव्यास्त्रिपुरमर्दनः ॥ दक्षाय च ऋषिभ्यश्च चुकोप च शशाप तान् ॥ ५३ ॥ यस्मादवमता दक्ष मत्कृतेऽनागसा सती ॥ पूजिताश्चेतराः सर्वाः स्वसुता भर्तृभिः सह ॥ ५४ ॥ वैवस्वतेंऽतरे यस्मात्तव जामातरस्त्वमी ॥ उत्पत्स्यंते समं सर्वे ब्राह्मयज्ञेष्वयोनिजाः ॥ ५५ ॥ भविता मानुषो राजा चाक्षुषस्य त्वमन्वये ॥ प्राचीनबर्हिषः पौत्रः पुत्राश्चापि प्रचेतसः ॥ ५६ ॥ अहं तत्रापि ते विघ्नमाचरिष्यामि दुर्मते ॥ धर्मार्थकामयुक्तेषु क-

---

परमेश्वरीनें त्या पर्वतश्रेष्ठावर कृपा करण्याचा विचार केला. आणि तिनें आपल्या इच्छेप्रमाणें योगमायेच्या सामर्थ्यानें त्या पर्वताला आपला पिता [ बाप ] केले. [ आपण त्या पर्वताची मुलगी झाली. ] ( ५२ ) जेव्हां सती दक्षप्रजापतीची निंदा करून भयानें व्याकुळ होऊन निघून गेली, तेव्हां सर्व मंत्र तात्काळ गुप्त झाले आणि मग त्यामुळें त्या सर्व यज्ञाचाही नाश झाला. ( ५३ ) सतीचें अशा तऱ्हेचें वर्तमान त्रिपुरांचा विध्वंस करणाऱ्या श्रीशंकरास समजतांच ते दक्षप्रजापतीवर व दक्षप्रजापतीच्या यज्ञाकरितां जमलेल्या सर्व ऋषीश्वरावर फारच रागावले आणि त्यांनीं दक्षास व सर्व ऋषीस शाप दिले. ( ५४ ) शंकरांनीं असा शाप दिला कीं, ज्यापक्षीं दक्षप्रजापते, तूं उद्धटपणानें सतीचा काडीमात्र अपराध नसतां माझ्यासाठीं तिचा असा अपमान केलास आणि सतीखेरीज बाकीं सर्व मुलींची व त्याच्या नवऱ्यांची योग्य सरबराई ( आदरातिथ्य ) केलीस. ( ५५ ) त्यापक्षीं वैवस्वत मनूच्यावेळीं हे तुझे सर्व जांवई अयोनिज जरी आहेत तथापि ब्रह्मयज्ञांत एकदम सर्वजण जन्मास येतील. ( ५६ ) आणि तूंही चाक्षुष राजाच्या वंशांत प्राचीनबर्हीचा नातु आणि प्रचेत्याचा [ वरुणाचा ] मुलगा मनुष्याचा राजा होशील ( ५७ ) हे दुष्टबुद्धे दक्षप्रजापते, तेथें तूं कोणताही धर्म, अर्थ आणि काम संपादन करून देणारी सत्कृत्यें करूं लागलास म्हणजे मी तुला

मैस्त्वपि पुनःपुनः ॥ ५७ ॥ तेनैवं व्याहृतो दक्षो रुद्रेणामित-
तेजसा ॥ स्वायंभुवीं तनुं त्यक्त्वा पपात भुवि दुःखितः ॥ ५८ ॥
ततः प्राचेतसो दक्षो जज्ञे वै चाक्षुषेऽन्तरे ॥ प्राचीनबर्हिषः पौत्रः
पुत्रश्चैव प्रचेतसः ॥ ५९ ॥ भृग्वादयोऽपि ते जाता मनोर्वैवस्वतस्य
तु ॥ अंतरे ब्रह्मणो यज्ञे वारुणीं बिभ्रतस्तनुम् ॥ ६० ॥ तदा
दक्षस्य धर्मार्थं प्रवृत्तस्य दुरात्मनः ॥ महेशः कृतवान्विघ्नं मनौ
वैवस्वते सति ॥ ६१ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे षोड-
शोऽध्यायः ॥ १६ ॥

---

वरचेवर त्रास देत जाईन. ( ५८ ) अमोघ सामर्थ्य असणाऱ्या श्री-
शंकरांनीं दक्षप्रजापतीस असा शाप दिल्याबरोबर दक्षप्रजापती ब्रह्मदेवा-
पासून उत्पन्न झालेलें मानसशरीर टाकून देऊन भूमीवर मोठ्या दुःखानें
पडला. ( ५९. ) नंतर तो पुढें चाक्षुष मनूच्यावेळीं प्राचेतस दक्ष नांवाचा
मनुष्यांचा राजा झाला, तो शंकराच्या शापाप्रमाणेंच प्राचीनबर्हीचा
नातु असून प्रचेत्याचा [ वरुणाचा ] मुलगा होता. ( ६० ) भृगु
वगैरेही ते सर्वजण वैवस्वतमनूच्यावेळीं ब्रह्मदेवाच्या यज्ञांत वारुण
शरीर धारण करून जन्मास आले ( ६१ ) तेथें तो दुष्ट स्वभावाचा
दक्षप्रजापति कोणतेही धर्माचरण करूं लागला कीं, वैवस्वतमनूच्या
वेळीं त्याच्या प्रत्येक धर्मकृत्यांत विघ्न आणण्याचा उद्योग चालविला.

ह्याप्रमाणें श्रीशैवनांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेच्या
पूर्वभागापैकीं सोळावा अध्याय संपला.

## ॥ अथ सप्तदशोऽध्यायः ॥

ऋषय ऊचुः ॥ कथं दक्षस्य धर्मार्थं प्रवृत्तस्य दुरात्मनः ॥
महेशःकृतवान्विघ्नमेतदिच्छामहे वयम् ॥ १ ॥
वायुरुवाच ॥ विश्वस्य जगतो मातुरपि देव्यास्तपोबलात् ॥
पितृभावमुपागम्य मुदिते हिमवद्गुरौ ॥ २ ॥ देवेऽपि च कृतोद्वाहे
हिमवच्छिखरालये ॥ क्रीडमाने तया सार्धं काले बहुतरे गते ॥ ३ ॥
वैवस्वतेंऽतरे प्राप्ते दक्षः प्राचेतसः स्वयम् ॥ अश्वमेधेन यज्ञेन यक्ष्य-
माणोऽन्वपद्यत ॥ ४ ॥ ततो हिमवतः पृष्ठे दक्षो वै यज्ञमाहरत् ॥
गंगाद्वारे शुभे देशे ऋषिसिद्धनिषेविते ॥ ५ ॥ तस्य तस्मिन्मखे

---

ऋषि ह्मणालेः— ( १ ) दुष्ट स्वभावाचा तो दक्ष धर्मकृत्य करूं लागला असतां त्या धर्मकृत्यास श्रीशंकरांनीं कसे कसे विघ्न केले ते ऐकण्याची आमची फार इच्छा आहे तर तो सर्व कथाभाग वायुदेवा, तूं आह्मांस सांग.

वायु ह्मणालाः— ( २ ) ऋषीश्वरहो ऐका. सर्व त्रैलोक्याची आदिमाता श्रीसती हिच्या तपश्चर्येच्या सामर्थ्यानें हिमालयाला तिचा बाप व्हावें लागलें [ सती हिमालयाची मुलगी झाली ] त्यामुळें हिमालयास मोठा संतोष वाटला. ( ३ ) पुढें कांहीं काळानंतर हिमालयाच्याच शिखरावर पार्वतीचा शिवाबरोबर विवाहही झाला, आणि पार्वतीबरोबर सुखोपभोग करीत शिवाचा काळही बरेच दिवस लोटला. ( ४ ) तेव्हां वैवस्वतमनूच्यावेळीं प्राचेतस दक्ष स्वतः अश्वमेध यज्ञानें यजन करण्यास तयार झाला. ( ५ ) मग त्यानें ऋषीश्वर आणि सिद्ध लोक ज्याठिकाणीं राहतात अशा कल्याणकारक गंगाद्वार नांवाच्या प्रदेशांत अश्वमेध यज्ञ करण्यास आरंभ केला. ( ६ ) त्या प्राचेतस दक्षांच्या त्या यज्ञांत इंद्रादिक सर्वदेव एकत्र मिळून जाण्याचा विचार

देवाः सर्वे शक्रपुरोगमाः॥ गमनाय समागम्य बुद्धिमापेदिरे तदा॥६॥ आदित्या वसवो रुद्राः साध्याः सह मरुद्गणैः ॥ सोमपाश्चैव पितर आज्यपा धूमपास्तथा ॥७॥ अश्विनौ पितरश्चैव तथा चान्ये महर्षयः ॥ विष्णुना सहिताः सर्वे ह्यागता यज्ञभागिनः ॥ ८ ॥ दृष्ट्वा देवकुलं सर्वमीश्वरेण विना गतम् ॥ दधीचिर्मन्युनाविष्टो दक्षमेवमभाषत ॥ ९ ॥

दधीचिरुवाच ॥ अपूज्यपूजने चैव पूज्यानां चाप्यपूजने ॥ नरः पापमवाप्नोति महद्वै नात्र संशयः ॥ १० ॥ असतां सम्मतिर्यत्र सतामवमतिस्तथा ॥ दण्डो दैवकृतस्तत्र सद्यः पतति दारुणः ॥११॥ एवमुक्त्वा तु विप्रर्षिः पुनर्दक्षमभाषत ॥ पूज्यं तु पशुभर्तारं कस्मान्नार्चयसे प्रभुम् ॥ १२ ॥

---

करूं लागले. ( ७ ) आदित्य, वसु, रुद्र, साध्य आणि मरुद्गण सोमप [ सोमरस पिणारे ] पितर आज्यप [ तूप पिणारे ] तसेच धूर पिणारे ( ८ ) अश्विनीकुमार, पितर आणि तसेच दुसरेही महर्षि श्रीविष्णुसहित यज्ञभाग घेण्याचा ज्यांस ज्यांस अधिकार होता ते ते सर्व दक्षांच्या यज्ञास आले. ( ९ ) श्रीशंकराखेरीज इतर देवांचा समुदाय सर्व आला आणि शिव मात्र आले नाहींत असें पाहून दधीचिऋषीस फार राग आला व ते दक्षास ह्मणूं लागले.

( १० ) दधीचि ह्मणालेः— प्राचेतस दक्षा, ज्यांची पूजा करूं नये त्यांची पूजा केली व ज्यांची पूजा करावयाची त्यांची पूजा जर केली नाहीं तर मनुष्यास अतिशय पाप लागतें ह्यांत कांहीं शंका नाहीं. ( ११ ) ज्याठिकाणीं दुर्जन मनुष्यांचा मानमरातब राहतो व सज्जन मनुष्याचा अपमान होतो त्याठिकाणीं असें कृत्य करणारास परमेश्वराकडून भयंकर शिक्षा होतेच होते. ( १२ ) इतकें ह्मणून तो दधीचि ऋषि दक्षास पुन्हां ह्मणाला, अरे श्रीपशुपति [ श्रीशिव ] पूजा करण्यास योग्य असतां तूं त्याची पूजा कां करीत नाहींस ?

दक्ष उवाच ॥ सन्ति मे बहवो रुद्राः शूलहस्ताः कपर्दिनः ॥ एकादशावस्थिता ये नान्यं वेद्मि महेश्वरम् ॥ १३ ॥

दधीचिरुवाच ॥ किमेभिरमरैरन्यैः पूजितैरध्वरे फलम् ॥ राजा चेदध्वरस्यास्य न रुद्रः पूज्यते त्वया ॥ १४ ॥ ब्रह्मविष्णुमहेशानां स्रष्टा यः प्रभुरव्ययः ॥ ब्रह्मादयः पिशाचांता यस्य कैंकर्यवादिनः ॥ १५ ॥ प्रकृतीनां परश्चैव पुरुषस्य च यः परः ॥ चिंत्यते योगविद्भिर्ऋषिभिस्तत्वदर्शिभिः ॥१६॥ अक्षरं परमं ब्रह्म असच्च सदसच्च यत् ॥ अनादिमध्यनिधनमप्रतर्क्यं सनातनम् ॥१७॥ यः स्रष्टा चैव संहर्ता भर्ता चैव महेश्वरः ॥ तस्मादन्यं न पश्यामि

---

( १३ ) दधीचीचें तें बोलणें ऐकून दक्ष ह्मणाला. ऋषीश्वरा, मजजवळ पुष्कळ रुद्र आहेत, त्यांच्या हातांत तीक्ष्ण धारेचे शूल आहेत, त्यांच्या मस्तकावर जटांचीं मोठमोठीं ओझीं आहेत त्यांची संख्या अकरा आहे हें मला माहीत आहे त्याखेरीज आणखी कोणी महेश्वर आहे हें मला माहीत नाहीं आणि असला तरी त्यास मी मानीत नाहीं.

( १४ ) दक्षाचे हें बोलणें ऐकून दधीचि ह्मणाला. ह्या यज्ञाचा श्रीशंकर हाच राजा आहे त्याची तूं पूजा न करितां बाकीच्या ह्या सर्व देवांची पूजा केलीस तर ह्या यज्ञाचा किंवा तुझ्या पूजा करण्याचा कांहीं उपयोग नाहीं. ( १५ ) कां तर, तो परमात्मा श्रीशिव ब्रह्मदेव विष्णु आणि महेश्वर ह्यांचा उत्पन्नकर्ता आहे, ज्याला परमेश्वर ह्मणतात, जो अविनाशी आहे, ब्रह्मदेवापासून तों तहत पिशाचापर्यंत सर्व स्थावर जंगम विश्व त्याचें आज्ञाधारक आहे. ( १६ ) तो प्रकृतींहून श्रेष्ठ आहे व पुरुषाहूनही श्रेष्ठ आहे. योगसाधन करणारे तत्वज्ञानी ऋषीश्वर त्या परमेश्वराचें मनामध्यें नेहमीं चिंतन करितात. ( १७ ) तो परमात्मा अविनाशी आहे, तो श्रेष्ठ ब्रह्मस्वरूप आहे, असत् आणि सत् जें कांहीं आहे तें सर्व तोच आहे. त्याला जन्म नाहीं, तरुणपणा नाहीं, आणि मरणही नाहीं, त्याचा तर्क करितां येत नाहीं, व तो सनातन आहे. ( १८ ) जो महेश्वर सर्व जग उत्पन्न करितो, सर्व जगाचें रक्षण क-

शंकरात्मानमध्वरे ॥ १८ ॥

दक्ष उवाच ॥ एतन्मखेशस्य सुवर्णपात्रे हविः समस्तं विधिमंत्रपूतम् ॥ विष्णोर्नयाम्यप्रतिमस्य भागं प्रभोर्विभज्याहवनीय मद्य ॥ १९ ॥

दधीचिरुवाच ॥ यस्मान्नाराधितो रुद्रः सर्वदेवेश्वरेश्वरः ॥ तस्माद्दक्ष तवाशेषो यज्ञोऽयं न भविष्यति ॥ २० ॥ इत्युक्त्वा वचनं क्रुद्धो दधीचो मुनिसत्तमः ॥ निर्गम्य च ततो देशाज्जगाम स्वकमाश्रमम् ॥ २१ ॥ निर्गतेऽपि मुनौ तस्मिन्देवा दक्षं न तत्यजुः ॥ अवश्यमनुभाव्यत्वादनर्थस्य तु भाविनः ॥ २२ ॥ एतस्मिन्नेव काले तु

---

रितो आणि सर्व जगाचा संहारही करितो, हें सर्वत्रैलोक्य शंकरस्वरूपच आहे त्यामुळें ह्या अश्वमेध यज्ञांत श्रीशंकराखेरीज दुसरा देव मला पूजा करण्यास योग्य दिसत नाहीं.

( १९ ) हें दधीचीचें बोलणें ऐकून दक्ष ह्मणाला. ह्या माझ्या अश्वमेधयज्ञाचा श्रीविष्णु अधिपति आहे, त्याला मी ह्या सुवर्णपात्रांतील विधीनं व मंत्रानें पवित्र झालेलें हवि अर्पण करणार आहें, त्या विष्णूची बरोबरी करणारा देव त्रैलोक्यांत नाहीं, त्या श्रीविष्णूला मी आतां हविर्भाग वांटून देतों.

( २० ) हें दक्षाचें बोलणें ऐकून दधीचि ह्मणाला—ज्याअर्थी श्रीरुद्र हा सर्वदेवांचा मुख्य देव असतां त्याची तूं आराधना करीत नाहींस, त्याअर्थीं दक्षा, तुझा हा यज्ञ निर्विघ्नपणानें सिद्धीस मुळींच जाणार नाहीं हें तूं पक्कें समज. ( २१ ) असें स्पष्ट सांगून तो दधीचि मुनीश्वर फार रागावून त्या दक्षाच्या यज्ञभूमीच्या प्रदेशापासन आपल्या आश्रमास निघून चालता झाला. ( २२ ) दधीचिमुनी असें बोलून निघून गेला तरी भवितव्यता [ अवश्य होणारी गोष्ट ] कोणासच चुकत नाहीं. ह्या नियमाप्रमाणें त्या सर्वदेवांवर दक्षाच्या संगतीनें अरिष्ट यावयाचेंच हें ठरलें असल्यामुळें त्या देवांनीं दक्षप्रजापतीचा पक्ष सोडिला नाहीं. ( २३ ) त्याचवेळीं हें सर्व वर्तमान श्रीशंकराकडून पार्वतीस सं-

ज्ञात्वैतत्सर्वमीश्वरात् ॥ दग्धुं दक्षाध्वरं विप्रा देवी देवमचोदयत् ॥ २३ ॥ देव्या संचोदितो देवो दक्षाध्वरजिघांसया ॥ ससर्ज स हरो वीरं वीरभद्रं गणेश्वरम् ॥ २४ ॥ सहस्रवदनं देवं सहस्रकमलेक्षणम् ॥ सहस्रमुद्गरधरं सहस्रशरपाणिकम् ॥ २५ ॥ शूलटंकगदाहस्तं दीप्तकार्मुकधारिणम् ॥ चक्रवज्रधरं घोरं चंद्रार्धकृतशेखरम् ॥ २६ ॥ कुलिशोद्योतितकरं तडिज्ज्वलितमूर्धजम् ॥ दंष्ट्रां करालां बिभ्राणं महावक्त्रं महोदरम् ॥ २७ ॥ विद्युज्जिव्हं प्रलंबोष्ठं मेघसागरनिस्वनम् ॥ वसानं चर्म वैयाघ्रं महद्रुधिरनिस्रवम् ॥२८॥ गंडद्वित-

---

मजल्यावर ब्राह्मणहो, त्या दक्षांचा यज्ञ जाळून टाकण्याविषयीं पार्वतीनें श्रीशिवास उत्तेजन दिलें. ( २४ ) मग पार्वतीनें अशी भर दिल्यावर दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करण्याकरितां त्या शिवानीं सर्व शिवगणांत श्रेष्ठ असणाऱ्या पराक्रमी वीरभद्रास आपल्या आंगापासून उत्पन्न केलें. ( २५ ) त्या वीरभद्राला हजार तोंडें होतीं व कमलांसारखे सुशोभित हजार डोळे होते, त्यानें आपल्या हातांत एक हजार मुद्गर घेतलेले असून त्याच्या हजार हातांत हजार बाण होते. ( २६ ) तशींच शूल टंक आणि गदा हीं आयुधेंही त्याच्या हातांत होतीं, त्यानें आपल्या हातांत लखलखीत धनुष्य घेतलेलें होतें. वज्र आणि चक्रही त्याच्या हातांत होतीं, त्याच्या मस्तकावर अर्धचंद्र भूषणासारखा शोभत होता. ( २७ ) त्यानें आपल्या हातांत इंद्रवज्र घेतलें असल्यामुळें त्याचा तो हात फार शोभत होता. विजेसारखे चकाकणारे त्याच्या डोकीवरील केश होते, त्याच्या दाढा फार अक्राळ विक्राळ होत्या, त्याचें तोंड फार भयंकर असून त्याचें पोट फारच मोठें होतें. ( २८ ) विजेसारखी त्याची जीभ होती, त्याचा ओंठ लांब असून मेघाच्या गडगडण्यासारखा आणि समुद्राच्या घोंघों शब्दासारखा त्याचा शब्द होता. ज्याच्यापासून रक्ताचे थेंब खालीं पडतात असें वाघाचें कातडें तो नेसला होता. ( २९ ) त्याच्या दोन्ही गालांवर गोल आकाराचीं कुंडलें लोंबत होतीं. श्रेष्ठ श्रेष्ठ देवांच्या मस्तकांच्या पंक्ति देखील? त्यास खालीं

यसंसृष्टमंडलीकृतकुंडलम् ॥ वरामरशिरोमालावलीकलितशेखरम् ॥ ॥ २९ ॥ रणन्नूपुरकेयूरमहाकनकभूषितम् ॥ रत्नसंचयसंदीप्तं तारहाराव्रतोरसम् ॥ ३० ॥ महाशरभशार्दूलसिंहैः सदृशविक्रमम् ॥ प्रशस्तमत्तमातंगसमानगमनालसम् ॥ ३१ ॥ शंखचामरकुंदेंदुमृणालसदृशप्रभम् ॥ सतुषारामिवाद्रींद्रं साक्षाज्जंगमतां गतम् ॥ ३२ ॥ ज्वालामालापरिक्षिप्तं दीप्तमौक्तिकभूषणम् ॥ तेजसा चैव दीप्यंतं युगांत इव पावकम् ॥ ३३ ॥ स जानुभ्यां महीं गत्वा प्रणतः प्रांजलिस्ततः ॥ पार्श्वतो देवदेवस्य पर्यतिष्ठद्गणेश्वरः ॥ ३४ ॥ मन्युना चासृजद्भद्रां भद्रकालीं महेश्वरीम्¹ ॥ आत्मनःकर्मसाक्षित्वे तेन गंतुं

---

माना वांकवीत होत्या. ( ३० ) त्याच्या पायांतील घागऱ्या वाजत असून त्याचीं बाहुभूषणें उत्तम सोन्याचीं केलीं असल्यानें तीं फार शोभत होतीं. त्याच्या अंगावर बहुमोल रत्नांचे अलंकार होते त्यामुळें तो फार तेजःपुंज दिसत होता. सुंदर सुंदर मोत्यांच्या माळा त्याच्या उरावर लोंबत होत्या. ( ३१ ) मोठमोठे शरभ, वाघ आणि सिंह ह्याच्यासारखा तो पराक्रमी होता, मोठमोठाल्या धिप्पाड व मदोन्मत्त झालेल्या हत्तींप्रमाणें तो हळू हळू चालत होता. ( ३२ ) शंख, चामर, कुंदपुष्प, चंद्र आणि कमलतंतु ह्यांच्यासारखी पांढरी शुभ्र त्याची आंगकांति होती. त्या वीरभद्राला पाहून असें वाटे कीं, ज्यावर बर्फाचे मोठमोठें ढीग पडलेले आहेत असा प्रत्यक्ष हिमालय पर्वतच आहे आणि त्यास आतां जाण्यायेण्याची शक्ति आलेली आहे. ( ३३ ) ज्वालांचे समुदाय त्याच्या आंगांतून निघत होते, त्याच्या गळ्यांत पांढऱ्या शुभ्र तेजदार मोत्यांच्या माळा होत्या, प्रळयकाळीं त्रैलोक्यास जाळूं लागणारा अग्नि जसा तेजःपुंज दिसतो त्याप्रमाणें तो वीरभद्र तेजःपुंज दिसत होता. ( ३४ ) त्या वीरभद्रानें जमीनीस गुढघे लाऊन खालीं डोकें जमीनीस लाऊन शंकरास नमस्कार केला आणि मग हात जोडून नम्रतेनें तो गणेश्वर [ वीरभद्र ] देवाधिदेव श्रीशंकराच्या एका बाजूस जाऊन उभा राहिला. ( ३५ ) पुन्हां शंकरांनीं आपल्या कर्मसाक्षीपणाच्या सामर्थ्यानें त्याच्या सहायास त्याज बरोबर जाण्याकरितां कल्याणकारक

¹ पा० १ महेश्वरी.

सहैव तु ॥३५॥ तं दृष्ट्वावस्थितं वीरभद्रं कालाग्निसन्निभम् ॥ भद्रया सहितं प्राह भद्रमस्त्विति शंकरः ॥ ३६ ॥ स च विज्ञापयामास सह देव्या महेश्वरम् ॥ आज्ञापय महादेव किं कार्यं करवाण्यहम् ॥३७॥ ततस्त्रिपुरहा प्राह हैमवत्या प्रियेप्सया ॥ वीरभद्रं महाबाहुं वाचा विपुलनादया ॥ ३८ ॥

देवदेव उवाच ॥ प्राचेतसस्य दक्षस्य यज्ञं सद्यो विनाशय ॥ भद्रकाल्या सहासि त्वमेतत्कृत्यं गणेश्वर ॥ ३९ ॥ अहमप्यनया-सार्धं रम्याश्रमसमीपतः ॥ स्थित्वा वीक्ष्ये गणेशान विक्रमं तव दुः-सहम् ॥ ४० ॥ वृक्षाः कनखले ये तु गंगाद्वारसमीपगाः ॥ सुवर्ण-शृंगस्य गिरेर्मेरुमंदरसन्निभाः ॥ ४१ ॥ तस्मिन्प्रदेशे दक्षस्य यज्ञः

---

अशा भद्रकाली नांवाच्या महेश्वरीस उत्पन्न केलें. ( ३६ ) तो प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें क्रूर स्वभावाचा वीरभद्र गणेश्वर भद्रकालीसहित आपल्या समोर एका बाजूस हात जोडून उभा आहे असें पाहतांच श्रीशंकर त्याला ह्मणाले, मुला, तुझें कल्याण असो. ( ३७ ) मग तो वीरभद्रही नम्रतेनें पार्वतीसहित श्रीमहेश्वरास [ शिव पार्वतीस ]ह्मणाला. महादेवा, मी तुमचें कोणतें काम करूं तें मला आज्ञा करा. तें करण्यास मी सिद्ध आहे. ( ३८ ) हें वीरभद्राचें बोलणें ऐकतांच शिव पार्वतीसह समक्ष त्या पराक्रमी वीरभद्रास मोठी गर्जना करून ह्मणाले.

( ३९ ) शंकर ह्मणालेः— तूं ह्या भद्रकालीस सहाय घेऊन प्राचेतस दक्षाचा यज्ञ आतांचे आतां नाहींसा करून टाक. हे गणेश्वरा हेंच माझें काम तुला करावयाचें आहे. ( ४० ) मीही ह्या पार्वतीला बरोबर घेऊन एखाद्या हवाशीर आश्रमाच्या जवळ बसून गणेश्वरा तूं कसा काय पराक्रम करितोस, आणि त्यापासून दक्षास किती त्रास पोंचतो हा सर्वप्रकार पाहत बसतो. ( ४१ ) कनखल तीर्थीत गंगाद्वाराजवळ सुवर्णाचीं शिखरें असणाऱ्या हिमालयपर्वतावर मेरुपर्वतावर आणि मंदरपर्वतावर जशीं झाडें आहेत तशींच झाडें आहेत. ( ४२ ) त्या ठिकाणीं हल्लीं प्राचेतस दक्षाचा यज्ञ सुरू आहे, तेथें एकदम जाऊन

पा० १ रैभ्याश्रम ( रैभ्यऋषीच्या आश्रमाजवळ )

संप्रति वर्तते ॥ सहसा तस्य यज्ञस्य विघातं कुरु मा चिरम् ॥
॥ ४२ ॥ इत्युक्ते सति देवेन देवी हिमगिरींद्रजा ॥ भद्रं भद्रां च
संप्रेक्ष्य वत्सं धेनुरिवौरसम् ॥ ४३ ॥ आलिंग्य च समाघ्राय मूर्ध्नि
षड्वदनं यथा ॥ सस्मिता वचनं प्राह मधुरं मधुरस्वनम् ॥ ४४ ॥

देव्युवाच ॥ वत्स भद्र महाभाग महाबलपराक्रम ॥ मत्प्रियार्थं
त्वमुत्पन्नो मम मन्युं प्रमार्जय ॥ ४५ ॥ यज्ञेश्वरमनाहूय यज्ञक-
र्मरतोऽभवत् ॥ दक्षो वैरेण तं तस्माद्भिंधि यज्ञं गणेश्वरैः ॥ ४६ ॥
यज्ञलक्ष्मीं त्वलक्ष्मीं त्व भद्र कृत्वा ममाज्ञया ॥ यजमानं च तं
हत्वा वत्स हिंसय भद्रया ॥ ४७ ॥ अशेषामिव ।माज्ञां शिवयो-

---

त्याचा यज्ञ उध्वस्त करून टाक, अगदीं उशीर करूं नकोस. ( ४३ )
देवाधिदेव श्रीशंकरांनीं वरिभद्रास व भद्रकालीस असें सांगितल्यावर हि-
मालयपर्वताची कन्या श्रीपार्वती गाय जशी आपल्या दोन वासरांकडे
दयार्द्रदृष्टीनें पाहते त्याप्रमाणें त्या दोघांकडे ती पाहूं लागली. (४४)
पार्वती जशी आपल्या कार्तिकस्वामीस पुत्रप्रेमानें आलिंगन देत होती
त्याप्रमाणें तिनें वीरभद्रास आलिंगन देऊन त्याचें मस्तक हुंगलें. व
त्यास गोड गोड शब्दानें प्रेमानें ह्मणूं लागली.

पार्वती ह्मणते— ( ४५ ) मुला, वीरभद्रा, तूं मोठा दैववान्
आहेस, तुझें सामर्थ्य आणि पराक्रम फार मोठा आहे, तूं माझें प्रिय
करावयासाठीं उत्पन्न झाला आहेस तर माझे मनास सुख होईल असें
करून माझ्या अपमानाचा तूं सूड उगव. ( ४६ ) श्रीशिव हा यज्ञाचा
अधिपति आहे, असें असून प्राचेतस दक्ष द्वेषभावानें श्रीशिवास न
बोलावतां यज्ञकर्म करण्यांत गुंतला आहे, ह्यासाठीं तूं इतर शिवगणांस
साह्यास घेऊन त्यांच्या साह्यानें त्या दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस कर.
( ४७ ) वीरभद्रा, ईश्वर तुझें कल्याण करो, तूं माझ्या आज्ञेप्रमाणें द-
क्षाच्या यज्ञलक्ष्मीला अवदसा करून सोड आणि ह्या भद्रकालीच्या
हातानें त्या यजमान ह्मणविणाऱ्या दक्षास जिवंत मारून टाक. (४८)
विचित्र प्रकारचीं ज्यांचीं कृत्यें आहेत अशा शिवपार्वतीची ती आज्ञा

श्चित्रकृत्ययोः ॥ मूर्ध्नि कृत्वा नमस्कृत्य भद्रो गंतुं प्रचक्रमे ॥ ४८ ॥ अथैष भगवान् क्रुद्धः प्रेतावासकृतालयः ॥ वीरभद्रो महादेवो देव्या मन्युप्रमार्जकः ॥ ४९ ॥ ससर्ज रोमकूपेभ्यो रोमजाख्यान् गणेश्वरान् ॥ दक्षिणाद्भुजदेशाच्चु शतकोटिगणश्वरान् ॥५०॥सदारान् सर्वतोभद्रान् साक्षाद्वामाच्च वै भुजात् ॥ रुद्रानुभावान् रौद्रांश्च रुद्रवीर्यपराक्रमान् ॥ ५१ ॥ पादात्तथोरुदेशाच्च पृष्ठात्पार्श्वान्मुखाद्गलात् ॥ गुह्याद्गुल्फाच्छिरोमध्यात्कंठादास्यात्तथोदरात् ॥ ५२ ॥ तथा गणेश्वरैर्भद्रैर्भद्रतुल्यपराक्रमैः ॥ सछादितमभूत्सर्व साकाशविवरं जगत् ॥ ५३ ॥ सर्वे सहस्रहस्तास्ते सहस्रायुधपाणयः ॥ रुद्रस्यानुचराः सर्वे सर्वे रुद्रसमप्रभाः ॥ ५४ ॥

---

मालेप्रमाणें आपल्या मस्तकावर घेऊन व त्या दोघां शिवपार्वतीस नमस्कार करून वीरभद्र दक्षाचा यज्ञ विध्वंस करण्यास निघाला. ( ४९ ) मग तो परमेश्वर, रागावलेला व स्मशानभूमींत राहणारा वीरभद्र प्रत्यक्ष श्रीशिवाचाच अवतार असून तो पार्वतीचा राग घालवून तिचें समाधान करण्याकरितां झाला होता. ( ५० ) त्यानें आपल्या रोमकूपापासून रोमज नांवाचे शिवगण उत्पन्न केले, उजव्या हातापासून शतकोटि नांवाचे गणेश्वर उत्पन्न केले. ( ५१ ) बायकांसहित असणारे सर्वतो भद्र नांवाचे शिवगण वीरभद्रानें आपल्या डाव्या हातापासून उत्पन्न केलें. ते सर्वजण रुद्रासारखेच पराक्रमी होते, ते सर्वजण स्वभावानें फार क्रूर होते, रुद्राप्रमाणेंच त्यांचे सामर्थ्य व पराक्रम होते, ( ५२ ) वीरभद्रानें आपल्या पायांपासून, मांड्यापासून, पाठीपासून, बगलेपासून, तोंडापासून, गळ्यापासून, घोंट्यापासून, भिवयांपासून, गळ्यापासून, तोंडापासून, पोटापासून ( ५३ ) अनेक शिवगण उत्पन्न केले. ते सर्व शिवगण वीरभद्रासारखेच पराक्रमी होते, त्यांनीं हें सर्व आकाश पाताळापर्यंत त्रैलोक्य भरून टाकिलें. ( ५४ ) त्या सर्वांस प्रत्येकास हजार हजार हात होते, आणि त्यांनीं प्रत्येक हातांत शस्त्रास्त्रें घेतलेलीं होतीं, ते सर्वजण शिवाचे आज्ञाधारक असून ते सर्वजण रुद्रासारखेच पराक्रमी

शूलशक्तिगदाहस्ताष्टंकोपलशिलाधराः ॥ कालाग्निरुद्रसदृशास्त्रिने-
त्राश्च जटाधराः ॥ ५५ ॥ निपेतुर्भृशमाकाशे शतशः सिंहवाहनाः ॥
विनेदुश्च महानादं जलदा इव भद्रजाः ॥ ५६ ॥ तैर्भद्रो भगवान्-
भद्रस्तथा परिवृतो बभौ ॥ कालानलशतैर्युक्तो यथांते कालभै-
रवः ॥ ५७ ॥ तेषां मध्ये समारुह्य वृषेंद्रं वृषभध्वजः ॥ जगाम
भगवान् भद्रः शुभ्रमभ्रं यथा भवः ॥ ५८ ॥ तमेवं वृषमारूढे भद्रे
तु भसितप्रभः ॥ बभार मौक्तिकच्छत्रं गृहीतसितचामरः ॥ ५९ ॥
स तदा शुशुभे पार्श्वे भद्रस्य भसितप्रभः ॥ भगवानिव शैलेंद्रः
पार्श्वे विश्वजगद्गुराः ॥ ६० ॥ सोऽपि तेन बभौ भद्रः श्वेत-

---

होते. ( ५५ ) त्यांच्या हातांत शूल, शक्ति, गदा, टंक ] टांकी ] दगड, शिळा वगैरे युद्धास उपयोगी पडण्यासारख्या वस्तु होत्या. ते सर्वजण प्रळयकाळच्या रुद्रासारखे क्रूर दिसत होते, त्या प्रत्येकास तीन तीन डोळे असून त्यांच्या मस्तकांवर जटांची मोठमोठालीं ओझीं होतीं. ( ५६ ) त्या वीरभद्राच्या शरीरापासून उत्पन्न झालेल्या शिवगणापैकीं कितीएक आकाशांत उड्या मारूं लागले. शेंकडो शिवगण सिंहावर बसले होते, मेघ जसा गडगडाट करितात तसे कितीएक शिवगण मोठमोठ्यानें गर्जना [ आरोळ्या ] करूं लागले. ( ५७ ) जसा प्रळयकाळीं काळभैरव आपल्या बरोबर हजारों प्रळयकाळचे अग्नि घेऊन जगाचा संहार करण्यास निघतो त्याप्रमाणें तो परमात्मा वीरभद्र आपल्या बरोबर ते शिवगण घेऊन दक्षाचा विध्वंस करण्यास निघाला. ( ५८ ) वृषभवाहन श्रीशंकर नंदिकेश्वरावर बसून बाहेर जाण्यास निघावे त्याप्रमाणें तो वीरभद्र शंकरासारखा एका पांढऱ्या शुभ्र मेघावर बसून निघाला. ( ५९ ) तो वीरभद्र त्या बैलावर बसून दक्षाच्या यज्ञगृहांत जाण्यास निघाल्यावर भसितप्रभ नांवाच्या एका शिवगणानें त्यावर पांढरीशुभ्र चवरी वारून त्यावर मोत्यांचें छत्र धरिलें. ( ६० ) भसितप्रभ वीरभद्रावर मोत्यांचें छत्र धरून बाजूस उभा राहिला असतां त्रैलोक्यपति श्रीशंकराच्या बाजूस जसा पर्वतश्रेष्ठ हिमालयपर्वत शोभावा तसा शोभला. ( ६१ ) पांढरें शुभ्र चामर [ चवरी ] भसि-

चामरपाणिना ॥ सोमवर्णेन सौम्येन यथा शूलवरायुधः ॥६१॥ दध्मौ शंखं सितं भद्रं भद्रस्य पुरतः शुभम् ॥ भानुकंपो महातेजा हैमरत्नैरलंकृतम् ॥ ६२ ॥ देवदुंदुभयो नेदुर्दिवि संकुलनिस्वनाः ॥ ववृषुः शतशो मूर्ध्नि पुष्पवर्षं बलाहकाः ॥ ६३ ॥ फुल्लानां मधुगर्भाणां पुष्पाणां गंधबंधवः ॥ मार्गानुकूलसंवाहा ववुश्च पथि मारुताः ॥ ६४ ॥ ततो गणेश्वराः सर्वे मत्ता युद्धबलोद्धताः ॥ ननृतुर्मुमुदुर्नेदुर्जहसुर्जगदुर्जगुः ॥ ६५ ॥ तदा भद्रगणांतःस्थो बभौ भद्रः सभद्रया ॥ यथा रुद्रगणांतःस्थस्त्र्यम्बकोऽम्बिकया सह ॥६६॥ तत्क्षणादेव दक्षस्य यज्ञवाटं हिरण्मयम् ॥ प्रविवेश महाबाहुर्वीरभद्रोऽद्रिजानुगः ।वृत्तं॥६७॥ ततस्तु दक्षप्रतिपादितस्य क्रतुप्रधानस्य गणप्र-

---

तप्रभ वीरभद्रावर वारीत असतां तो जसा शांत तेजाच्या चंद्राच्या प्रकाशामुळें प्रत्यक्ष श्रीशंकर शोभावा तसा शोभूं लागला. ( ६२ ) वीरभद्रापुढें भानुकंप नांवाचा एक पराक्रमी शिवगण शंख वाजवूं लागला. तो शंख पांढरा पांढरा शुभ्र असून फार मनोहर होता त्या शंखावर सोन्यांत रत्नें बसविलीं होतीं. ( ६३ ) त्यावेळीं आकाशांत देवांनीं दुदुंभि वाजविल्या त्यामुळें दहाही दिशा दणाणून गेल्या. वीरभद्राच्या मस्तकावर मेघांनीं आकाशांतून पुष्पांची वृष्टि केली. ( ६४ ) टवटवीत आणि रसभरीत फुलांचा चोहोंकडे पसरविणारे वारे प्रवासास अनुकूल अशारीतीनें वाहूं लागले ( ६५ ) तेव्हां सर्व गणेश्वर मदोन्मत्त होऊन युद्ध करण्याविषयीं अगदीं उतावीळ झाले, ते नाचूं लागले, मोठमोठ्यानें खिदळूं लागले, ओरडूं लागले, हांसूं लागले, एकमेकांशीं बोलूं लागले व बढाया मारूं लागले. [ ६६ ] तो आपल्या भद्रगणांत वीरभद्र भद्रकाळीसहित रुद्रगणांत पार्वतीसहित श्रीशंकर जसा शोभावा तसा शोभला. [ ६७ ] आणि तत्काळ तो पार्वतीचे मनोरथ पूर्ण करणारा पराक्रमी वीरभद्र दक्षाच्या सोन्याच्या यज्ञवाटेंत जाऊन शिरला. [ ६८ ] मग प्रळयकाळाच्यावेळीं सर्व जग जाळून टाकणारा प्रळयरुद्र जसा शिरावा तसा तो शिवगणांतील प्रमुख वीरभद्र दक्षानें आरंभिलेल्या

धानः ॥ प्रयोगभूमिं प्रविवेश भद्रो रुद्रो यथांते भुवनं दि-
धक्षुः ॥ ६८ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे दक्षयज्ञमथनं नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

---

उत्तम यज्ञांत ज्याठिकाणीं होमहवन वगैरे क्रिया होत होत्या तेथें शिरला.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील पूर्वभागापैकीं दक्षयज्ञाचा विध्वंस नांवाचा सतरावा अध्याय संपला.



## ॥ अथ अष्टादशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ ततो विष्णुप्रधानानां सुराणाममितौजसाम् ॥ ददर्श च महत्सत्रं चित्रध्वजपरिच्छदम् ॥ १ ॥ सुदर्भऋजुसंस्तीर्णसुसमिद्धहुताशनम् ॥ कांचनैर्यज्ञभाण्डैश्च भ्राजिष्णुभिरलंकृतम् ॥ ॥ २ ॥ ऋषिभिर्यज्ञपटुभिर्यथावत्कर्मकर्तृभिः ॥ विधिना वेददृष्टेन स्वनुष्ठितबहुक्रमम् ॥ ३ ॥ देवांगनासहस्राढ्यमप्सरोगणसेवितम् ॥ वेणुवीणारवजुष्टं वेदघोषैश्च बृंहितम् ॥ ४ ॥ दृष्ट्वा दक्षाध्वरं वीरो वीरभद्रः प्रतापवान् ॥ सिंहनादं तदा चक्रे गंभीरो निनदो यथा ॥ ॥ ५ ॥ ततः किलकिलाशब्द आकाशं पूरयन्निव ॥ गणेश्वरैः कृतो यज्ञे महान्यकृतसागरः ॥ ६ ॥ तेन शब्देन महता त्रस्ताः सर्वे दिवौ-

---

( १ ) वायू बोलतोः—मग वीरभद्रानें विष्णु वगैरे महापराक्रमी देवश्रेष्ठांचा यज्ञ पाहिला त्या सत्रांत एक मोठा थोरला सुशोभित वस्त्र घातलेला ध्वज उभारलेला होता. ( २ ) त्या सत्रांत उत्तम उत्तम दर्भ नीट हांतरून त्यावर अग्नि पेटविला होता. त्या यज्ञांत यज्ञसंबंधीं सर्वपात्रें लखलखींत सोन्याचीं असल्यामुळें झळकत होतीं. ( ३ ) यज्ञकर्म चालविणारे ऋषि आपापल्या कामांत मोठे हुशार होते व जे ते आपापलें काम व्यवस्थित रीतीनें करीत होते. वेदमार्गास अनुसरून त्या यज्ञांतील प्रत्येक कर्म होत होतें. ( ४ ) तो यज्ञसमारंभ पाहण्यास हजारों देवांगना आल्या होत्या, आणि अप्सरांचे समुदाय ( देववेश्या ) ही पुष्कळ आलेल्या होत्या. त्या यज्ञांत जिकडे तिकडे वेणु आणि वीणा ह्यांचे ध्वनि ऐकूं येत असून वेदघोषांनीं दहादिशा दणागून गेल्या होत्या, ( ५ ) असो, असा तो दक्षाचा यज्ञ पाहतांच त्या पराक्रमी वीरभद्रानें एक मोठा थोरला सिंहनाद केला. ( ६ ) त्या वीरभद्राचा सिंहनाद ऐकतांच बाकीच्या सर्व गणेश्वरांनीं असा किलकिलाट एकदम करून सोडिला कीं, जसें कांहीं आकाश दणागून जातें, त्या आवाजापुढें समुद्राचें गर्जणें कांहींच नव्हे असें वाटलें. ( ७ ) तो मोठा कलकलाट ऐकिल्याबरोबर सर्व देव अगदीं घाबरून गेले. आणि इकडे

कसः ॥ दुद्रुवुः परितो भीताः स्रस्तवस्त्रविभूषणाः ॥ ७ ॥ किंस्वि-
द्भिन्नो महामेरुः किंस्वित्संदीर्यते मही ॥ किमिदं किमिदं चेति
जजल्पुस्त्रिदशा भृशम् ॥ ८ ॥ मृगेंद्राणां यथा नादं गजेंद्रा गहने
वने ॥ श्रुत्वा तथाविधं केचित्तत्यजुर्जीवितं भयात् ॥ ९ ॥ पर्वताश्च
व्यशीर्यंत चकंपे च वसुंधरा ॥ मरुतश्च व्यघूर्णंत चुक्षुभे मकरा-
लयः ॥ १० ॥ अग्नयो नैव दीप्यंते न च दीप्यति भास्करः ॥ ग्रहाश्च
न प्रकाशंते नक्षत्राणि च तारकाः ॥ ११ ॥ एतस्मिन्नेव काले तु
यज्ञवाटं तदुज्वलम् ॥ सप्राप भगवान्भद्रो भद्रैश्च सह भद्रया ॥ १२ ॥
तं दृष्ट्वा भीतभीतोऽपि दक्षो दृढ इव स्थितः ॥ क्रुद्धवद्वचनं प्राह को
भवान्किमिहेक्षसे ॥ १३ ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा दक्षस्य च दुरात्मनः ॥

---

तिकडे आजुबाजूस पळूं लागले. पळतां पळतां त्यांच्या अंगावरील वस्त्रें आणि अलंकार अस्ताव्यस्त होऊन गेले. ( ८ ) देव आपआपसांत कुजबुजूं लागले कीं, एकाएकीं महामेरु फुटला किंवा पृथ्वी एकदम फाटली किंवा झालें तरी काय ? हें आहे काय ? ( ९ ) सिंहांचे ध्वनि ऐकिल्याबरोबर रानांतील मोठमोठे हत्ती जसें घाबरून जीव देखील सोडितात त्याप्रमाणें वीरभद्राच्या बरोबरचे सर्व शिवगणांचा तो कलकलाट ऐकिल्याबरोबर सर्वदेव अगदीं घाबरून गेले व कितीएकांनीं तर भयानें प्राणही सोडिले. ( १० ) त्यावेळीं पर्वत तडातड उलले. पृथ्वी थरथर कांपूं लागली. वारे सोसाट वाहूं लागले व समुद्र खवळला. ( ११ ) विस्तव जास्त प्रकाशित होईनात, सूर्याचा प्रकाश देखील निष्प्रभ झाला, ग्रहनक्षत्रें आणि तारे [ इतर चांदण्या ] निस्तेज दिसूं लागल्या. ( १२ ) अशा संधीस त्या दक्षाच्या तेजःपुंज यज्ञ वाटेस वीरभद्र आपल्या सर्व शिवगणांसहित आणि भद्रकालीसहित येऊन पोंचला. ( १३ ) त्या वीरभद्रास पाहतांच तो दक्ष आधींच गर्भगळीत झाला होता तरी तो घाबरेपणा वर न दाखवितां धीटपणानें रागावल्यासारखें करून वीरभद्रास ह्मणाला, तूं कोण आहेस ? आणि येथें काय पहातोस ? ( १४ ) त्या दुष्ट स्वभावाच्या दक्षाचें

वीरभद्रो महातेजा मेघगंभीरनिस्वनः ॥ १४ ॥ स्मयन्निव तमालोक्य दक्षं देवांश्च ऋत्विजः ॥ अर्थगर्भमसंभ्रांतमवोचदुचितं वचः ॥१५॥

वीरभद्र उवाच ॥ वयं ह्यनुचराः सर्वे शर्वस्यामिततेजसः ॥ भागाभिलिप्सया प्राप्ता भागो नः संप्रदीयताम् ॥ १६ ॥ अथ चेदध्वरेऽस्माकं न भागः परिकल्पितः ॥ कथ्यतां कारणं तत्र युद्ध्यतां वा मयामरैः ॥ १७ ॥ इत्युक्तास्ते गणेंद्रेण देवा दक्षपुरोगमाः ॥ ऊचुर्मंत्राः प्रमाणं नो न वयं प्रभवास्त्विति ॥ १८ ॥ मंत्रा ऊचुः सुरा यूयं तमोऽपहतचेतसः ॥ येन प्रथमभागार्हं न यजध्वं महेश्वरम् ॥ १९ ॥ तथोक्ता अपि तैर्मंत्रैर्देवाः संमूढचेतसः ॥ भ-

---

तें बोलणें ऐकून महापराक्रमी व मेघगर्जनेप्रमाणें कठोर शब्द करणारा वीरभद्र (१९) त्या दक्षाकडे देवांकडे आणि ऋत्विजांकडे पाहून हांसल्यासारखें करून शांतपणानें सयुक्तिक रीतीनें यथार्थरीतीचें भाषण करूं लागला.

(१६) वीरभद्र ह्मणाला.—श्रीशंकराचें सामर्थ्य अलौकिक आहे. आह्मीं हे सर्वजण त्या श्रीशिवाचेच आज्ञाधारक आहोंत. आह्मीं आपला यज्ञभाग घ्यावयाकरितां येथें आलों आहों, ह्यासाठीं आमचा भाग आह्मांस द्या. (१७) आणखी ह्या यज्ञामध्यें आमचा भाग कां ठेविला नाहीं, ह्याचेंही कारण सांगा. किंवा त्यासाठीं माझ्याबरोबर सर्व देवासहित युद्ध तरी करा. (१८) दक्ष ज्यांत प्रमुख आहे अशा सर्व देवांस ह्याप्रमाणें वीरभद्रानें ह्मटल्यावर ते ह्मणूं लागले, ह्या गोष्टीची सर्व जबाबदारी मंत्रांवर आहे, आमच्याकडे कांहीं नाहीं, ह्या कामांत आह्मी मुखत्यार नाहींत. (१९) मंत्रांनीं सर्व देवांचें तें बोलणें ऐकिल्यावर मंत्र देवांस ह्मणुं लागले, देवहो, तुह्मीं सर्वजण अज्ञानानें भ्रमिष्ट झाला, त्यामुळें अगोदर महेश्वरास भाग देणें योग्य असतां त्यांस भाग दिला नाहीं व त्याची पूजा केली नाहीं. (२०) त्या मंत्रांनीं देवांस असें स्पष्ट सांगितलें तरी ते देव मोहानें भ्रमिष्ट झाल्यामुळें त्यांनीं मंत्रांचें सांगणें ऐकिलें नाहीं, व वीरभद्रास भागही दिला नाहीं.

द्राय न ददुर्भागं तत्प्रहारमभीप्सवः ॥ २० ॥ यदा तथ्यं च पथ्यं च स्ववाक्यं तद्वृथाभवत् ॥ तदा ततो ययुर्मंत्रा ब्रह्मलोकं सनातनम् ॥ २१ ॥ अथोवाच गणाध्यक्षो देवान्विष्णुपुरोगमान् ॥ मंत्राः प्रमाणं न कृता युष्माभिर्बलगर्वितैः ॥ २२ ॥ यस्मादस्मिन्मखे देवैरित्थं वयमसत्कृताः ॥ तस्माद्वो जीवितैः सार्धमपनेष्यामि गर्वितम् ॥ ॥ २३ ॥ इत्युक्त्वा भगवान्क्रुद्धो व्यदहन्नेत्रवन्हिना ॥ यज्ञवाटं महाकूटं यथा तिस्रः पुरो हरः ॥ २४ ॥ ततो गणेश्वराः सर्वे पर्वतोदग्रविग्रहाः ॥ यूपानुत्पाट्य होतॄणां कण्ठेष्वाबध्य रज्जुभिः ॥ २५ ॥ यज्ञपात्राणि चित्राणि भित्वा संचूर्ण्य वारिणि ॥ गृहीत्वा चैव

---

कांतर त्या सर्व देवांस वीरभद्राचा मार खावयाची हौस आली होती त्यास इलाज नाहीं. ( २१ ) जेव्हां आपण सांगितलेला उपदेश खरा असून सर्व लोकांचा हित करणारा होता तरी त्याचा कांहींएक उपयोग न होता तो व्यर्थ गेला असें पाहतांच ते मंत्र अनादिकालापासून असणाऱ्या ब्रह्मलोकास निघून गेले. ( २२ ) मग तो वीरभद्र गणेश्वर विष्णु वगैरे मुख्य मुख्य देवांस उद्देशून ह्मणाला. देवहो, तुह्मांस मंत्रांनीं काय सांगितलें तें तुह्मीं मानलें नाहीं, तुह्मी सर्वजण अंगांत बळ असल्यामुळें उन्मत्त झालां आहां. ( २३ ) असो ज्याअर्थीं ह्या यज्ञांत सर्व देवांनीं आमचा असा अपमान केला आहे, त्याअर्थीं तुमचा गर्व नाहींसा होण्यास तुमचे प्राणच मला घेतले पाहिजेत. ( २४ ) ह्या प्रमाणें बोलून त्या रागानें खवळलेल्या वीरभद्रानें पूर्वीं शंकरांनीं जसें त्रिपुरास जाळून टाकिलें त्याप्रमाणें उंच उंच शिखरें असलेल्या त्या दक्षाच्या यज्ञवाटेस आपल्या कपाळावरील तिसऱ्या डोळ्यांतील अग्नीनें जाळून टाकिलें. ( २५ ) त्या वीरभद्राचे गणेश्वर पर्वता एवढाले धिप्पाड होते, त्यासर्वांनीं मिळून यज्ञस्तंभ उपटून घेतले आणि दोऱ्या घेऊन दोऱ्यांनीं ते खांब यज्ञ करणाऱ्याचे गळ्यांत बांधले. ( २६ ) यज्ञाचीं नानाप्रकारचीं भांडीं होतीं तीं फोडून टाकिलीं आणि त्यांचा चुरा करून तो सर्व चुरा गोळा केला व इतर जें यज्ञाचे उपयोगीं पड-

यज्ञांगं गंगास्रोतसि चिक्षिपुः ॥ २६॥ तत्र दिव्यान्नपानानां राशयः पर्वतोपमाः ॥ क्षीरनद्योऽमृतस्रावाः सुस्निग्धदधिकर्दमाः ॥ २७ ॥ उच्चावचानि मांसानि भक्ष्याणि सुरभीणि च ॥ रसवंति च पानानि लेह्यचोष्याणि तानि वै ॥ वीरास्तद्भुंजते वक्रैर्विलुंपंति क्षिपंति च ॥ २८ ॥ वज्रैश्चक्रैर्महाशूलैः शक्तिभिः प्रासपट्टिशैः ॥ मुसलैरसिभिष्टंकैर्भिंदिपालैः परश्वधैः ॥२९॥ उद्धतांस्त्रिदशान्सर्वाँल्लोकपालपुरःसरान् ॥ बिभिदुर्बलिनो वीरा वीरभद्रांगसंभवाः ॥ ३० ॥ छिंधि भिंधि क्षिप क्षिप्रं मार्यतां दार्यतामिति ॥ हरस्व प्रहरस्वेति पाटयोत्पाटयेति च ॥ ३१ ॥ संरंभप्रभवाः क्रूराः शब्दाः श्रवणशंकवः ॥ तत्र तत्र गणेशानां जज्ञिरे समरोचिताः ॥३२॥ विष्ट-

---

णारें सामानसुमान होतें. त्यासुद्धां गंगानदीच्या प्रवाहांत फेंकून दिलें. ( २७ ) त्या यज्ञवाटांत [ यज्ञशाळेंत ] उत्तम उत्तम प्रकारच्या अन्नांचें व पिण्याच्या पदार्थांचे पर्वता एवढाले ढीग होते, दुधाच्या तर नद्या अमृतासारख्या गोड भरलेल्या होत्या, घट्ट दही तर चिखलासारखें दाट होतें, ( २८ ) तसींच दुसरीं उंच नीच मासांचे पदार्थ, गोड आणि सुवासिक पदार्थ, गोड गोड सरबतें, चाटून खावयाचे पदार्थ, चोखून खावयाचे पदार्थ वगैरे सर्व ते पराक्रमी शिवगण भराभर खाऊन टाकूं लागले व तोंडें वेडीवांकडीं करून दाखवूं लागले, व त्या त्या पदार्थांनीं भरलेलीं भांडीं खाणें झाल्यावर भराभर दूर फेंकून देऊं लागले. ( २९ ) वज्रांनीं, चक्रांनीं, मोठमोठ्या शूलांनीं, शक्तींनीं, प्रासांनीं, पट्टिशांनीं, (३०) मुसळांनीं, तरवारींनीं, टाकींनीं, भिंदिपालांनीं, परशूंनीं उन्मत्त झालेल्या त्या अष्टदिक्‌पालासह मुख्य मुख्य देवांस ( ३१ ) ते पराक्रमी आणि बलिष्ठ वीरभद्राच्या आंगापासून उत्पन्न झालेले वीर तोडूं लागले. तोड, फोड, फेंकून दे, लौंकरमारा, फाडूनटाका, ( ३२ )असे व हिसकावून घ्या, बडवा, उपडा, उपडा, असे रागाच्या आवेशांत निघणारे, कानाला शंकुसारखे लागणारे क्रूर शब्द (३३) युद्धाचे

त्तनयनाः केचिद्दष्टदंष्ट्रोष्ठतालवः ॥ आश्रमस्थान्समाकृष्य मारयंति तपोधनान् ॥३३॥ स्रुवानपहरंतश्च क्षिपंतोऽग्निं जलेषु च ॥कलशानपि भिंदंतश्छिदंतो मणिवेदिकाः ॥३४॥ गायंतश्च नदंतश्च हसंतश्च मुहुर्मुहुः ॥ रक्तासवं पिबंतश्च ननृतुर्गणपुंगवाः ॥३५॥ [ वृत्तं ] निर्मथ्य सेन्द्रानमरान्गणेंद्रा वृषेंद्रनागेंद्रमृगेंद्रसाराः॥ चक्रुर्बहून्यप्रतिमप्रभावाः सहर्षरोमाणि विचेष्टितानि ॥ ३६ ॥ नदंति केचित्प्रहरंति केचिद्धावंति केचित्प्रलपंति केचित् ॥ नृत्यंति केचिद्विहसंति केचिद्वल्गंति केचित्प्रमथा मदेन ॥ ३७ ॥ केचिज्जिघृक्षंति घनान्सतोयान्केचिद्ग्रहीतुं

---

वेळेस अनुसरून त्या वीरभद्राच्या गणांचे जिकडे तिकडे ऐकूं येऊं लागले. कितीएक गणांनीं रागानें डोळे वटारले होते, कितीएकांनीं रागारागानें दांतओठ चावले होते, ( ३४ ) व ते आश्रमांतील तपस्व्यास भराभर बाहेर काढून [ ओढून ] मारीत होते. कितीएकजण यज्ञपात्रें हिसकावून घेत होते आणि अग्नींत किंवा पाण्यांत फेंकून देत होते, ( ३५ ) कोणी घागरी फोडीत होते, व यज्ञाकरितां जे रत्नांचे ओटे केले होते ते कोणी कोणी गणेश्वर पाडून टाकीत होते. कोणी गात होते [ गाऊं लागले ] कोणी मोठमोठ्यानें आरोळ्या मारूं लागले. कोणी वरचेवर वरचेवर हांसूं लागले, कोणी रक्तरूपी आसव पिऊं लागले व कितीएक गणेश्वर तर अतिशय आनंद झाल्यामुळें नाचूं लागले. ( ३६ ) शिवगण [ वीरभद्राचे गण ] नंदीश्वरासारखे, शेषासारखे व सिंहासारखे पराक्रमी होते, त्यांचें सामर्थ्य अलौकिक होतें, त्यांनीं इंद्रादिक मुख्य मुख्य देवांस इतके बेदम मारिलें कीं, त्यांच्या पराक्रमाचें वर्णन ऐकिलें ह्मणजे आनंदानें आंगावर शहारे येतात. ( ३७ ) कितीएक शिवगण आनंदानें उड्या मारूं लागले, कितीएक दक्षयज्ञांत संबंध असणाऱ्या लोकांस मारूं लागले. कितीएक पळूं लागले व कितीएक बडबड करूं लागले, कितीएक नाचूं लागले, कितीएक हांसूं लागले, आणि कितीएक प्रमथगण अतिशय मदोन्मत्त होऊन वाटेल तशी बडबड करूं लागले. ( ३८ ) कितीएक शिवगण पाणी असलेल्या [ सजल ] ढगास उचलण्यास धावूं लागले, कितीएक

रविमुत्पतंति ॥ केचित्प्रसर्तुं पवनेन सार्धमिच्छंति भीमाः प्रमथा वियत्स्थाः ॥ ३८ ॥ आक्षिप्य केचिच्च वरायुधानि महाभुजंगानिव वैनतेयाः ॥ भ्रमंति देवानपि विद्रवंतः खमंडले पर्वतकूटकल्पाः ॥ ३९ ॥ उत्पाट्य चोत्पाट्य गृहाणि केचित्सजालवातायनवेदिकानि ॥ प्रक्षिप्य विक्षिप्य जलस्य मध्ये कालांबुदाभाः प्रमथा विनेदुः॥४०॥ उद्वर्तितद्वारकपाटकुड्यं विध्वस्तशालावलभीगवाक्षम्॥ अहो बताभज्यत यज्ञवाटमनाप्तवद्वाक्यमिवायथार्थम् ॥ ४१ ॥ हा नाथ तातेति पितः सुतेति भ्रातर्ममांबेति च मातुलेति ॥ उत्पा-

---

जण सूर्यास उचलण्यास धावूं लागले. कितीएक वाऱ्याबरोबर पळण्याची इच्छा करूं लागले, व कितीएक प्रमथगण तर अकराळ विकराळ रूप घेऊन आकाशांत जाऊन बसले. ( ३९ ) कितीएक शिवगण पर्वताच्या शिखराएवढाले उंच उंच होते, त्यांनीं आपापल्या हातांत उत्तम उत्तम आयुधें घेतलीं व गरुडपक्षी जसे सापांस उचलून आकाशांत दूर फेंकून देतात तसे देवांस उचलून व त्यांचे आंगाचें कातडें काढून त्यांस आकाशांत फेंकून देऊं लागले. ( ४० ) कितीएक प्रमथगण प्रळयकाळाच्या मेघासारखे मोठमोठ्यानें ओरडूं लागले व कितीएक देवांचे मोठमोठाले वाडे त्या वाड्यांच्या भिंतीसुद्धां, खिडक्यासुद्धां आणि झरोक्यासुद्धां व ओट्यासुद्धां उपडून काढून पाण्यांत नेऊन फेंकून दिले. ( ४१ ) कोणी चौकटी फोडल्या कोणी दारें फोडलीं, कोणी भिंती पाडल्या, कोणीं सोपे पाडले, कोणीं गणेशपट्या मोडल्या, सारांश, ज्याचा संबंध बरोबर जुळणी नाहीं तें अर्धवट वाक्य जसें खरडून टाकितात तशीच त्या यज्ञवाटाची दुर्दशा शिव [ भद्र ] गणांनीं केली, ( ४२ ) वीरभद्राचे गण जेव्हां घरेंदारें भडाभड पाडून देऊं लागले त्यावेळीं त्या घरांतील बायका निराश्रित झाल्यामुळें अरे प्राणप्रिया, अरे बाबा, अरे काका, अरे मुला. अरे भावा, अग आई, अरे मामा, आतां कसें करूं

दह्यमानेषु गृहेषु नार्यो ह्यनाथशब्दा बहुशः प्रचक्रुः ॥ ४२ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे दक्षयज्ञमथनं नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

---

ह्मणून मोठमोठ्यानें रडूं लागल्या व आक्रोश करूं लागल्या.

ह्याप्रमाणें श्रीशिवनांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेच्या पूर्वभागापैकीं दक्षयज्ञाचा विध्वंस नांवाचा अठरावा अध्याय संपला.



## ॥ अथ एकोनविंशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ ततस्त्रिदशमुख्यास्ते विष्णुशक्रपुरोगमाः ॥ सर्वे भयपरित्रस्ता दुद्रुवुर्भयविव्हलाः ॥ १ ॥ निजैरदूषितैरंगैर्दृष्ट्वा देवानुपद्रुतान् ॥ दंड्यानदंडितान्मत्वा चुकोप गणपुंगवः ॥ २ ॥ ततस्त्रिशूलमादाय सर्वशक्तिनिवर्हणम् ॥ ऊर्ध्वदृष्टिर्महाबाहुर्मुखाज्ज्वालां समुत्सृजन् ॥ ३ ॥ अमरानभिदुद्राव द्विरदानिव केसरी ॥ तानभिद्रवतस्तस्य गमनं सुमनोहरम् ॥ ४ ॥ वारणस्येव मत्तस्य जगाम प्रेक्षणीयताम् ॥ ततस्तत्क्षोभयामास महत्सुरबलं बली ॥ ५ ॥ महासरोवरं यद्वन्मत्तो वारणयूथपः ॥ विकुर्व-

---

(१) वायु ह्मणालाः—नंतर श्रीविष्णु, इंद्र वगैरे प्रमुख असणारे मुख्य मुख्य देव सर्वजण भयानें घाबरून जाऊन त्यास जिकडे वाट फुटेल त्या रस्त्यानें पळूं लागले. (२) आपल्या [ त्यांच्या ] आंगाला काडीमात्र इजा न पोंचता देव पळून जातात असें वीरभद्रानें पाहिलें आणि वास्तविक ज्यांस शिक्षा करावयास पाहिजे होती त्यांस कांहींच शिक्षा आपल्या हातून झाली नाहीं असें मनांत येतांच वीरभद्र रागानें फार खवळला. (३) मग सर्वदेवांच्या शक्ति एका क्षणांत नाहींशा करून टाकणारा शूल हातांत घेऊन वर डोळे लावून तो पराक्रमी व तोंडावाटे ज्वाला बाहेर टाकणारा वीरभद्र (४) हत्तीवर सिंह धावून जावा तसा सर्वदेवांच्या आंगावर धावून गेला. त्या वीरभद्राचे देवाच्या आंगावर धावून जातेवेळचे चालणें फारच मौजेचें दिसलें. (५) जसा एखादा उन्मत्त हत्ती धांवत जात असतां जी गंम्मत दिसते तीच प्रकार त्यावेळीं दिसला आणि त्या वीरभद्रानें देवांच्या मोठ्या समुदायांत शिरून तो समुदाय खवळून सोडिला. (६) मदोन्मत्त झालेल्या हत्तींच्या समुदायांतील पुढारी हत्तीनें एखाद्या मोठ्या सरोवरांत शिरून तें ढवळून सोडावें. आणि त्या ढवळण्यानें नील, (निळा)

बहुधा वर्णान्नीलपांडुरलोहितान् ॥ ६ ॥ बिभ्रद्व्याघ्राजिनं वासो हेमप्रवरतारकम्॥ छिंदन्भिदन् रुजन् क्रंदन् दारयन्प्रमथन्नपि॥७॥न्यचरद्देवसंघेषु भद्रोऽग्निरिव कक्षगः ॥ तत्र तत्र महावेगाच्चरंतं शूलधारिणम् ॥ ८ ॥ तमेकं त्रिदशाः सर्वे सहस्रमिव मेनिरे ॥ भद्रकाली च संक्रुद्धा युद्धवृद्धिमदोद्धता ॥ ९ ॥ मुक्तज्वालेन शूलेन निर्बिभेद रणे सुरान् ॥ स तया रुरुचे भद्रो रुद्रकोपसमुद्भवः ॥ १० ॥ प्रभयेव युगांताग्निश्चलया धूमधूम्रया ॥ भद्रकाली तदा युद्धे विद्रुतत्रिदशा बभौ ॥ ११ ॥ कल्पशेषानलज्वाला

---

पांडुर [ पांढरा, ] लोहित [ तांबडा ] वगैरे रंग त्या तळ्यांत दिसावें तसें वीरभद्रानें दक्षाच्या यज्ञामध्यें देवांना मारून रक्त, अस्थि, वसा मज्जा वगैरेंचा सडा घातला त्यामुळें निळा, पांढरा, तांबडा वगैरे रंग दिसावयास लागले. ( ७ ) उत्तम सोन्यावर चांगलीं चांगलीं तारेप्रमाणें शोभणारीं रत्नें बसविलीं असतां तें जसें सुशोभित दिसतें तद्वत वीरभद्रानें धारण केलेलें वाघाचें कातडें दिसत होतें. असा तो वीरभद्र तोडीत, फोडीत, खाजवीत, ओरडत, फाडीत, रगडीत रगडीत ( ८ ) देवांच्या समुदायामध्यें बाजूला जळत असलेल्या अग्नीप्रमाणें फिरावयास लागला. आणि मोठ्या वेगानें जेथें तेथें शूल हातांत घेऊन संचार करूं लागला. ( ९ ) असा तो वीरभद्र एकटा जरी त्या देवसंघामध्यें फिरत होता तथापि घाबरलेल्या त्या देवांस हजार हजार वीरभद्र फिरतात कीं, काय? असा दिसूं लागला. वरचेवर वरचेवर युद्ध वाढत चालल्यामुळें भद्रकाली फारच रागावली. ( १० ) व मदानें उन्मत्त होऊन ज्यांतून ज्वाला निघत आहेत असा शूल हातांत घेऊन युद्धांत देवांना चराचर कापून काढूं लागली. तेव्हां शंकराच्या कोपापासून उत्पन्न झालेला तो वीरभद्र त्या भद्रकालीमुळें शोभूं लागला. ( ११ )प्रळयकाळच्या भयंकर अग्नीच्या योगानें धुराचे लोटचे लोट निघत असून त्या धुरामध्यें अग्नीची कांति ( ज्वाळा ) जसी शोभावी तशी ती भद्रकाली शोभत होती. आणि त्या भद्रकालीनें तर देव सर्व पळवून लाविले त्यामुळें विशेष शोभली. ( १२ ) आणि सृष्टीचा संहार करावयाच्या वेळीं

दग्धविश्वजगद्यथा ॥ तदा सवाजिनं सूर्यं रुद्रान् रुद्रगणाग्रणीः॥ १२
भद्रो मूर्ध्नि जघानाशु वामपादेन लीलया ॥ असिभिः पावकं
भद्रः पट्टिशैस्तु यमं यमी ॥ १३ ॥ रुद्रान् दृढेन शूलेन मुद्गरैर्वरुणं
दृढैः ॥ परिघैर्निर्ऋतिं वायुं टंकैष्टंकधरः स्वयम् ॥ १४ ॥ नि-
र्बिभेद रणे वीरो लीलयैव गणेश्वरः ॥ ततो देवः सरस्वत्या ना-
सिकाग्रं सुशोभनम् ॥ १५ ॥ चिच्छेद करजाग्रेण देवमातुस्त-
थैव च ॥ चिच्छेद च कुठारेण बाहुदंडं विभावसोः ॥ १६ ॥ अ-
ग्रतो द्व्यंगुलां जिव्हामात्तहव्यां लुलाव च ॥ स्वाहादेव्यास्तथा
देवो दक्षिणं नासिकापुटम् ॥ १७ ॥ चकर्त करजाग्रेण वामं
च स्तनचूचुकम् ॥ भगस्य विपुले नेत्रे शतपत्रसमप्रभे ॥ १८ ॥
प्रसह्योत्पाटयामास भद्रः परमवेगवान् ॥ पूष्णो दशनरेखां च

---

सर्व त्रैलोक्य जाळून टाकून प्रळयाग्नीच्या उरलेल्या ज्वाळा जशा शोभाव्या तशी ती भद्रकाली शोभली. तेव्हां रागानें लाल झालेल्या रुद्रांच्या प्रमथांतील मुख्य पराक्रमी वीरभद्रानें घोड्यासुद्धां सूर्याच्या ( १३ ) डोक्यावर डाव्या पायानें सहज लाथ मारिली. वीरभद्रानें अग्नीवर तरवारीचा वार केला. त्या इंद्रियनिग्रहवान वीरभद्रानें यमाला पट्टिशांनीं प्रहार केला. ( १४ ) मजबूद शूलानें वीरभद्रानें शिवगणांकडून वरुणावर प्रहार करविला, आणि बळकट परिघांनीं निर्ऋतिदेवावर प्रहार केले, स्वतः वीरभद्रानें स्वतः हातांत टाकी घेऊन ( १५ ) लीलेनें युद्धांत वायुदेवावर प्रहार केला. आणि त्यास उभें चिरलें. त्यानंतर वीरभद्रानें सरस्वतीच्या नाकाचा शेंडा फार सुंदर होता. ( १६ ) तो [ नाकाचा शेंडा ] आणि अदितीच्या नाकाचा शेंडा नखांनी तोडून घेतला. सूर्याचा उजवा हात कोपरापासून कुऱ्हाड मारून तोडिला, ( १७ ) आणि दक्षाच्या यज्ञांतील हविर्द्रव्य [ पायस ] ज्यांच्या ज्यांच्या जिभेनें चाखलें होतें त्यांच्या जिभेचा शेंडाच तोडून घेतला. त्या वीरभद्रानें स्वाहादेवीची उजवी नाकपुडी, ( १८ ) आणि डावेकडील स्तनावरील शेंडा नखांनी तोडून टाकिला. भगाचे [ सूर्याचे ] दोन डोळे कमळासारखे सुंदर होते, ते डोळे ( १९ ) त्या चपळ स्वभावाच्या वीरभद्रानें बळेंच उपडून

दीप्तां मुक्तावलीमिव ॥ १९ ॥ जघान धनुषः कोट्या स तेना-
स्पष्टवागभूत् ॥ ततश्चन्द्रमसं देवः पादांगुष्ठेन लीलया ॥ २० ॥
क्षणात्कृमिवदाक्रम्य घर्षयामास भूतले ॥ शिरश्चिच्छेद दक्षस्य
भद्रः परमशोभनम् ॥ २१ ॥ क्रोशंत्यामेव वैरिण्यां भद्रकाल्यै ददौ
च तत् ॥ तत्प्रहृष्टा समादाय शिरस्तालफलोपमम् ॥ २२ ॥ सा
देवी कंदुकक्रीडां चकार समरांगणे ॥ ततो दक्षस्य या पत्नी
कुशीला भर्तृभिर्यथा ॥ २३ ॥ पादाभ्यां चैव हस्ताभ्यां हन्यते
स्म गणेश्वरैः ॥ अरिष्टनेमिनं सोमं धर्मं चैव प्रजापतिम् ॥ २४ ॥
बहुपुत्रं चांगिरसं भृशाश्वं काश्यपं तथा ॥ गले प्रगृह्य बलिनो
गणपाः सिंहविक्रमाः ॥ २५ ॥ भर्त्सयंतो भृशं वाग्भिः संजघ्नु

---

काढिलें. पूषाच्या [ सूर्याच्या ] दांताच्या ओळी लखलखीत पांढऱ्या
शुभ्र मोत्यासारख्या दिसत होत्या, ( २० ) त्यांवर जोरानें वीरभद्रानें
धनुष्याचें टोंक मारून पाडून टाकिल्या, त्यामुळें तेव्हांपासून त्यास धड
नीट बोलता देखील येईना असें झालें. नंतर वीरभद्रानें लीलेंतच त्या
चंद्राला पायाच्या आंगठ्यानें ( २१ ) जमीनीवर जसा एखादा लहा-
नसा किडा चेंगरावा असें चेंगरलें. नंतर परम सुंदर असें दक्षाचें शिर
[ डोकें ] कापिलें. ( २२ ) तेव्हां दक्षाची बायको आरडा ओरड क-
रीत आहे, तोंच तें दक्षाचें डोकें भद्रकालीला वीरभद्रानें देऊन टाकिलें.
ताडाच्या फळाप्रमाणें असलेलें दक्षाचें तोडलेलें मस्तक आपले हा-
तांत आल्याबरोबर त्या भद्रकालीस मोठा आनंद झाला, ( २३ ) व
तें डोकें हातांत घेऊन युद्धभूमीवर ती देवी चेंडू खेळूं लागली. नंतर
एखाद्या दुराचारी बायकोला तिच्या नवऱ्यानें जसें मारावें, तसें त्या
दक्षाच्या बायकोला ( २४ ) लाथांनीं व हातांनीं त्या गणेश्वरांनीं मा-
रिलें. अरिष्टनेमिला, सोमाला, धर्माला, प्रजापतीला ( २५ ) पुष्कळ
मुलें असणाऱ्या त्या अंगिराऋषीला, भृशाश्वाला, काश्यपाला त्याच्या
गळ्यांत दावें बांधून ते बलवान् आणि सिंहासारखे पराक्रमी गणेश्वर
( २६ ) त्यांची मर्मभेदक शब्द वारंवार बोलून निंदा करूं लागले,

मूर्ध्नि मुष्टिभिः ॥ धर्षिता भूतवेतालैर्दाराः सुतपरिग्रहाः ॥ २६ ॥ यथा कलियुगे जारैर्बलेन कुलयोषितः ॥ तच्च विध्वस्तकलशं भग्नयूपं गतोत्सवम् ॥ २७ ॥ प्रदीपितमहाशालं प्रभिन्नद्वारतोरणम् ॥ उत्पाटितसुरानीकं हन्यमानतपोधनम् ॥ २८ ॥ प्रशांतब्रह्मनिर्घोषं प्रक्षीणजनसंचयम् ॥ क्रंदमानातुरस्त्रीकं हताशेषपरिच्छदम् ॥ २९ ॥ शून्यारण्यनिभं जज्ञे यज्ञवाटं तदार्दितम् ॥ शूलवेगप्ररुग्णाश्च भिन्नबाहूरुवक्षसः ॥ ३० ॥ विनिकृत्तोत्तमांगाश्च पेतुरुर्व्यां सुरोत्तमाः ॥ हतेषु तेषु देवेषु पतितेषु सहस्रशः ॥ ३१ ॥ प्रविवेश गणेशानः क्षणादाहवनीयकम् ॥

---

व त्यांच्या डोक्यावर बुक्या मारूं लागले. भूतांनीं वेतालांनीं त्या ऋषींच्या बायकांचीं अब्रु घेतली, व त्यांच्या मुलामाणसांची त्रेधा करून सोडिली. ( २७ ) कलियुगांत जसें दुराचारी लोक बळजबरीनें कुळस्त्रियावर सक्ती करतात तीच स्थिति शिवगणांनी स्त्रियांची केली. त्या यज्ञशाळेंत जितक्या घागरी होत्या, त्या सर्व फोडून टाकिल्या. ते यज्ञस्तंभ उपडून टाकिलें. जितकी रोषनाई जागा केली होती ती निखालस नाहीशी करून टाकिली. ( २८ ) यज्ञवाटाचे जितके लांकडी परकोट होते त्यांस आगी लाऊन दिल्या दारें व अडसर मोडून टाकलें. देवांचें सैन्य समूळ नाहींसें करून टाकिलें. जितके तपस्वी [ मुनीश्वर ] होते ते सर्व मारून टाकिले. ( २९ ) जिकडे तिकडे वेदघोष चालला होता, तो सर्व बंद पाडला. लोकांची जाण्यायेण्याची दाटी होती ती सर्व नाहीशी झाली. जिकडे दुःखानें गांजून गेलेल्या बायकांची रडारडी ऐकूं येऊं लागली, त्यांचे दागदागिनें लत्तेकपडे सर्व शिवगणांनीं हिसकावून घेतले. ( ३० ) असें चोहोंकडे दाणादाण करून सोडलेलें दक्षाचें यज्ञवाट एखाद्या भयाण अरण्यासारखें दिसूं लागलें शूलाच्या झटक्यानें कोणांचे हात तुटले, कोणाच्या मांड्या मोडल्या, कोणांचीं उरें फुटलीं. ( ३१ ) आणि कोणा कोणा देवांची तर मस्तकें तुटून ते तेथें जमीनीवर लोळत पडले होते ते हजारों देव तेथें दुःखानें जमीनीवर लोळत पडल्यावर ( ३२ ) तो वीरभद्र गणेश्वर तत्काळ आहवनीयाच्या अंगावर धावून गेला प्रळयकाळच्या अग्नीसा-

प्रविष्टमथ तं दृष्ट्वा भद्रं कालाग्निसन्निभ ॥ ३२ ॥ दुद्राव मरणाद्भीतो यज्ञो मृगवपुर्धरः ॥ स विस्फार्य महच्चापं दृढज्याघोषभीषणम् ॥ ॥ ३३ ॥ भद्रस्तमभिदुद्राव विक्षिपन्नेव सायकान् ॥ आकर्णपूर्णमाकृष्टं धनुरंबुदसान्निभम् ॥३४॥ नादयामास तज्ज्यां च खं च भूमिं च सर्वशः ॥ तमुपश्रुत्य संनादं हतोऽस्मीत्येव विव्हलम् ॥ ३५ ॥ शरेणार्धेंदुवक्रेण स वीरोऽध्वरपूरुषम् ॥ मृगरूपेण धावंतं विशिरस्कं तदाकरोत् ॥ ३६ ॥ तदीदृशमवज्ञातं दृष्ट्वा तं सूर्यसंभवम् ॥ विष्णुः परमसंक्रुद्धो युद्धायाभवदुद्यतः ॥ ३७ ॥ तमुवाह महावेगः स्कंधेन नतसंधिना ॥ सर्वेषां वयसां राजा गरुडः पन्नगाशनः ॥ ३८॥ देवाश्च हतशिष्टा ये देवराजपुरोगमाः ॥ प्रचक्रुस्तस्य साहाय्यं मा-

---

रखा तो वीरभद्र आपल्या आंगावर धावून येत आहे, असें पाहतांच ( ३२ ) आहवनीय यज्ञ हरणाचें रूप घेऊन मरणाच्या भयानें पळूं लागला. त्याच्या मागें तो वीरभद्र जोरानें ओढलेल्या प्रत्यंचेच्या शब्दामुळें भयंकर वाटणारें धनुष्य हातीं घेऊन टणत्कार करीत (३४) व त्या आहवनीयाच्या आंगावर बाण सोडीत धावूं लागला. त्या धनुष्याची प्रत्यंचा कानापर्यंत ओढल्यामुळें मेघाच्या गडगडण्यासारखा ( ३५ ) अवाज झाला त्यामुळें आकाश आणि पृथ्वी चोहोंकडे दणाणून गेली. तो ध्वनि ऐकल्याबरोबर मी मेलोंरे मेलों ह्मणून व्याकुळ होऊन ओरडणाऱ्या ( ३६ ) आणि हरिणाचें रूप घेऊन पळत असणाऱ्या त्या यज्ञपुरुषाचें अर्धचंद्राकृति बाणानें त्या वीरभद्रानें डोकें उडवून त्याला जिवें मारिलें. ( ३७ ) यज्ञपुरुषाची आणि यमधर्माची देखील अशीच अवस्था झाली, असें पाहून विष्णु रागारागानें फारच खवळले व युद्ध करण्यास तयार झाले. ( ३८ ) सर्व पक्ष्यांचा राजा, व सर्पांस भराभर खावून टाकणारा, वेगशाली अशा गरुडानें आपला खांदा लववून त्यावर विष्णूस बसविलें. ( ३९ ) त्या युद्धांत जे कांहीं देव वीरभद्राच्या तडाक्यांतून सुटून पळून गेल्यामुळें जिवंत राहिले होते ते इंद्रादिक देव श्रीविष्णूस येऊन मिळाले आणि आपणासही इतर

णांस्त्यक्तुमिवोद्यताः ॥ ३९॥ विष्णुना सहितान्देवान्वृकेण क्रोष्टुकानिव ॥ दृष्ट्वा जहास भूतेंद्रो मृगेश इव विव्यथः ॥ ४०॥ तस्मिन्नवसरे व्योम्नि समाविरभवद्रथः ॥ सहस्रसूर्यसंकाशश्चारुवीरवृषध्वजः ॥ ४१ ॥ अश्वरत्नद्वयोदारः खरचक्रचतुष्टयः ॥ संचितानेकदिव्यास्त्रशररत्नपरिष्कृतः ॥४२ ॥ तस्यापि रथवर्यस्य स्यात्स एव हि सारथिः ॥ य एव त्रैपुरे युद्धे पूर्वं शार्वरथे स्थितः ॥ ४३ ॥ स तं रथवरं ब्रह्मा शासनादेव शूलिनः ॥ हरेः समीपमानीय कृतांजलिरभाषत ॥ ४४ ॥ भगवन्भद्र भद्रांग भगवानिंदुभूषणः ॥ आज्ञापयति

---

देवांप्रमाणें वीरभद्राच्या हांतून मरण यावें ह्मणूनच कीं काय विष्णूस साहाय्य करूं लागले. ( ४० ) एखाद्या लांडग्याला पुढें करून पांचपन्नास कोल्हे आपल्या आंगावर धावून आले तर त्याबद्दल सिंहाला कांहींच वाटत नाहीं त्याप्रमाणें श्रीविष्णूस पुढें करून सर्व देव आपणाबरोबर लढाईस येतात असें पाहून वीरभद्रास मुळींच कांहीं वाटलें नाहीं उलट तो हांसूं लागला. ( ४१ ) त्याचवेळीं आकाशांतून वीरभद्राकरितां एक रथ खालीं उतरला. तो हजार सूर्यापेक्षां देखील जास्त तेजस्वी असून त्यावर सुंदर आणि पराक्रमी अशा नंदीचें चित्र काढलेला ध्वज होता. ( ४२ ) त्या रथाला मोठमोठे दोन सुरेख घोडे जुंपलेले होते त्या रथाला तीक्ष्ण धारेचीं चार चाकें होतीं. आणि त्या रथांत अनेक प्रकारचीं उत्तम उत्तम अस्त्रें आणि उत्तम उत्तम बाण ठेवलेले असल्यामुळें तो रथ फार शोभत होता. ( ४३ ) त्रिपुरांचा शंकरांनी संहार केला त्यावेळीं त्यांच्या रथावर जो ब्रह्मदेव सारथी होता तोच ब्रह्मदेव वीरभद्राकरितां शंकरानी आकाशांतून पाठिविलेल्या या रथावरही होता. ( ४४ ) शूल धारण करणाऱ्या श्रीशिवाच्या आज्ञेप्रमाणें सारथी ब्रह्मदेवानें तो उत्तम विष्णूसमक्ष वीरभद्राजवळ आणून त्यास हात जोडून ह्मटलें. ( ४५ ) परमेश्वरा, कल्याणकारक शरीर असणाऱ्या वीरभद्रा, तूं मोठा धैर्यवान् आहेस तुला बसण्याकरितां चंद्रकला मस्तकावर असणाऱ्या श्रीशंकरानें हा अविनाशी रथ पाठिविला आहे आणि ह्या रथांत बसून तूं विष्णूबरोबर युद्ध कर अशी तुला

धीरं त्वां रथमारोढुमव्ययः ॥ ४५ ॥ रम्याश्रमसमीपस्थस्त्र्यंबकोऽ-
म्बिकया सह ॥ पश्यत्येव महाबाहो दुःसहं ते पराक्रमम् ॥ ४६ ॥
तस्य तद्वचनं श्रुत्वा स वीरो रणकुंजरः ॥ आरुरोह रथं दिव्यमनु-
गृह्य पितामहम् ॥ ४७ ॥ तदा रथवरे तस्मिन्स्थिते ब्रह्मणि सारथौ
॥ भद्रस्य ववृधे लक्ष्मी रुद्रस्येव पुरद्विषः ॥ ४८ ॥ ततः शंखवरं दी-
प्तं चंद्रकुंदसमप्रभम् ॥ प्रदध्मौ वदने कृत्वा भानुकंपो महाबलः
॥ ४९ ॥ तस्य शंखस्य संनादं भिन्नसागरसन्निभम् ॥ श्रुत्वा भयेन
देवानां जज्वाल जठरानलः ॥ ५० ॥ यक्षविद्याधराहींद्रैः सिद्धैर्यु
द्धदिदृक्षुभिः ॥ क्षणेन निबिडीभूताः साकाशविवरा दिशः ॥ ५१ ॥
ततः शार्ङ्गेंद्र चापांकः स नारायणनीरदः ॥ महता बाणवर्षेण तुतोद

---

आज्ञा केली आहे. ( ४६ ) तीन नेत्र असणारा श्रीशंकर पार्वतीसहित ह्या जवळच्या सुंदर आश्रमांत बसला आहे आणि हे पराक्रमी वीरभद्रा तेथून तो तूं कसा काय अलौकिक पराक्रम करितोस तें पाहत आहे. ( ४७ ) त्या ब्रह्मदेवाचें तें बोलणें ऐकून तो पराक्रमी आणि रणशूर वीरभद्र ब्रह्मदेवाच्या शब्दास मान देऊन त्या सुंदर रथावर चढला. ( ४८ ) त्या उत्तम रथावर बसून ब्रह्मदेव सारथ्याचें काम करूं लागल्यावर पूर्वीं त्रिपुरांचा विध्वंस करावयाचेवेळीं शिवाचे रथावर बसून सारथीपणाचें काम करूं लागल्यामुळें शिवाची जशी शोभा जास्त वाटली तशी त्यावेळीं वीरभद्राचीही वाटली. ( ४९ ) त्यावेळीं भानुकंप नावाचा पराक्रमी शिवदूत होता त्यानें लखलखीत पांढरा दिसणारा उत्तम शंख आपल्या तोंडानें वाजविला. ( ५० ) त्या शंखाचा नाद एखादा समुद्र फुटल्यासारखा झाला त्याचा नाद ऐकून भीतीनें तर देवांच्या पोटांत आगच पडली. ( ५१ ) तो युद्धाचा चमत्कार पाहण्यासाठीं यक्ष, विद्याधर, मोठमोठे सर्प आणि सिद्ध यांची इतकी गर्दी झाली कीं, एका क्षणांत आकाशाचे सर्व भाग आणि दहा दिशा अगदीं गच्च भरल्या. ( ५२ ) नारायण एखाद्या मेघासारखा हातांत शार्ङ्ग धनुष्य घेऊन भराभर पावसांच्या धारासारखी बाणांची वृष्टि करूं लागला व त्यानें

पा० १ रैभ्याश्रमसमीपस्थ

गणगोवृषम् ॥ ५२ ॥ तं दृष्ट्वा विष्णुमायांतं शतधा बाणवर्षिणम् ॥ स चाददे धनुर्जेतुं भद्रो बाणसहस्रमुक् ॥ ५३ ॥ समादाय च तद्दिव्यं धनुः समरभैरवम् ॥ शनैर्विस्फारमायास मेरुं धनुरिवेश्वरः ॥ ॥ ५४ ॥ तस्य विस्फार्यमाणस्य धनुषोऽभून्महास्वनः ॥ तेन स्वनेन महता पृथिवी समकंपत ॥ ५५ ॥ ततः शरवरं घोरं दीप्तमाशीविषोपमम् ॥ जग्राह गणपः श्रीमान्स्वयमुग्रपराक्रमः ॥ ५६ ॥ बाणोद्धारे भुजो यस्य तूणीवदनसंगतः ॥ प्रत्यदृश्यत वल्मीकं विविक्षुरिव पन्नगः ॥ ५७ ॥ समुद्धृतः करे तस्य तत्क्षणं रुरुचे शरः ॥ महाभुजंगसंदष्टो यथा बालभुजंगमः ॥ ५८ ॥ शरेण घनतीव्रेण भद्रो रुद्रपराक्रमः ॥ विव्याध कुपितो बाढं ललाटे विष्णुमप्यथ ॥ ५९ ॥

---

वीरभद्रास जेर करून सोडिलें. ( ५३ ) शेंकडो बाण आपल्या आंगावर सोडीत सोडीत श्रीविष्णु आपल्यावर धांवून येतो असें पाहतांच त्या वीरभद्रानें हजार बाण एकदम सोडतां येणारें व शत्रूवर जय हटकून मिळविणारे धनुष्य आपल्या हातांत घेतलें. ( ५४ ) तें धनुष्य फारच दिव्य असून निकराचे युद्ध करण्याच्या उपयोगी होतें तें धनुष्य हातीं घेऊन पूर्वी त्रिपुरास जाळण्याच्यावेळीं शंकरानीं मेरुपर्वताचें धनुष्य करून तें जसें त्याची प्रत्यंचा ओढून टणत्कार करीत होते तसाच हळू हळू धनुष्याचा टणत्कार करूं लागला. ( ५५ ) त्या धनुष्याचा टणत्कार केल्याबरोबर जो मोठा आवाज झाला त्या मोठ्या आवाजामुळें पृथ्वी तर थरथर कापूं लागली. ( ५६ ) मग अतिशय पराक्रमी अशा त्या वीरभद्रानें लखलखीत सापासारखा भयंकर असा उत्तम बाण आपले हातांत घेतला. ( ५७ ) तो बाण आपल्या हातानें धनुष्यास लावण्याकरितां भात्यांतून काढीत असतां भात्याच्या तोंडाजवळ जसा एखाद्या बिळांत शिरण्याकरितां आलेला सर्प शोभावा तसा शोभला. ( ५८ ) व भात्यांतून काढून वीरभद्रानें आपल्या हातांत घेतल्यावर मोठा साप चावलेला एखादा लहान साप जसा शोभावा तसा शोभला. ( ५९ ) मग शंकरासारखा पराक्रम करणाऱ्या त्या वीरभद्रानें रागावून फारच प्रखर अशा त्या बाणानें विष्णूच्या कपाळावर प्रहार केला.

ललाटेऽभिहतो विष्णुः पूर्वमेवात्रमानितः ॥ चुकोप गणपेंद्राय मृगेंद्रायेव गोवृषः ॥ ६० ॥ ततस्त्वशनिकल्पेन क्रूरास्येन महेषुणा ॥ विव्याध गणराजस्य भुजे भुजगसन्निभे ॥ ६१ ॥ सोऽपि तस्य भुजे भूयः सूर्यायुतसमप्रभम् ॥ विससर्ज शरं वेगाद्वीरभद्रो महाबलः ॥ ६२ ॥ स च विष्णुः पुनर्भद्रं भद्रो विष्णुं तथा पुनः ॥ स च तं स च तं विप्राः शरैस्तावनुजघ्नतुः ॥ ६३ ॥ तथा परस्परं वेगाच्छरानाशु विमुंचतोः ॥ तयोः समभवद्युद्धं तुमुलं रोमहर्षणम् ॥ ६४ ॥ तत्दृष्ट्वा तुमुलं युद्धं तयोर्वै विजिगीषतोः ॥ हाहाकारो महानासीदाकाशे खेचरेरितः ॥ ६५ ॥ ततस्त्वनलकुंडेन शरेणादित्यवर्चसा ॥ विव्याध सुदृढं भद्रो विष्णोर्महति वक्षसि

---

( ६० ) अगोदर त्या वीरभद्रानें आपल्या कपाळावर प्रहार करून आपला मोठा अपमान केला ह्मणून विष्णूस मोठा राग आला व तो जसें एखाद्या सिंहावर माजलेल्या पोळानें रागवावें तसें रागावला. ( ६१ ) आणि मग सर्पासारखा भयंकर व तीक्ष्ण तोंडाचा एक बाण घेऊन वीरभद्राच्या सापासारखा लांब असणाऱ्या हातावर जोरानें मारला. (६२) त्या पराक्रमी वीरभद्रानें पुन्हां त्या विष्णूच्या हातावर दहा लक्ष सूर्यासारखा तेजस्वी बाण मोठ्या जोरानें सोडला. ( ६३ ) मग विष्णूनें पुन्हां वीरभद्रास बाण मारावा वीरभद्रानें पुन्हां विष्णूस बाण मारावा पुन्हां श्रीविष्णूनें श्रीवीरभद्रास बाण मारावा व वीरभद्रानें पुन्हां बाण मारावा अशा रीतीनें ब्राह्मणहो ते दोघेजण एकमेकांवर बाण सोडू लागले. ( ६४ ) ते दोघे विष्णु आणि वीरभद्र जलदीनें वरचेवर वरचेवर बाण सोडूं लागल्यामुळें आंगावर शाहरे येतील असें तुमूल युद्ध होऊं लागलें. ( ६५ ) ते दोघेजण एकमेकाला जिंकण्याकरितां तुमुल युद्ध करूं लागले त्याचा परिणाम काय होईल ह्या भयानें आकाशांत देवांनीं मोठा हाहाःकार केला. ( ६६ ) तेव्हां अग्नि ज्याच्या तोंडास बसविलेला आहे अशा सर्यासारख्या लखलखीत बाणानें वीरभद्रानें विष्णूच्या फार

॥ ६६ ॥ स तु तीव्रप्रपातेन शरेण दृढजीवितः ॥ महतीं रुजमासाद्य निपपात विमोहितः ॥ ६७ ॥ पुनः क्षणादिवोत्थाय लब्धसंज्ञस्तदा हरिः ॥ सर्वाण्यपि च दिव्यास्त्राण्यथैनं प्रत्यवासृजत् ॥ ६८ ॥ स च विष्णुर्धनुर्मुक्तान्सर्वांछर्वचमूपतिः ॥ सहसा वारयामास घोरैः प्रतिशरैः शरान् ॥ ६९ ॥ ततो विष्णुः स्वनामांकबाणमव्याहतं क्वचित् ॥ ससर्ज क्रोधरक्ताक्षस्तमुद्दिश्य गणेश्वरम् ॥ ७० ॥ त बाणं बाणवर्येण भद्रो भद्राह्वयेण तु ॥ अप्राप्तमेव भगवांश्चिच्छेद शतधा पथि ॥ ७१ ॥ अथैकेनेषुणा शार्ङ्गं द्वाभ्यां पक्षौ गरुत्मतः ॥ निमेषादिव चिच्छेद तदद्भुतमिवाभवत् ॥ ७२ ॥ ततो योगबलाद्विष्णुर्देहाद्देवान्सुदारुणान् ॥ शंखचक्रगदाहस्तान्विससर्ज सहस्रशः ॥ ७३ ॥ सर्वांस्तान्क्षणमात्रेण

---

रुंद अशा उरावर प्रहार केला. ( ६७ ) विष्णूच्या आंगांत सामर्थ्य पुष्कळ असून त्याचें आयुष्यही बळकट होतें खरें तो बाण उरावर लागल्याबरोबर त्या प्रहारानें त्यास मोठीच जखम झाली, त्यामुळें तो मूर्छित होऊन जमीनीवर पडला. ( ६८ ) पुन्हां क्षणाभरानें विष्णु सावध झाला आणि त्यानें जितकीं जितकीं दिव्य अस्त्रें होतीं तितकीं सर्व वीरभद्राच्या आंगावर टाकिलीं. ( ६९ ) शिवगणांचें अधिपत्य करणाऱ्या वीरभद्रानें विष्णूनें आपल्या आंगावर जितकीं अस्त्रें टाकिलीं होतीं तितकीं सर्व त्यांस उलट मोठमोठे बाण मारून मोडून टाकिलीं. ( ७० ) मग विष्णूनें रागानें डोळे लाल करून आपलें नांव असलेला व कोठेंहीं वाया न जाणारा बाण वीरभद्राच्या आंगावर टाकिला. ( ७१ ) तो बाण आपल्या आंगावर येतो असें पाहून वीरभद्रानें आपल्या नांवाचा बाण एक सोडून त्याचे अर्ध्या वाटेंतच शंभर तुकडे केले. ( ७२ ) आणि लागलेंच एका क्षणांत वीरभद्रानें एक बाण मारून विष्णूचें शार्ङ्ग धनुष्य तोडलें व दोन बाण मारून गरुडास कापून काढिलें तें तर आश्चर्यच झालें. ( ७३ ) तेव्हां विष्णूनें योगबलानें आपल्या आंगापासून शंख चक्र गदा वगैरे आयुधें घेतलेले हजारों विष्णु एकदम उत्पन्न केले. ( ७४ ) शंकरानीं आपल्या तिसऱ्या डोळ्यां-

त्रिपुरानिव शंकरः ॥ निर्ददाह महाबाहुर्नेत्रसृष्टेन वन्हिना ॥ ७४॥ ततः क्रुद्धतरो विष्णुश्चक्रमुद्यम्य सत्वरः ॥ तस्मिन्वीरे समुत्स्रष्टुं तदानीमुद्यतोऽभवत् ॥ ७५ ॥ तं दृष्ट्वा चक्रमुद्यम्य पुरतः समुपस्थितम् ॥ स्मयन्निवगणेशानो व्यष्टंभयदयत्नतः ॥ ७६ ॥ स्तंभितांगस्तु तच्चक्रं वीरमप्रतिमं क्वचित् ॥ इच्छन्नपि समुत्स्रष्टुं न विष्णुरभवत्क्षमः ॥७७॥ क्रोशन्निवैकमुध्दृत्य बाहुं चक्रसमन्वितम् ॥ अतिष्ठदलसो विष्णुः पाषाण इव निश्चलः ॥ ७८ ॥ विशरीरो यथा जीवा विश्रृंगो वा यथा वृषः ॥ विदंष्ट्रश्च यथा सिंहस्तथा विष्णुरवस्थितः ॥ ७९ ॥ तं दृष्ट्वा दुर्दशापन्नं विष्णुमिंद्राद-

---

तील अग्नीनें त्रिपुरास जसें जाळून टाकिलें तसे त्या पराक्रमी वीरभद्रानें आपल्या तिसऱ्या डोळ्यांतील अग्नीनें योगबलानें जितके विष्णु उत्पन्न केले होते तितके सर्व जाळून टाकिले. ( ७५ ) ते पाहून तर विष्णूस फारच राग आला आणि त्या रागानें त्यानें आपलें सुदर्शन चक्र बाहेर काढून वीरभद्राच्या आंगावर सोडण्याचा विचार केला. (७६) विष्णु सुदर्शन घेऊन आपणास मारण्याकरितां आपल्या समोर धांवत येत आहे असें पाहतांच वीरभद्रास मोठें कौतुक वाटलें आणि त्यानें लागलेंच त्या विष्णूस कुंठित करून टाकिलें. ( ७७ ) विष्णूस पुढें जातां येईना व मागेही जाता येईना अशी स्थिति झाल्यामुळें विष्णूच्या मनांत वीरभद्रावर आपलें सुदर्शन चक्र सोडावें असें जरी पुष्कळ वाटत होते तरी त्यास तसें करितां आलें नाहीं. ( ७८ ) त्यानें प्रथम वीरभद्रावर सुदर्शनचक्र फेंकण्याकरितां एक हात वर उचलला होता तो हात चक्रासुद्धां वरचेवर ताठ राहिला खाली करतांच येईना त्यामुळें विष्णु आक्रोश करीत दगडासारखा एका जागीच स्तब्ध राहिला. ( ७९ ) शरीर नसल्यामुळें जशी प्राणाची अवस्था होते, शिंगें नसल्यामुळें बैलाची स्थिति जशी होते, किंवा दाढा पडल्यावर सिंहाची जशी स्थिति होते तीच स्थिति विष्णची झाली. ( ८० ) विष्णूची अशी दुर्दशा झालेली पाहून इंद्रादिक मुख्य मुख्य मोठी त-

यः सुराः ॥ सुसन्नद्धा गणेंद्रेण मृगेंद्रेणेव गोवृषाः ॥ ८० ॥ प्रगृहीतायुधा योद्धुं क्रुद्धाः समुपतस्थिरे ॥ तान्दृष्ट्वा समरे भद्रः क्षुद्रानिव हरिर्मृगान् ॥ ८१ ॥ अट्टहासेन घोरेण व्यष्टंभयदनिंदितः ॥ तथा शतमखस्यापि सवज्रो दक्षिणः करः ॥ ८२ ॥ सिसृक्षुरेव तद्वज्रं चित्रीकृत इवाभवत् ॥ अन्येषामपि सर्वेषामुद्युक्ता अपि बाहवः ॥ ८३ ॥ अलसानामिवारंभास्तां दशां नातियांत्युत ॥ एवं भगवता तेन व्याहताशेषवैभवाः ॥ ८४ ॥ अमराः समरे तस्य पुरतः स्थातुमक्षमाः ॥ स्तब्धैरवयवैरेव दुद्रुवुर्भयविव्हलाः ॥ ८५ ॥ विद्रुतांस्त्रिदशान्वीरान्वीरभद्रो महाभुजः ॥ वि-

---

यारी करून सिंहाबरोबर बैल जसे युद्ध करतात तसे वीरभद्राबरोबर युद्ध (८१) करण्याकरितां आपआपलीं आयुधें घेऊन रागानें धावून आले. अल्प शक्तीचीं जनावरें जशीं सिंहाचे आंगावर धावून येत आहेत तसे सर्व देव आपल्या आंगावर धावून येत आहेत असें पाहून निर्दोष स्वभावाच्या वीरभद्रानें (८२) एक मोठी थोरली आरोळी मारून तिच्या नादानेंच त्या सर्व देवास जागच्याजागी कुंठित केलें. सर्व देवाबरोबर इंद्रही आपल्या उजव्या हातांत वज्र घेऊन (८३) वीरभद्राच्या आंगावर मारण्याकरितां धावत होता त्याचा उजवा हात त्या वज्रासुद्धां जसाचा तसा चित्रांतील हातासारखा स्तब्ध झाला दुसरे सर्व देवही आपल्या हातांत शस्त्रास्त्रें घेऊन तीं उगारण्याकरितां वर हात करून धावत होते. (८४) त्यांचे ते हात आळस देण्याकरितां पसरलेल्या हातासारखेच निश्चळ राहिले ह्यापेक्षां दुसरी उपमा कांहीं देतां येत नाहीं. ह्याप्रमाणें त्या भगवान वीरभद्रानें सर्वतोपरी निर्वीर्य केलेले सर्व देव (८५) युद्धांत त्याचे पुढें उभें राहण्यास देखील धजले नाहींत. व त्यांचे अवयव जसे कुंठित झालेले होते तशा अवयवां सुद्धांच भयानें व्याकुळ होऊन ज्यांस जिकडे वाट फुटेल तिकडे पळूं लागले. (८६) पराक्रमी देव पळूं लागले असें पाहतांच तो महाशक्तिमान्

न्याध निशितैर्बाणैर्मेघो वर्षैरिवाचलान् ॥ ८६ ॥ बहवस्तस्य वीरस्य वाहवः परिघोपमाः ॥ शस्त्रैश्चकाशिरे दीप्तैः साग्निज्वाला इवोरगाः ॥ ८७ ॥ अस्त्रशस्त्राण्यनेकानि स वीरो विसृजन्वभौ ॥ विसृजन्सर्वभूतानि यथादौ विश्वसंभवः ॥ ८८ ॥ यथा रश्मिभिरादित्यः प्रच्छादयति मेदिनीम् ॥ तथा वीरः क्षणादेव शरैः प्राच्छादयद्दिशः ॥ ८९ ॥ खमंडले गणेंद्रस्य शराः कनक भूषिताः ॥ उत्पतन्तस्ताडिद्रूपैरुपमानपदं ययुः ॥ ९० ॥ महांतस्ते सुरांस्तांश्च मंडूकानिव डुंडुभाः ॥ प्राणैर्वियोजयामासुः पपुश्च रुधिरासवम् ॥ ९१ ॥ निकृत्तवाहवः केचित्केचिल्लूनवराननाः ॥ पार्श्वे विदारिताः केचिन्निपेतुरमरा भुवि ॥ ९२ ॥ विशिखो-

---

सोडतो त्याप्रमाणें त्यांच्यावर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करीत धावूं लागला. ( ८७ ) त्या वीरभद्राला परिघांसारखे मोठमोठाले पुष्कळ हात होते आणि त्या हातांत लखलखीत शस्त्रास्त्रें असल्यामुळें ते हात ज्यांच्या आंगांतून विस्तवाच्या ज्वाला निघतात अशा सापासारखे शोभूं लागले. ( ८८ ) सृष्टि करावयाचेवेळीं सर्व प्रकारचे प्राणिमात्र उत्पन्न करताना जसा शोभतो तसा वीरभद्र त्या पळणाऱ्या देवांच्या आंगावर शस्त्रास्त्रांचा वर्षाव करताना शोभूं लागला. ( ८९ ) जसा सूर्य आपल्या किरणांनीं सर्व पृथ्वी झांकतो त्याप्रमाणें वीरभद्रानें आपल्या बाणवृष्टीनें एका क्षणांत सर्व दिशा झांकून टाकिल्या ( ९० ) वीरभद्राचे बाण सोन्यानें मढविलेले होते ते जोरानें आकाशमार्गानें देवाचें आंगावर जात असतां आकाशांत जशा विजा चमकाव्या तसे चमकत होते. ( ९१ ) महांडुळ जातीचे साप जसे भराभर बेंडकुळ्या गिळून टाकितात त्याप्रमाणें वीरभद्राच्या मोठमोठ्या बाणांनीं देवांचे प्राण घेतले आणि शरीरांतील रक्त पिऊन टाकिलें. ( ९२ ) त्या भयंकर युद्धांत कितीएक देवांचे हात तुटून पडले, कितीकांचे गळे तुटले, कितीकांच्या पाठी फुटल्या आणि अशातऱ्हेनें ते देव दुःखानें जमीनीवर पडले आणि मरण पावले. ( ९३ ) बाण लागून कितीएकांच्या आंगाच्या तर साली नि-

न्मथितैर्गात्रैर्बहुभिश्छिन्नसंधिभिः ॥ विवृत्तनयनाः केचिन्निपेतुर्भूतले मृताः ॥ ९३ ॥ गां प्रवेष्टुमिवेच्छंतः खं गंतुमिव लिप्सवः॥ अलब्धात्मतिरोधाना व्यलीयंत परस्परम् ॥ ९४ ॥ भूमौ केचित्प्रविविशुः पर्वतानां गुहाः परे ॥ अपरे जग्मुराकाशं परे च विविशुर्जलम् ॥ ९५ ॥ तथा संछिन्नसर्वांगैः स वीरस्त्रिदशैर्बभौ ॥ परिग्रस्तप्रजावर्गो भगवानिव भैरवः ॥ ९६ ॥ एवं देवबलं सर्वं दीनं बीभत्सदर्शनम् ॥ गणेश्वरसमुत्पन्नं कृपणं वपुराददे ॥९७॥ तदा त्रिदशवीराणामसृक्सलिलवाहिनी ॥ प्रावर्तत नदी घोरा प्राणिनां भयशंसिनी ॥ ९८ ॥ रुधिरेण परिक्लिन्ना यज्ञभूमिस्तदा बभौ ॥ रक्तार्द्रवसना श्यामा हतशुंभेव कौशिकी ॥ ९९ ॥

---

घाल्या कितीएकांचे शरीरांतील सांधे तुटले अशा तऱ्हेनें कितिएक देव गरगर डोळे फिरवीत जमीनीवर पडले आणि मरण पावले. ( ९४ ) कोणी जमीनींत शिरावयास पाहूं लागले कोणी आकाशांत उडून जाण्यास पाहूं लागले परंतु त्यांस लपतां येईना त्यामुळें एकमेकांच्या पाठीमागे एकमेक लपू लागले. ( ९५ ) कोणी जमींनींत शिरले कोणी पर्वतांच्या दरींत शिरले कोणी आकाशांत उडाले कोणीं पाण्यांत बुड्या मारिल्या. ( ९६ ) प्रळयकालच्यावेळीं परमेश्वर भैरव सर्व प्रजा गिळून टाकिल्यामुळें जसा शोभावा तसा सर्व आंग फुटून रक्तबंबाळ झालेल्या देवांमुळें वीरभद्र शोभला. ( ९७ ) ह्याप्रमाणें वीरभद्रानें मोठा वीरभद्र मेघ जसा पावसाच्या धारांवर धारा सोडून पर्वतांस भिजवून पराक्रम करून देवांचें सर्व सैन्य अगदीं हतवीर्य केलें त्यांचेकडे पाहिलें तर किळस येऊं लागली. अशी गणेश्वराच्या हातून देवसैन्याची दुर्दशा झाली. ( ९८ ) त्या भयंकर युद्धांत पराक्रमी देव इतके मरण पावले कीं, ह्यांच्या रक्ताची पाण्याची नदी मोठी थोरली होऊं लागली ती पाहिल्यामुळें प्राणिमात्रांचे काळीज फाटून जाई ( ९९ ) शुंभासुरास मारताना रक्तानें भरलेलें लाल रंगाचें वस्त्र नेसलेली स्वतः काळे सावळें रूप असणारी कौशिकी देवी जशी शोभली तशीच वीरभद्राच्या युद्धांत रक्ताचे पूर वाहू लागल्यामुळें दक्षाची यज्ञभूमि कौशिकीसार-

तस्मिन्महति निर्वृत्ते समरे भृशदारुणे ॥ भयेनैव परित्रस्ता प्रचचाल वसुंधरा ॥ १०० ॥ महोर्मिकालिलावर्तश्चुक्षुभे च महोदधिः ॥ पेतुश्चोल्काः सहोत्पातैः शाखाश्च मुमुचुर्द्रुमाः ॥ १०१ ॥ अप्रसन्ना दिशः सर्वाः पवनश्चाशिवो ववौ ॥ अहो विधिविपर्यासस्त्वश्वमेधोऽयमध्वरः ॥१०२॥ यजमानः स्वयं दक्षो ब्रह्मपुत्रः प्रजापतिः ॥ धर्मादयः सदस्याश्च रक्षिता गरुडध्वजः ॥ १०३ ॥ भागांश्च प्रतिगृण्हाति साक्षादिंद्रादयः सुराः ॥ तथापि यजमानस्य यज्ञस्य च सहर्त्विजः ॥ १०४ ॥ सद्य एव शिरश्छेदः साधु संपद्यते फलम् ॥ तस्मान्नावेद निर्दिष्टं न चेश्वरबहिष्कृतम् ॥ १०५ ॥ नासत्परिगृहीतं च कर्म कुर्यात्कदा-

---

खीच दिसली. ( १०० ) तो फार मोठाच अतिशय भयंकर संग्राम संपल्यावर भयानें गर्भगळित झालेली पृथ्वी थरथर कापूं लागली. ( १०१ ) त्यावेळीं समुद्रावर मोठमोठ्या लाटा उसळू लागल्या समुद्राच्या पाण्यावर फेंस आला आणि भोंवरे फिरूं लागले व तो महासमुद्र फारच खवळला. मोठमोठे उत्पात होऊन तारे तुटून पडले व झाडांच्या फांद्या आपण होऊन मोडून खालीं पडल्या. ( १०२ ) सर्व दिशा उदास दिसूं लागल्या वारा अमंगल रीतीचा वाहूं लागला लोक त्यावेळीं आपआपसांत ह्मणूं लागले कीं काय दुर्दैवाचा फेरा पाहा हा यज्ञही सामान्य नव्हे अश्वमेधयज्ञ होता. ( १०३ ) याचा कर्ता स्वतः दक्ष होता तोही अज्ञान नव्हे प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा मुलगा, धर्मादिक इतर देव या यज्ञांत सभासद होते विष्णु स्वतः या यज्ञाचा रक्षक होता. ( १०४ ) आणि यज्ञभाग घेण्याकरितां प्रत्यक्ष इंद्रादिक देव स्वतः आले होते. तरीपण यज्ञाचे यजमानाचे आणि ऋत्विजांची ( १०५ ) एकदम डोकीं तुटलीं उत्तम शेवट झाला ह्मणावयाचा ह्यासाठीं मनुष्यानें वेदविरुद्ध कोणतेंही कर्म करूं नये किंवा परमेश्वराच्या आज्ञेबाहेर कोणतेंही कर्म करूं नये. ( १०६ ) तसेंच अज्ञान मनुष्यांस संमत

चन ॥ कृत्वापि सुमहत्पुण्यमिष्ट्वा यज्ञशतैरपि ॥ १०६ ॥ न तत्फलमवाप्नोति भक्तिहीनो महेश्वरे ॥ कृत्वापि सुमहत्पापं भक्त्या यजति यः शिवम् ॥ १०७ ॥ मुच्यते पातकैः सर्वैर्नात्र कार्या विचारणा ॥ बहुनात्र किमुक्तेन वृथा दानं वृथा तपः ॥ वृथा यज्ञो वृथा होमः शिवनिंदारतस्य तु ॥ १०८ ॥ ॥ वृत्तं ॥ ततः सनारायणकाः सरुद्राः सलोकपालाः समरे सुरौघाः ॥ गणेंद्रचापच्युतबाणविद्धाः प्रदुद्रुवुर्गाढरुजाभिभूताः ॥ १०९ ॥ चेलुः क्वचित्केचन शीर्णकेशाः सेदुः क्वचित्केचन दीर्घगात्राः ॥ पेतुः क्वचित्केचन भिन्नवक्त्रा नेशुः क्वचित्केचन देववीराः ॥ ११० ॥ केचिच्च तत्र त्रिदशा विपन्ना विस्रस्तवस्त्राभरणास्त्रशस्त्राः ॥ नि-

---

असलेलें कोणतेंही काम कधींही करूं नये. शेकडो यज्ञ करून पुष्कळ पुण्य जरी संग्रह केला ( १०७ ) परंतु महेश्वराची भक्ति करीत नाहीं तर त्याचें फळ त्याला मिळत नाहीं. जर कोणी मनुष्यानें अतिशय पाप केलें आणि पुढें त्याचे मनास उपरति होऊन भक्तीनें शिवाची पूजा केली. ( १०८ ) तर सर्व पातकापासून तो मुक्त होतो यांत विचार करावयासच नको. फार बोलून काय उपयोग ? शिवनिंदेमध्यें जो वेळ घालवतो, त्याचें दान, होम, तप, यज्ञ वगैरे सर्व व्यर्थ आहेत. (१०९) नंतर त्या युद्धांत असलेले नारायणगण, रुद्रगण लोकपाल, सर्व देव वीरभद्राच्या बाणाच्या मारापुढें टिकाव न धरितां बाणाची व्यथा फार होऊन त्या समरांतून पळून गेले. ( ११० ) त्या वीरभद्राच्या बाणाच्या योगानें कैक लोकांचे केसच सर्व गळाल्यामुळें ते तेथून पळाले. कांहीं ठिकाणीं तर शरीर मोठें असल्यामुळें पळतां येईना ह्मणून तेथेंच बसले आहेत असें दिसलें. कैक लोकांचीं तोंडें फुटलीं होतीं त्यामुळें ते त्याच ठिकाणीं पडलेले दिसले. कैक पराक्रमी देव वीरभद्राबरोबर लढण्यास असमर्थ होऊन तसेच पळाले. ( १११ ) कितीएक देव तर तेथें मरून पडले होते कितीएक देवांच्या आंगावरील वस्त्रें भूषणें आणि हातांतील शस्त्रास्त्रें गळून पडलीं त्या देवांचा मद आणि गर्व नाहींसा झाला त्यांची शक्ति

पेतुरुद्भावितदीनमुद्रा मदं च दर्पं च बलं च हित्वा ॥ १११ ॥ तमु-
त्पथप्रास्थितमप्रधृष्यो विक्षिप्य दक्षाध्वरमक्षतास्त्रः ॥ बभौ गणेशः
स गणेश्वराणां मध्ये स्थितः सिंह इवर्षभाणाम् ॥ ११२ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे दक्ष·
शिवगणयुद्धवर्णनंनामैकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥

---

नाहींशी झाली ह्मणून ते लहान तोंड करून जमीनीवर पडले. ( ११२ )
त्या दांडगेश्वर [ उद्धत ] रीतीनें चाललेल्या दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस
करून ज्याच्या अस्त्राचा मुळींच नाश झाला नाहीं असा तो वीरभद्र
गणेश्वर बैलामध्यें जसा सिंह शोभावा तसा सर्व शिवगणांमध्यें शोभला.

ह्याप्रमाणें शैवनांवाच्या पुराणांतील वायवीय संहितेच्या पूर्वभागा-
पैकीं दक्षाचें व शिवगणाचें युद्धवर्णन नांवाचा एकोणिसावा अध्याय संपला.



## ॥ अथ विंशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ इति सच्छिन्नभिन्नांगा देवा विष्णुपुरोगमाः ॥ क्षणात्कष्टां दशामेत्य त्रेसुः स्तोकावशेषिताः ॥ १ ॥ त्रस्तांस्तान्समरे वीरा वीरभद्रप्रचोदिताः ॥ प्रगृह्य च यथादोषं निगडैरायसैर्दृढैः ॥ २ ॥ बबंधुः पाणिपादेषु कंधरेषूदरेषु च ॥ तस्मिन्नवसरे ब्रह्मा भद्रमद्रींद्रजानुगम्॥ ३॥सारथ्याल्लब्धवात्सल्यः प्रार्थयन्प्रणतोऽब्रवीत् ॥ अलं क्रोधेन भगवन्नष्टाश्चैते दिवौकसः ॥ ४ ॥ प्रसीद क्षम्यतां सर्वं रोमजैः सह सुव्रत ॥ एवं विज्ञापितस्तेन ब्रह्मणा परमेष्ठिना ॥ ५ ॥ शमं जगाम संप्रीतो गणपस्तस्य गौरवात् ॥

---

( १ ) वायु ह्मणालाः—ह्याप्रमाणें आंगें रक्तबंबाळ झालेले विष्णु वगैरे मुख्य मुख्य देव जे कांहीं थोडे बहुत जिवंत राहिले होते ते सर्वजण मोठ्या संकटांत सांपडून अगदीं घाबरून गेले. ( २ ) ते सर्व देव युद्धांत घाबरून गेलेले पाहून वीरभद्रानें त्यांच्या आंगावर आपले पराक्रमी शिवगण पाठविले. त्यांनीं येऊन ज्या देवाचा जास्त जसा अपराध होता त्या अपराधानुरूप मजबूद लोखंडाच्या बिड्या ( ३ )त्यांच्या हातांत, पायांत, गळ्यांत आणि पोटास घालून बांधून टाकले. त्यावेळीं ब्रह्मदेव हिमालयपर्वताच्या मुलीच्या [ पार्वतीच्या ] सेवकास ( वीरभद्रास ) ( ४ ) सारथ्यकर्म केल्यामुळें आपल्यावर वीरभद्राची मर्जी सुप्रसन्न झाली आहे असें पाहून नम्रतेनें प्रार्थना करूं लागला. भगवन् वीरभद्रा, आतां राग शांत कर. ते सर्व देव मरण पावले ( ५ ) आतां मजवर कृपा कर. तूं मोठा सदाचारी आहेस, तूं आपल्या आंगापासून जे इतके शिवगण उत्पन्न केलेस त्या सर्वांस नीट समजावून सांग, आणि देवाच्या सर्व अपराधांची क्षमा कर. ह्याप्रमाणें त्या परमेष्ठी ब्रह्मदेवानें वीरभद्राची विनंति केल्यावर ( ६ ) वीरभद्र शांत झाला आणि ब्रह्मदेवाचा सन्मान करण्याकरितां त्यानें त्याचें बोलणें मान्य केलें. वीरभद्राची

देवाश्च लब्धावसरा देवदेवस्य मंत्रिणः ॥ ६ ॥ धारयंतोऽजलिं मूर्ध्नि तुष्टुवुर्विविधैः स्तवैः ॥

देवा ऊचुः ॥ नमः शिवाय शांताय यज्ञहंत्रे त्रिशूलिने ॥७॥ रुद्रभद्राय रुद्राणां पतये रुद्रमूर्तये ॥ कालाग्निरुद्ररूपाय कालकामांगहारिणे ॥ ८ ॥ देवतानां शिरोहंत्रे दक्षस्य च दुरात्मनः ॥ संसर्गादस्य पापस्य दक्षस्याक्लिष्टकर्मणः ॥ ९ ॥ शासिताः समरे वीर त्वया वयमनिंदिताः ॥ दग्धाश्चामी वयं सर्वे त्वत्तो भीताश्च भो प्रभो ॥१०॥ त्वमेव गतिरस्माकं त्राहि नः शरणागतान्॥ तुष्टस्त्वेवं स्तुतो देवान्विसृज्य निगडात्प्रभुः ॥ ११ ॥ आनयद्देवदेववस्य समीपममरानिह ॥ देवोऽपि तत्र भगवानंतरिक्षे स्थितः-

---

मर्जी संपादन करावयास ही संधि बरी आहे असें पाहून ते सर्व देवाधिदेव शंकराच्या प्रतिनिधीची ( वीरभद्राची ) ( ७ ) कोंपरापासून हात जोडून व ते मस्तकास लाऊन अनेक प्रकारच्या स्तोत्रांनीं स्तुति करूं लागले. देव ह्मणाले—तूं प्रत्यक्ष शिव आहेस, तुझा स्वभाव फार शांत आहे, तूं दक्षयज्ञाचा विध्वंस केलास, तुझ्या हातांत त्रिशूल आहे, ( ८ ) तूं क्रूर असून सौम्यही आहेस, तूं रुद्रांचा अधिपति आहेस, व रुद्रस्वरूप आहेस, तूं काळासारखा, अग्नीसारखा व रुद्रासारखा क्रूर आहेस, तूं यमधर्म आणि मदन ह्यांचें आंग जाळणारा आहेस, ( ९ ) तूं देवांचीं मस्तकें आणि ह्या दुष्ट दक्षाचें मस्तक तोडलेस, हा दक्ष मोठा पापी आहे, ह्याचें कर्म चांगलें नाहीं, ह्याच्या संगतीनें ( १० ) युद्धभूमीवर तूं आमची पुरी खोड मोडलीस. वास्तविक आमच्याकडे कांहीं अपराध नाहीं आह्मी सर्वजण होरपळून गेलों. हे परमेश्वरा, आह्मी तुला फारच भ्यालों. ( ११ ) तूच आमचा रक्षक आहेस, आह्मी तुला शरण आलों तूं आमचें रक्षण कर. अशी देवांची विनंति करून वीरभद्र प्रसन्न झाला, त्यानें सर्व देवांच्या हातापायांतील विड्या काढून त्यांची सुटका केली. ( १२ ) व त्या सर्व देवांस त्यानें तेथून देवाधिदेव श्रीशंकराकडे नेलें परमात्मा श्रीशंकर तेथें जवळच अंतरिक्षांत

प्रभुः ॥ १२ ॥ सगणः सर्वगः सर्वः सर्वलोकमहेश्वरः ॥ तं दृष्ट्वा परमेशानं देवा विष्णुपुरोगमाः ॥ १३ ॥ प्रीता अपि च भीताश्च नमश्चक्रुर्महेश्वरम् ॥ दृष्ट्वा तानमरान्भीतान्प्रणतान् प्रणतार्तिहा ॥ १४ ॥ इदमाह महादेवः प्रहसन्प्रेक्ष्य पार्वतीम् ॥ मा भैष्ट त्रिदशा यूयं क्षांतोऽस्माभिर्व्यतिक्रमः ॥ १५॥ क्रुद्धेष्वस्मासु युष्माकं न स्थितिर्न च जीवितम् ॥ इत्युक्तास्त्रिदशाः सर्वे शवणामिततेजसा ॥ १६ ॥ सद्यो विगतसंत्रासा ननृतुर्विवशा मुदा ॥ अथास्मिन्नंतरे ब्रह्मा प्रणिपत्य कृतांजलिः ॥ एवं ह्यवसरं प्राप्य व्यज्ञापयत शूलिने ॥ १७ ॥

ब्रह्मोवाच ॥ जयदेव महादेव प्रणतार्तिप्रभंजन ॥ ईदृशेष्व-

---

बसले होते. (१२) गणसहित, सर्वत्र जाणणारा, सर्व लोकांचा प्रभु अशा त्या परमेश्वर श्रीशंकरास पाहतांच विष्णु वगैरे मुख्य मुख्य देवास (१४) फार समाधान वाटलें व भयही वाटलें, मग सर्व देवांनीं महादेवास नमस्कार केला. शरण आलेल्यांचें रक्षण करणाऱ्या त्या महादेवांनीं सर्व देव अगदीं घाबरून गेले आहेत व आपणापासून पुनः त्रास पोंहोचूं नये ह्मणून आपणास नमस्कार करितात, असें पाहून (१५) पार्वतीकडे पहात पहात सर्वांस हांसून ह्मटलें. देवहो, तुह्मी भिऊं नका, तुमचा अपराध आह्मीं क्षमा केला. (१६) आह्मी तुमच्यावर रागावल्यावर तुमचें रक्षण करणाराही कोणी नाहीं व तुमची जगण्याचीही आशा नाहीं. हें आह्मांस समजून चुकलें. त्या अलौकिक सामर्थ्य असणाऱ्या श्रीशंकरांनीं सर्व देवास असें ह्मटल्यावर (१७) त्यांची भीति लागलीच नाहींशी झाली व सर्वजण आनंदानें नाचूं उडूं लागले. त्याचवेळीं ब्रह्मदेव हात जोडून ही विनंति करण्यास वेळ बरी आहे असें पाहून श्रीशंकरास विनंति करूं लागला.

(१८) ब्रह्मदेव ह्मणालाः—हे महादेवा, आपला जयजयकार असो, आपणास जे लोक शरण येतात त्यांची पीडा आपण दूर करणोर आहां, अशा प्रकारचे भयंकर अपराध करणारांवर देखील

पराधेषु कोऽन्यस्त्वत्तः प्रसीदति ॥ १८ ॥ लब्धात्मानो भविष्यंति ये सुरा निहता मृधे ॥ प्रत्यापत्तिर्न कस्य स्यात्प्रसन्ने परमेश्वरे ॥ १९ ॥ यदिदं देवदेवानां कृतमंगेषु दूषणम् ॥ तदिदं भूषणं मन्ये तवांगीकारगौरवात् ॥ २० ॥ इति विज्ञाप्यमानस्तु ब्रह्मणा परमेष्ठिना ॥ विलोक्य वदनं देव्या देवदेवः स्मयन्निव ॥ २१ ॥ पुत्रभूतस्य वात्सल्याद्ब्रह्मणः पद्मजन्मनः ॥ प्रनष्टानां पुनस्तेषां प्रददौ पूर्ववत्तनुम् ॥ २२ ॥ ततः क्षणेन ते देवाः शतक्रतुपुरोगमाः ॥ प्रत्यापन्नशरीरांगाः प्रणेमुः परमेश्वरम् ॥ २३ ॥ वागीशाद्याश्च या देव्यो दण्डिता देवमातरः ॥ तासामपि यथापूर्वं तान्यंगानि ददौ भवः ॥ २४ ॥ दक्षस्य भगवानेव स्वयं ब्रह्मा पितामहः ॥

---

तुझ्याखेरीज दुसरा कोणता देव प्रसन्न होणार आहे ? ( १९ ) ह्या युद्धांत जे जे देव मरण पावले ते ते सर्व जिवंत होवोत. परमेश्वर प्रसन्न झाल्यावर कल्याण कोणाचें होणार नाहीं ? सर्वांचेंच कल्याण होईल ( २० ) ह्या युद्धांत मुख्य मुख्य देवांच्या आंगावर जे शस्त्रास्त्रांचे व्रण पडले आहेत ते सर्व तुम्ही ह्यांच्यावर पुन्हा कृपा केल्यामुळें हे ह्यांस एक प्रकारचे अलंकारच झाले आहेत असें मी मानतों. ( २१ ) परमेष्ठी ब्रह्मदेवानें अशी स्तुति केल्यावर देवाधिदेव शंकरांनीं हंसत हंसत पार्वतीच्या तोंडाकडे पाहिलें. ( २२ ) आणि तो कमलापासून जन्मलेला ब्रह्मदेव त्यांनीं मुलासारखा मानलेला असल्यामुळें तें त्यावरील ममतेमुळें त्याच्या विनंतीस मान देऊन युद्धांत मरण पावलेल्या देवांस पुन्हां पूर्वींप्रमाणें जीवंत केले. ( २३ ) नंतर तत्काळ इंद्र वगैरे मुख्य मुख्य देव त्यांचीं शरीरें पूर्वींप्रमाणें होऊन ते जिवंत होतांच त्यांनीं परमेश्वर श्रीशंकरास भक्तिभावानें नमस्कार केला. ( २४ ) सरस्वती वगैरे मुख्यमुख्य देवता व देवमाता ह्यांचीं शरीरें त्या युद्धांमध्यें वीरभद्राचे सेवकांनीं छिन्नभिन्न केलीं होतीं त्यांचीं त्यांचीं शरीरेंही शंकरांनीं पूर्वींप्रमाणें केलीं. ( २५ ) दक्षप्रजापतीनें जो एवढा शंकराचा मोठा अपराध केला होता त्या अपराधाकडे लक्ष्य पुरवून स्वतः भगवान् ब्रह्मदेवानें दक्षप्रजापतीस ह्या-

तत्पापानुगुणं चक्रे जरच्छागमुखं मुखम् ॥ २५ ॥ सोऽपि संज्ञां ततो लब्ध्वा समुत्थाय कृतांजलिः ॥ प्रलपन्बहुधा भीतस्तुष्टाव परमेश्वरम् ॥ २६ ॥ तं तथा व्याकुलं भीतं प्रलपन्तं कृतागसम् ॥ स्मयन्निवावदत्प्रेक्ष्य मा भैरिति घृणानिधिः ॥ २७ ॥ तथोक्त्वा ब्रह्मणस्तस्य पितुः प्रियचिकीर्षया ॥ गाणपत्यं ददौ तस्मै दक्षायाक्षयमीश्वरः ॥ २८ ॥ ततो ब्रह्मा महादेवमभिवंद्य कृतांजलिः ॥ तुष्टाव शुभया वाचा देवीं च गिरिजामुमाम् ॥ २९ ॥ ततो विष्णुस्ततो देवास्ततः सर्वे महर्षयः ॥ तुष्टुवुर्देवदेवेशं देवीं चापि पृथक्पृथक् ॥ ३० ॥ तदा पार्श्वस्थितं प्रेक्ष्य भद्रमद्रीन्द्रजा स्वयम् ॥

---

ताच्या बोकडाचें तोंड लाऊन त्यास सजीव केलें. ( २६ ) तो दक्ष प्रजापतीही सावध होताच उठून हात जोडून उभा राहिला, व अनेक प्रकारांनीं काकुलती करून भयानें थरथर कांपत परमेश्वर श्रीशंकराची स्तुति करूं लागला. ( २७ ) दक्षप्रजापति फार व्याकुळ झाला आहे, व भयानें काकुळती करितो आपल्या हातून अपराध घडल्यामुळें त्याला पश्चात्ताप झाल्याचे स्पष्ट दिसत आहे त्याकडे त्या दयाळू महादेवानें हांसत हांसत पाहिलें आणि त्यास तूं आतां भिऊं नकोस असें आश्वासन दिलें. ( २८ ) व ब्रह्मदेवानें जी विनंति केली ती विनंति ब्रह्मदेव हा स्वतः दक्षाचा बाप असल्यामुळें ब्रह्मदेवाच्या मर्जीकरितां दक्षाचे सर्व अपराध क्षमा करून त्याला अक्षय गाणपत्य दिलें. ( २९ ) शंकरांनीं दक्षाचें सर्व अपराध क्षमा करून त्यास चिरकाल राहणारे गाणपत्यपद दिलें त्यामुळें ब्रह्मदेवास मोठा संतोष होऊन त्यांनीं हातजोडून महादेवास नमस्कार केला. व मधुर मधुर शद्बांनीं शिवाची आणि पार्वतीची त्यांनीं स्तुति केली ( ३० ) त्यानंतर विष्णु, सर्व देव आणि सर्व ऋषि यांनीं वेगळ्या वेगळ्या रीतीनें देवाधिदेव श्रीशंकराची आणि पार्वतीची स्तुति केली. ( ३१ ) त्यावेळीं पार्वतीच्या मुलीनें ( पार्वतीनें ) पाहिलें तों आपले बाजूकडे वीरभद्र हात जोडून उभा आहे, व त्यानें आपण सांगितल्या प्रमाणें कामगि-

कृतात्मप्रेषणं पुत्रं गृहीत्वा तं कृतांजलिम् ॥ ३१ ॥ आकृष्य भद्रया सार्धमंके समुपवेश्य च ॥ सस्वजे गुहवद्गाढं समाजिघ्रच्च मूर्धनि ॥ ३२ ॥ ततः प्रीततरा देवी वीरभद्राय शूलिने ॥ प्रददौ विविधानिष्टान्वरांश्चैव सहस्रधा ॥ ३३ ॥ वृत्तं॥ अथ तदा हरिशक्रपितामहप्रभृतयः सुरलोकमहेश्वराः ॥ सकललोकमहेश्वरमीश्वरं शरणमेत्य कृतांजलयोऽस्तुवन् ॥ ३४ ॥ स च पुनस्त्रिदशाञ्छरणागतान् परमकारुणिकः परमेश्वरः ॥ अनुगतास्मितलक्षणया गिरा शमितसर्वभयः समभाषत ॥ ३५ ॥ यदिदमाग इहाचरितं सुरैर्विधिनियोगवशादिव यंत्रितैः ॥ शरणमेत्य न तानवलोक्य वस्तदखिलं किल विस्मृतमेव नः ॥ ३६ ॥ तदिह यूयमपि प्रकृतं म-

---

री बजावली आहे व तो आपण अगदीं मुलासारखा मानलेला आहे. ( ३२ ) त्या वीरभद्रास आणि भद्रेस पार्वतीनें आपल्या हातानें आपणाजवळ ओढून घेतलें आणि त्यास आपले मांडीवर बसवून कार्तिकस्वामी प्रमाणेंच त्या दोघांस गाढ आलिंगन दिलें आणि त्याचे मस्तक हुंगलें, ( ३३ ) व पार्वतीनें वीरभद्राच्या कृत्याबद्दल अतिशय संतुष्ट होऊन शूल हातांत धरणाऱ्या वीरभद्रास तिनें त्याचे इच्छेप्रमाणें त्यास हजारों इच्छितवर दिले. ( ३४ ) मग त्यावेळीं विष्णु इंद्र, ब्रह्मदेव वगैरे देवलोकांरितां मुख्य मुख्य देव सर्व लोकांचा मुख्य परमेश्वर श्रीशंकर ह्यास शरण जाऊन दोन्हीं हात जोडून स्तुति करूं लागले. ( ३५ ) शंकर हे फारच दयाळु देव होत. त्यांस शरण जाणारांचीं सर्व दुःखें ते दूर करितात असा त्यांचा स्वभाव असल्यामुळें त्यांनीं त्या शरण येऊन स्तुति करणाऱ्या सर्व देवांकडे प्रेमानें पाहून ह्मटलें. ( ३६ ) देवहो, तुह्मी जो येथें मोठा अपराध केला तो अपराध तुमचे हातून व्हावा असा तुमचा दैवयोगच असल्यामुळें तुह्मीं केला. एरव्हीं केला नसता असो पुनः तुह्मांस झालेल्या गोष्टीचा पश्चात्ताप होऊन तुह्मी मला शरण आलां आहां त्याअर्थीं तुमचे सर्व अपराध मी क्षमा केले मी ते विसरून जातों. ( मी आपले मनांत तुमच्याविषयीं राग धरीत नाहीं. ) (३७) तर तुह्मीही आपले हातून झालेल्या गोष्टीबद्दल मनांत दुःख करूं नका.

नस्यविगणय्य विमर्दमपत्रपाः ॥ हरिविरिंचिसुरेंद्रमुखाः सुखं व्रजत देवपुरं प्रति संप्रति ॥ ३७ ॥ इति सुरानभिधाय सुरेश्वरो निकृतदक्षकृतक्रतुरक्रतुः ॥ स गिरिजानुचरः सपरिच्छदः स्थित इवांबरतोऽतरधीयत ॥ ३८ ॥ अथ सुरा अपि ते विगतव्यथाः कथितभद्रसुभद्रपराक्रमाः ॥ सपदि खेन सुखेन यथासुखं ययुरनेकसुखं मघवन्मुखाः ॥ ३९ ॥ इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे विंशोऽध्यायः ॥ २० ॥

---

जशी कांहीं ही गोष्ट आपले हातून घडलीच नाहीं असें समजा आणि विष्णु, ब्रह्मदेव, इंद्र वगैरे मुख्य मुख्य देवहो, तुह्मी सर्वजण आपापल्या नगरास सुखानें जा. ( ३८ ) असें सर्व देवांस सांगून तो देवाधिदेव दक्षयज्ञाचा विध्वंस करणारा, व ज्याला स्वतःला यज्ञ करण्याचें कारणच नाहीं असा तो परमेश्वर श्रीशिव पार्वतीस बरोबर घेऊन आपल्या पार्षदगणांसहित त्या देवांसमक्ष बसल्याठिकाणींच आकाशांत गुप्त झाला. ( ३९ ) मग ते इंद्रादिक सर्व देव देखील मनांतील सर्व दुःख सोडून वीरभद्राचा पराक्रम एकमेकांस सांगत सांगत लागलेच आकाशमार्गानें आनंदानें ज्यास जिकडे जावयाचें होतें त्या दिशेकडे तोंड करून निघून गेले.

ह्याप्रमाणें शैवनांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेंतील पूर्वभागापैकीं विसावा अध्याय संपला.



## ॥ अथ एकविंशोऽध्यायः ॥

ऋषय ऊचुः ॥ अंतर्धानं गतो देव्या सह सानुचरो हरः ॥ क्व यातः कुत्र वा वासः किं कृत्वा च रराम च ॥ १ ॥

वायुरुवाच ॥ महीधरवरः श्रीमान्मंदरश्चित्रकंदरः ॥ दयितो देवदेवस्य निवासस्तपसोऽभवत् ॥ २ ॥ तपोमहत्कृतं तेन वोढुं स्वशिरसा शिवौ ॥ चिरेण लब्धं तत्पादपंकजं स्पर्शजं सुखम् ॥ ३ ॥ तस्य शैलस्य सौंदर्यं सहस्रवदनैरपि ॥ न शक्यं विस्तराद्वक्तुं वर्षकोटिशतैरपि ॥ ४ ॥ शक्यमप्यस्य सौंदर्यं न

---

श्रीशिवास नमस्कार असो (१) ऋषि ह्मणालेः— वायो, आपण श्रीशिव सर्व देवांस आपापले नगरास परत जा असें सांगून गुप्त झालें ह्मणतां तर ते गुप्त झाल्यावर पार्वतीस आणि आपल्या प्रमथगणांस घेऊन कोणीकडे गेले? कोठें राहिले? आणि त्यानंतर त्यांनीं काय काय कृत्यें करून आपली कालक्रमणा केली? तें सर्व आह्मांस सांगा.

(२) असा ऋषीश्वरांचा प्रश्न ऐकून वायु ह्मणालाः— ऋषीश्वरहो, मंदर नांवाचा एक सुशोभित पर्वत आहे तो सर्व पर्वतांत श्रेष्ठ आहे, त्या पर्वताच्या गुहाही फार शोभिवंत आहेत. देवाधिदेव श्रीशंकराला तो पर्वत फारच आवडला आणि पुढें त्याच पर्वतावर राहून श्रीशंकरानें तपश्चर्या केली. (३) त्या मंदरपर्वतानेंही आपल्या शिखरावर शंकरपार्वतींनीं येऊन राहावें आणि आपणास कृतार्थ करावें ह्या उद्देशानें पुष्कळ वर्षेंपर्यंत तपश्चर्या केली तेव्हां फार दिवसांनीं त्या शिवपार्वतीच्या पदकमलांचा स्पर्श होण्याचें सुख मिळालें. (४) तो मंदरपर्वत इतका सुंदर आहे कीं, त्याच्या सुंदरपणाचें वर्णन हजार तोंडांनीं शंभरकोटिवर्षेंपर्यंत करीत राहिलें तरी सविस्तर रीतीनें करितां येणार नाहीं. (५) ह्मणून मीही त्या पर्वताचें सविस्तर सौंदर्य वर्णन

वर्णयितुमुत्सहे ॥ पर्वतांतरसौंदर्यसाधारण्यावधारणात् ॥ ५ ॥
इदं तु शक्यते वक्तुमेष पर्वतसुंदरः ॥ ऋद्ध्या कयापसौंदर्य-
मीश्वरावासयोग्यताम् ॥ ६ ॥ अतएव हि देवेन देव्याः प्रिय-
चिकीर्षया ॥ अतीव रमणीयोऽयं गिरिरंतःपुरीकृतः ॥ ७ ॥
मेखलाभूमयस्तस्य विपुलोपलपादपाः ॥ शिवयोर्नित्यसांनिध्या-
न्नयकुर्वंत्यखिलं जगत् ॥ ८ ॥ पितृभ्यां जगतो नित्यं स्थानपा-
नोपयोगतः ॥ अवाप्तपुण्यसंस्कारः प्रसरान्द्रिरितस्ततः ॥ ९ ॥
लघुशीतलसंस्पर्शैरच्छाच्छैर्निर्झरांबुभिः ॥ आधिराज्य इवाद्रीणाम-
द्रिरेषोऽभिषिच्यते ॥ १० ॥ निशासु शिखरप्रांतवर्तिना सशिलो-
च्चयः ॥ चंद्रेणाचलसाम्राज्यच्छत्रेणेव विराजते ॥ ११ ॥ स शै-

---

करूं इच्छित नाहीं, सर्व पर्वतांपेक्षां ह्या पर्वताचें अलौकिक सौंदर्य होतें एवढें सांगतों ह्मणजे झालें. (६) हें मात्र सांगतों कीं, हा सुंदर पर्वत कोणत्या शोभेमुळें अलौकिक सौंदर्य पावला व त्यामुळें शिवपार्वतींनीं त्यावर नेहमीं राहावें अशी त्यास योग्यता आली? (७) आणि ह्मणूनच श्रीशंकरानें पार्वतीच्या मर्जीकरितां कैलास पर्वत सोडून हा मंदरपर्वतच बायकामुलांचें नेहमीं राहण्याचें स्थान केलें. (८) त्या मंदरपर्वताच्या मध्यभागीं अनेक प्रकारचे दगड आणि झाडें आहेत आणि ते दगड आणि तीं झाडें शिवपार्वतींचा त्यांस नेहमीं सहवास झाल्यानें सर्व जगांस अगदीं तुच्छ मानतात आणि आपणास कृतार्थ मानतात. (९) शंकरपार्वतीस जलक्रीडा करण्यासआणि प्यावयास स्वच्छ पाणी मिळावें ह्या उद्देशानें त्या पर्ततावर अतिशय स्वच्छ आणि थंडगार पाण्याचे प्रवाह चोहोंकडे वाहतात. (१०) त्यांवरून मनास असा भास होतो कीं, ह्या पर्वताचें पुण्य उदयास येऊन हा मंदरपर्वत सर्व पर्वतांचा राजा ह्मणून त्यास राज्याभिषेकच होतो आहे कीं काय? (११) रात्रीं ह्या मंदरपर्वताच्या शिखरावर दोनप्रहर रात्रीचे सुमारास चंद्र येतो त्यामुळें ह्या पर्वताचें सार्वभौम राज्य अचळ असल्यामुळें त्यावर स्वच्छ छत्र धरल्यासारखें दिसतें. (१२) त्या पर्वतावर चमरमृगी

लश्चंचलीभूतैर्वालैश्चमरयोषिताम् ॥ सर्वपर्वतसाम्राज्यचामरैरिव वीज्यते ॥ १२ ॥ प्रातरभ्युदिते भानौ भूधरो रत्नभूषितः ॥ दर्पणे देहसौभाग्यं द्रष्टुकाम इव स्थितः ॥ १३ ॥ कूजाद्विहंगवाचालैर्वातोध्दूतलताभुजैः ॥ विमुक्तपुष्पैः सततं व्यालंबिस्मृदुपल्लवैः ॥ १४ ॥ लताप्रतानजटिलैस्तरुभिस्तापसैरिव ॥ जयाशिषा सहाभ्यर्च्य निषेव्यत इवाद्रिराट् ॥ १५ ॥ अधोमुखैरूर्ध्वमुखैः शृंगैस्तिर्यङ्मुखैरपि ॥ प्रपतन्निव पाताले भूपृष्ठादुत्पतन्निव ॥१६॥ परीत्य सर्वतो दिक्षु भ्रमन्निव विहायसि ॥ पश्यन्निव जगत्सर्वं नृत्यन्निव निरंतरम् ॥ १७ ॥ गुहामुखैः प्रतिदिनं व्यात्तास्यैर्वि-

---

पुष्कळ आहेत त्या आपलीं शेपटें पाठीवर घेऊन चोहोंकडे पळतात तेव्हां त्या सर्वजण ह्या पर्वतावर चवऱ्याच वारतात कीं काय असें वाटतें. ( १३ ) सकाळीं पूर्वदिशेकडे जेव्हां सूर्य उगवतो तेव्हां ह्या पर्वतानें आपलें सौंदर्य पाहण्याकरितां आपल्या हातांत रत्नाचा आरसा घेतला आहे कीं काय असा भास होतो. ( १४ ) ह्या पर्वतावरील झाडांवर बसून पांखरें अनेक मंजुळ मंजुळ शब्द करितात. वारा सुटला ह्मणजे त्या झाडांच्या फांद्या हालतात. व त्या झाडांचीं फुलें खालीं गळून पडतात, व त्या झाडांचीं कोंवळीं कोंवळीं पानें खालीं लोंबूं लागतात, ( १५ ) त्या झाडांस सभोंवतीं अनेक वेलींचीं जाळें गुंडाळलेलीं असतात तीं जटांप्रमाणें शोभतात त्यामुळें तपस्वीलोक ह्या पर्वतश्रेष्ठाला हात वर करून तुझा सर्वदा जयजयकार असो असा आशीर्वाद देतात असें वाटतें. ( १६ ) ह्या पर्वताला ज्या पुष्कळ गुहा आहेत त्यांत कितीएकांचीं खालीं तोंडें आहेत कितीएकांचीं वर तोंडें आहेत, कितीएकांचीं वांकडीं तोंडें आहेत, त्यामुळें हा पर्वत कोठें कोठें पाताळांत उडी घालतो आहे असें दिसतें, कोठें कोठें तर नुकतां जमीनींतूनच वर आल्यासारखा दिसतो. ( १७ ) कोठें कोठें आकाशमार्गानें सर्व दिशांत फिरतो आहे असें दिसतें, व कोठें कोठें तर हा पर्वत सर्व जगाचें सौंदर्य पाहून आपल्यापेक्षां कोणीही श्रेष्ठ नाहीं असें समजून आत्यामुळें अत्यानंदानें नाचतो आहे असें दिसतें. ( १८ ) कोठें कोठें

पुलोदरैः ॥ अजीर्णलावण्यतया जृंभामिव सदाचरन् ॥ १८ ॥
ग्रसन्निव जगत्सर्वं पिबन्निव पयोनिधिम् ॥ वमन्निव तमोऽन्तः-
स्थमदन्निव खमंबुदैः ॥ १९ ॥ निवासभूमयस्तास्ता दर्पणप्रतिमो-
दराः ॥ तिरस्कृतातपस्निग्धाश्रमच्छायामहीरुहाः ॥ २० ॥ सरि-
त्सरस्तटाकादिसम्पर्कशिशिरानिलाः ॥ तत्र तत्र निषण्णाभ्यां शि-
वाभ्यां सफलीकृताः ॥ २१ ॥ तमिमं पर्वतश्रेष्ठं स्मृत्वा साम्ब-
स्त्रियम्बकः ॥ रैभ्याश्रमसमीपस्थश्चान्तर्धानं गतो ययौ ॥ २२ ॥
तत्रोद्यानमनुप्राप्य देव्या सह महेश्वरः ॥ रराम रमणीयासु

---

ह्या पर्वताच्या गुहांचा आंत विस्तार मोठा असून नेहमीं त्यांचीं तोंडें उघडीं असतात त्यामुळें हा पर्वत आपल्या सौंदर्याचें आपणास अजीर्ण झाल्यानें स्वतः वरचेवर तोंड उघडून जांभळ्या देतो आहे असें वाटतें. ( १९ ) कोठें कोठें ह्या पर्वताचा विस्तार इतका आहे कीं, त्यामुळें हा सर्व त्रैलोक्य व्यापून टाकितो आहे असें वाटतें कोठें कोठें समुद्रास पिऊन टाकण्यास तयार झाल्यासारखा दिसतो व हा पर्वत आकाशापर्यंत वर गेल्यामुळें आभाळांसहित आकाशाला खातो कीं, काय ? असा भास होत असे. ( २० ) त्या पर्वतावर राहण्याचीं जितकीं कांहीं स्थळें आहेत तितकीं सर्व आरशाच्या प्रतिबिंबासारखीं स्वच्छ दिसतात. आश्रमाजवळ दाट सावली असणारीं झाडें इतकीं आहेत त्याखालीं बसणाऱ्यांस उन्हाचा त्रास काडीमात्र देखील भासत नाहीं. ( २१ ) त्या पर्वतावर नद्यांवरून सरोवरांवरून आणि तडागावरून वाहणारे थंडगार वारे त्या त्या ठिकाणीं विश्रांति घेण्याकरितां बसलेल्या शिवपार्वतींस सुख देऊन कृतार्थ झाले आहेत. ( २२ ) त्या पर्वताचीं मनांत आठवण होतांच तीन नेत्र असणारे महादेव रैभ्यऋषीच्या आश्रमाजवळ गुप्त झाल्याबरोबर तेथून ह्या मंदरपर्वतावरच आले. ( २३ ) त्या मंदरपर्वतावर आल्यावर महेश्वर पार्वतीस बरोबर घेऊन एका सुंदर बागेंत गेले व त्या बागेंत अतिशय सुंदर अशा बायकांनीं राहण्यासारख्या सोईच्या जागा होत्या त्यांत राहून सुखानें कालक्रमणा करूं लागले.

दिव्यान्तःपुरभूमिषु ॥ २३ ॥ तथा गतेषु कालेषु विवृद्धासु प्रजासु च ॥ दैत्यौ शुंभनिशुंभाख्यौ भ्रातरौ सम्बभूवतुः ॥ २४ ॥ ताभ्यां तपोबलाद्दत्तं ब्रह्मणा परमेष्ठिना ॥ अवध्यत्वं जगत्यस्मिन्पुरुषैरखिलैरपि ॥ २५ ॥ अयोनिजा तु या कन्या अम्बिकांशसमुद्भवा ॥ अजातपुंस्पर्शरतिरविलंघ्यपराक्रमा ॥ २६ ॥ तयास्तु नौ वधः संख्ये तस्यां कामाभिभूतयोः ॥ इतिचाभ्यर्थितो ब्रह्मा ताभ्यां प्रा तथास्त्विति ॥ २७ ॥ ततःप्रभृति शक्रादीन्विजित्य समरे सुरान् ॥ निःस्वाध्यायवषट्कारं जगच्चक्रतुरक्रमात् ॥ २८ ॥ तयोर्वधाय देवेशं ब्रह्माभ्यर्थितवान्पुनः ॥ विनिन्द्यापि रहस्यम्बां

---

( २४ ) शिवपार्वती त्या मंदरपर्वतावरील बागेंत राहून सुखानें कालक्रमणा करूं लागले व प्रजांचीही वृद्धि पुष्कळ झाल्यावर पुढें अनेक काळ लोटल्यावर शुंभ आणि निशुंभ नांवाचें दोन दैत्य भाऊ भाऊ जन्मास आले ( २५ ) त्यांनीं मोठी खडतर तपश्चर्या करून ब्रह्मदेवास प्रसन्न करून घेतले आणि आपणास ह्या त्रैलोक्यांत कोणत्याही पुरुषापासून मरण नसावें असा वर मिळविला. ( २६ ) आणि बायकोच्या हातानें मरण आलें तरी ती बायको योनीपासून जन्मास आलेली नसावी ती मुलगी पार्वतीच्या अंशानें जन्मलेली असावी, तिला पुरुषाचा स्पर्श देखील कधीं झालेला नसावा व ती मोठी अलौकिक पराक्रमाची असावी. ( २७ ) तिच्यावर आमचें प्रेम बसून आह्मीं तिची इच्छा करूं तेव्हां तिचे हातानें आह्मांस मरण यावें अशी त्या दोघांनीं अनेक अडचणी ठेवून वर मागितला व तितक्याही अडचणी मान्य करून बरें आहे तसेंच होईल असा ब्रह्मदेवानें त्या दोघांस वर दिला. ( २८ ) तेव्हांपासून त्या दोघां दैत्यांनीं इंद्रादिक मुख्य मुख्य देवांस जिंकून कोठें वेदाध्ययन होईल व कोठें वषट्कार [ यज्ञयाग ] वगैरे स्वस्थपणें कोणी न करतील अशा तऱ्हेनें सर्व जगास अगदीं त्रासवून सोडिलें. (२९) त्या दोघां दैत्यांचा पराभव करण्याकरितां ब्रह्मदेवानें श्रीशिवाची पुनः प्रार्थना केली कीं, तुह्मी एकांतांत पार्वतीचा अपमान करून तिला ज्या

क्रोधयित्वा यथा तथा ॥ २९ ॥ त्वद्वर्णकोशजां शक्तिमकामां कन्यकात्मिकाम् ॥ निशुम्भशुम्भयोर्हन्त्रीं सुरेभ्यो दातुमर्हसि ॥ ३० ॥ एवमभ्यर्थितो धात्रा भगवान्नीललोहितः ॥ कालीत्याह रहस्यम्बां निन्दयन्निव सस्मितः ॥ ३१ ॥ ततः क्रुद्धतरा देवी सुवर्णावर्णकारणात् ॥ स्मयन्ती चाह भर्तारमसमाधेयया गिरा ॥ ३२ ॥ देव्युवाच ॥ ईदृशे मम वर्णेऽस्मिन्न रतिर्भवतोऽस्ति चेत् ॥ एतावन्तं चिरं कालं कथमेषा नियम्यते ॥ ३३ ॥ अरुच्या वर्तमानोऽपि कथं च रमसे मया ॥ नह्यशक्यं जगत्यस्मिन्नीश्वरस्य तव प्रभो ॥ ३४ ॥ स्वात्मारामस्य भवतो रतिर्न सुखसाधनम् ॥ इति हेतोः स्मरो यस्मात्प्रसभं भस्मसात्कृतः ॥ ३५ ॥ या

---

रीतीनें राग येईल असें करा. ( ३० ) आणि तिच्या वर्णापासून [ स्वरूपापासून ] उत्पन्न होणारी निष्काम स्वभावाची कन्यास्वरूपी शक्ति शुंभ आणि निशुंभ ह्या दोन दैत्यांस मारावयाकरितां ह्या देवांस तुह्मी मिळवून ध्या. ( ३१ ) अशी ब्रह्मदेवानें परमेश्वर श्रीशिवाची प्रार्थना केल्यावर नीललोहित भगवान् श्रीशंकरानें एकेवेळीं एकांतांत हंसत हंसत पार्वतीस चिडविण्याच्या उद्देशानें तिला काली अशा नांवानें हांक मारिली. ( ३२ ) आपण स्वरूपानें सुंदर असतां आपणास मुद्दाम शंकरानें काली [ काळी ] अशा नांवानें हांक मारलेली पाहून पार्वतीस फार राग आला, व ती आश्चर्यचकीत होऊन श्रीशिवास कठोर अशा शब्दांनीं बोलूं लागली. देवी ह्मणाली ( ३३ ) माझें स्वरूप इतकें सुंदर असूनही तुह्माला जर तें आवडत नव्हतें तर इतके दिवसपर्यंत ही गोष्ट कां झांकून ठेविली ? ( ३४ ) तुझी जर मजवर वास्तविक प्रीति नाहीं व मी तुझी नावडती बायको आहें तर तूं माझ्याबरोबर क्रीडा तरी कशी करितोस ? हे परमेश्वरा, तूं स्वतः ईश्वर असल्यामुळें ह्या जगांत तुला कोणतीही गोष्ट करणें अशक्य नाहीं. ( ३५ ) तूं स्वतः आत्माराम ( आपल्यांतच आपण रममाण होणारा असा ) आहेस. तुला विषयसुखाची मनापासून गोडी नाहीं हेंच खरें आणि ह्मणूनच तूं मुद्दाम मागें मदनास जाळून त्याची राख केलीस. ( ३६ ) जी

च नाभिरता भर्तुरपि सर्वांगसुंदरी ॥ सा वृथैव हि जायेत सर्वैरपि गुणान्तरैः ॥ ३६ ॥ भर्तुर्भोगैकशेषो हि सर्ग एवैष योषिताम् ॥ तथासत्यन्यथाभूता नारी कुत्रोपयुज्यते ॥ ३७ ॥ तस्माद्वर्णमिमं त्यक्त्वा त्वया रहसि निन्दितम् ॥ वर्णान्तरं भजिष्ये वा न भविष्यामि वा स्वयम् ॥ ३८ ॥ इत्युक्त्वोत्थाय शयनाद्देवी रोषात्सगद्गदम् ॥ ययाचेऽनुमतिं भर्तुस्तपसे कृतनिश्चया ॥ ३९ ॥ तथा प्रणयभंगेन भीतो भूतपतिः स्वयम् ॥ पादयोः प्रणमन्नेव भवानीं प्रत्यभाषत ॥ ४० ॥

ईश्वर उवाच ॥ अजानतीव क्रीडोक्तिं प्रिये किं कुपिताऽसि

---

बायको आपल्या नवऱ्यास आवडत नसेल ती सर्व अवयवांनीं सुंदर जरी असली तरी तिचा जन्म निरर्थक आहे, तिचे अंगीं दुसरे चांगले गुण पुष्कळ असले तरी त्यांचा कांहींएक उपयोग नाहीं. ( ३७ ) स्त्रीजन्माचा मुख्य उपयोग हाच आहे कीं, तिच्या पतीची तिजवर प्रीति असावी आणि तिचा त्यानें मनास वाटेल तसा उपभोग ( विषयसुख ) घ्यावा हें जर होत नसेल तर त्या स्त्रीचा जन्म व्यर्थ आहे, तिचा कोठेंही उपयोग होत नाहीं. (३८) ह्यासाठीं माझ्या स्वरूपाच्या काळेपणाची एकांतांत जी निंदा केलीस तो काळेपणा टाकून देऊन मी सुस्वरूप अशी बायको होईन आणि कदाचित् नाहीं झालें तर मी पुनः तुला तोंड दाखविणार नाहीं ( जिवंत राहणार नाहीं. ) ( ३९ ) असें बोलून पार्वती रागारागानें ह्यांतरुणावरून उठली व तिचा गळा दाटून येऊन ती सद्गदित कंठानें तपश्चर्येस जाण्याच्या निश्चयानें श्रीशिवाची आज्ञा मागूं लागली. ( ४० ) आगण पार्वतीचें मन विनाकारण दुखविलें ह्मणून परमेश्वर श्रीशिवास मोठें वाईट वाटलें व हिची आणि आपली तुटातुट होणार ह्मणून भयही वाटलें, आणि त्या भयानें श्रीशिव पार्वतीच्या दोन्ही पायावर आपलें डोकें ठेवून ह्मणालें.

शिव ह्मणाले:-(४१) हे आवडते पार्वति, ुला थट्टेचें बोलणें अगदींच समजत नाहीं असें वाटतें, तूं मजवर कां रागावलीस?

मे ॥ रतिः कुतो वा जायेत त्वत्तश्चेदरतिर्मम ॥ ४१ ॥ माता त्वमस्य जगतः पिताहमधिपस्तथा ॥ कथं तदुपपद्येत त्वत्तो नाभिरतिर्मम ॥४२॥ आवयोरतिकामोऽपि किमसौ कामकारितः ॥ यतः कामसमुत्पत्तेः प्रागेव जगदुद्भवः ॥ ४३ ॥ पृथग्जनानां रतये काक्षात्मा कल्पितो मया ॥ ततः कथमुपालब्धः कामदाहादहं त्वया ॥ ४४ ॥ मम त्रिदशसामान्यं मन्यमानो मनोभवः ॥ मनाक्परिभवं कुर्वन्मया वै भस्मसात्कृतः ॥ ४५ ॥ विहारोऽप्यावयोरस्य जगतस्त्राणकारणात् ॥ ततस्तदर्थं त्वय्यद्य क्रीडोक्ति कृतवानहम् ॥ ४६ ॥ स चायमचिरादर्थस्तवैवाविष्करिष्यते ॥

---

तुझ्यापासून जर मला सुख लागणार नाहीं तर मग मला जगांत दुसरीकडे सुख कोठें लागणार आहे ? ( ४२ ) तूं स्वतः ह्या सर्व त्रैलोक्याची माता आहेस, आणि मी ह्या त्रैलोक्याचा पिता आहे आणि धनी आहे. तुझ्यावर माझें प्रेम नाहीं हें ह्मणणें शोभेल तरी कसें ? तुजवर माझें प्रेम आहेच आहे. ( ४३ ) आपण आजपर्यंत जें अतिशय विषयसुख घेतलें हें काय विषयसुखाच्या नादीं लागून घेतलें, असें तुला वाटतें काय ? कां तर ह्या मदनाच्या जन्माच्या अगोदरच सृष्टि उत्पन्न झाली आहे. मदनानें सर्व सृष्टि उत्पन्न केली असें मुळींच नाहीं. ( ४४ ) अज्ञान लोकांस सुख लागावें ह्मणून मीं हा मदन उत्पन्न केला. असें असतां मीं मदनास जाळून टाकिलें ह्मणून तूं माझी निंदा कां करित्येस ? ( ४५ ) जसे इतर दुसरे देव, आहेत त्यांसारखेच मदनानें मला मानलें व माझा पराभव करावयाचा तो प्रयत्न करूं लागला, त्या रागानें मी त्यास जाळून टाकिलं. मदनास जाळून टाकण्यांत ह्यापेक्षां दुसरा माझा कोणताही हेतु नव्हता. ( ४६ ) आपण दोघे जे कांहीं विलास करितों ते सर्व त्रैलोक्याचें कल्याण व्हावें ह्मणून करितों, आणि त्या करितांच तुझी आतां मी थट्टा केली ( ४७ ) मी तुला काली ह्मणण्याचा वास्तविक हेतु काय

क्रोधेनालं मुधानेन त्वन्निष्ठं किं न वेत्सि माम् ॥ ४७ ॥ इत्येव-मनुनीतापि भर्त्रा गिरिवरात्मजा ॥ कालीति विप्रियं वाक्यं त्वदि-कृत्वेदमब्रवीत् ॥ ४८ ॥

देव्युवाच ॥ श्रुतपूर्वा हि भगवंस्तव चाटूक्तयो मया ॥ याभिरेवमधीराहमितः प्रागपि वंचिता ॥ ४९ ॥ प्राणानप्यप्रिया भर्तुर्नारी या न परित्यजेत् ॥ कुलांगनासु मा सद्भिः कुत्सितैव हि गण्यते ॥ ५० ॥ भूयसी च तवाप्रीतिरगौरामिति मे वपुः ॥ क्रीडोक्तिरपिकालीति घटते कथमन्यथा ॥ ५१ ॥ सद्भिर्विगर्हितं तस्मात्स्त्रीषु कार्ष्ण्यमसत्कृतम् ॥ अनुत्सृज्य तपोयोगात्स्थातुमेवेह

---

आहे तो तुझा तुलाच आपोआप लवकर समजेल. व्यर्थ तूं मजवर रागाऊं नकोस, मी तुझ्यावर मनापासून प्रेम करितों ही गोष्ट तुला माहीत नाहीं काय? ( ४८ ) अशा रीतीनें श्रीशिवांनीं त्या पर्वत-कन्येची ( पार्वतीची ) पुष्कळ समजूत घातली परंतु, पार्वतीचें समाधान झालें नाहीं व शिवानीं आपणास निंदा करण्याचे उद्देशानें उच्चारलेला काली असा शब्द मनांत धरून ती शिवास पुनः ह्मणूं लागली.

पार्वती ह्मणाली:–( ४९ ) परमेश्वरा तुझ्या ह्या गोडीगुलाबीच्या गोष्टी पूर्वीं मीं अनेक वेळ ऐकिलेल्या आहेत. मी मोठी भित्री बायको आहे, आणि ह्यामुळें तूं मला अशा रीतीनें अनेक वेळ फसविलें आहेस. ( ५० ) जी बायको नवऱ्याची नावडती आहे तरी ती आपला प्राणत्याग करीत नाहीं त्या बायकोस चांगले लोक पतिव्रता बायकांत गणीत नाहींत ती वाईट चालीची आहे ह्मणूनच ती नवऱ्यास आवडत नाहीं असें समजतात. ( ५१ ) तुझीही मजवर पुष्कळच अवकृपा असल्यासारखी दिसते ह्मणून तूं मला थट्टेनेंच कां होईना मी खरोखर काळी आहे ह्मणून "काली" असें ह्मणालास नाहींपेक्षां, असें ह्मणाला नसतास. ( ५२ ) स्त्रियांच्या आंगीं काळेपणा असणें हा मोठा दुर्गुण आहे असें ज्ञानी लोक मानतात. स्त्री स्वरूपानें काळी असणें चांगले नाहीं. ह्यासाठीं मी तपश्चर्या

नोत्सहे ॥ ५२ ॥

देव उवाच ॥ यद्येवं व्यवसायस्ते तपसा किं प्रयोजनम् ॥ ममेच्छया स्वेच्छया वा वर्णांतरवती भव ॥ ५३ ॥

देव्युवाच ॥ नेच्छामि भवतो वर्णं स्वयं वा कर्तुमन्यथा ॥ ब्रह्माणं तपसाराध्य ततो गौरी भवाम्यहम् ॥ ५४ ॥

ईश्वर उवाच ॥ मत्प्रसादात्पुरा ब्रह्मा ब्रह्मत्वम्प्राप्तवान्परम्॥ तमाहूय महादेवि तपसा किं करिष्यसि ॥ ५५ ॥

देव्युवाच ॥ त्वत्तो लब्धपदा एव सर्वे ब्रह्मादयः सुराः ॥ तथाप्याराध्य तपसा ब्रह्माणं त्वन्नियोगतः ॥ ५६ ॥ पुरा किल

---

करून तो माझा काळेपणा नाहींसा होईल असा प्रयत्न करितें आतां मला येथें राहावें असें वाटत नाहीं.

शिव ह्मणालेः–(५३) असाच जर तुझा निश्चय असेल तर तुला तपश्चर्या करूनच काय करावयाचें आहे? माझे इच्छेनेंच किंवा तूं आपल्या स्वतःच्या इच्छेनेंच सुस्वरूप अशी हो ह्मणजे झालें.

पार्वती ह्मणालीः–(५४)महाराज, तुमच्या इच्छेनें (आशीर्वादानें) मी सुस्वरूप व्हावें असें मला वाटत नाहीं किंवा माझ्या अलौकिक शक्तीनें माझी मीच सुस्वरूप व्हावें असेंही मला वाटत नाहीं. मी अगोदर तपश्चर्या करून ब्रह्मदेवाचें आराधन करीन आणि तो प्रसन्न झाल्यावर त्याचे कृपेनें गौरी ( सुस्वरूप ) अशी होईन.

शिव ह्मणालेः–( ५५ ) ( महादेवि ) पार्वति, माझ्या कृपेनें पूर्वी ब्रह्मदेवास ब्रह्मपद मिळालें आहे मग त्याची आराधना करण्यासाठीं तूं तपश्चर्या कशाला करितेस ? ब्रह्मदेव कांहीं माझ्यापेक्षां श्रेष्ठ नाहीं.

पार्वती ह्मणालीः–( ५६ ) ब्रह्मदेव वगैरे सर्व देव तुझ्या कृपेनेंच ऐश्वर्य पावले आहेत ही गोष्ट खरी आहे मी नाहीं ह्मणत नाहीं, परंतु, तुझ्या आज्ञेनें मी ब्रह्मदेवाची आराधना करीन. ( ५७ ) पूर्व-

सती नाम्ना दक्षस्य दुहिताऽभवम् ॥ जगतां पतिमेव त्वां पतिं प्राप्तवती तथा ॥ ५७ ॥ एवमद्यापि तपसा तोषयित्वा पितामहम् ॥ गौरीभवितुमिच्छामि को दोषः कथ्यतामिह ॥ ५८ ॥ एवमुक्तो महादेव्या महादेवः स्मयन्निव ॥ न तां निर्बंधयामास देवकार्यचिकीर्षया ॥ ५९ ॥ ततः प्रदक्षिणीकृत्य पतिमंबा पतिव्रता ॥ नियम्य च वियोगार्तिं जगाम हिमवद्गिरिम् ॥ ६० ॥ तपः कृतवती पूर्वं देशे यस्मिन्सखीजनैः ॥ तमेव देशं वृणुयात्तपसे प्रणयात्पुनः ॥ ६१ ॥ ततः स्वपितरं दृष्ट्वा मातरं च तयोर्गृहे ॥ प्रणम्य वृत्तं विज्ञाप्य ताभ्यां चानुमता सती ॥ ६२ ॥ पुनस्तपोवनं गत्वा भूषणानि विसृज्य च ॥ स्नात्वा तपस्विनीवे-

---

जन्मामध्यें मी दक्षप्रजापतीची सती नांवाची मुलगी होत्यें आणि त्या जन्मांत तूं त्रैलोक्यनाथ असल्यामुळें मी तुझी बायको झाल्यें. (५८) तशी आतांही ह्यावेळीं तपश्चर्या करून ब्रह्मदेवाची आराधना करीन आणि त्यास प्रसन्न करून घेऊन त्याचे कृपेनें गौरी [ सुस्वरूप ] अशी होईन असें केल्यास मला काय चिंता आहे? सांग. ( ५९ ) पार्वतीनें शिवास असें ह्मटल्यावर ते किंचित् हांसले आणि असें करण्यापासून देवांचा कार्यभाग होणार आहे असें त्यांस माहीत असल्यानें त्यांनीं तिला तूं असें करूं नकोच असा आग्रहही केला नाहीं. ( ६० ) नंतर त्या पतिव्रता पार्वतीनें शिवास प्रदक्षिणा घातली आणि शिवाचे वियोगामुळें आपणास सोसावें लागणारें दुःख तसेंच सहन करून ती हिमालयपर्वतावर गेली. ( ६१ ) आणि पूर्वीं ज्या ठिकाणीं आपण आपल्या मैत्रिणींबरोबर तपश्चर्या केली होती त्याच ठिकाणीं जाऊन आतां तपश्चर्या करावी असें तिनें मनांत आणलें. ( ६२ ) नंतर तिनें आपल्या पित्याचें [ हिमालयाचें ] आणि मातेचें [ मेनेचें ] दर्शन घेतलें आणि त्या दोघांस हें वर्तमान सांगून त्या दोघांचीही तपश्चर्या करण्याविषयीं संमति मिळविली. ( ६३ ) आणि मग तेथून तपोवनांत गेली व तेथें तिनें आपल्या आंगावरील अलंकार वगैरे काढून ठेविले आणि

षं कृत्वा परमपावनम् ॥ ६३ ॥ संकल्प्य च महत्तीव्रं तपः परमदुश्चरम् ॥ सदा मनसि सन्धाय भर्त्तुश्चरणपंकजम् ॥ ६४ ॥ तमेव क्षणिके लिंगे ध्यात्वा बाह्यविधानतः ॥ त्रिसन्ध्यमभ्यर्चयन्ती वन्यैः पुष्पैः फलादिभिः ॥ ६५ ॥ स एव ब्रह्मणो मूर्तिमास्थाय तपसः फलम् ॥ प्रदास्यति ममेत्येवं नित्यं मत्वा करोत्तपः ॥ ६६ ॥ तथा तपश्चरन्तीं तां काले बहुतिथे गते ॥ दृष्ट्वा कश्चिन्महाव्याघ्रो दुष्टभावादुपागमत् ॥ ६७ ॥ तथैवोपगतस्यापि तस्यातीव दुरात्मनः ॥ गात्रं चित्रार्पितमिव स्तब्धं तस्याः सकाशतः ॥ ६८ ॥ तं दृष्ट्वापि तथा व्याघ्रं दुष्टभावादुपाग-

---

स्नान करून तेथें अतिशय पवित्र असा तपस्विनीचा वेष तिनें घेतला. ( ६४ ) आतां आपण मोठें खडतर तप करावयाचें असा तिनें निश्चय केला आणि नेहमीं आपल्या पतीचें [ शिवाचें ] चरणकमल स्मरण करून ती दुर्धर तप करूं लागली. ( ६५ ) आणि एकक्षणपर्यंत लिंगाच्या ठिकाणीं पतीचें ध्यान करून त्यालिंगांत पतीचें आवाहन विधानपूर्वक करून त्रिकाल रानांत उगवणाऱ्या फुलांनीं व फळांनीं पूजा करूं लागली. ( ६६ ) तो परमेश्वर श्रीशंकरच ब्रह्मदेवाचें स्वरूप घेऊन मजकडे येईल आणि मी ज्या उद्देशानें तपश्चर्या करीत आहे त्या तपश्चर्येचें फळ मला देईल, असें मनांत नेहमीं समजून ती तपश्चर्या करूं लागली. ( ६७ ) अशा रीतीनें पार्वती तपश्चर्या करूं लागल्यानंतर पुष्कळ काळ लोटल्यावर तिला पाहून तिला खाऊन टाकावें म्हणून [ तिजविषयीं पापबुद्धि मनांत धरून ] तिजपाशीं कोणीएक मोठा वाघ आला. ( ६८ ) अशा रीतीनें तो तिजपाशीं आला व तो मोठा दुष्ट मनाचा होता खरा. तरी त्या पार्वतीच्या जवळ आल्याबरोबर त्याचें शरीर चित्रांतील आंगाप्रमाणें जागचे जागीं स्तब्ध राहिलें. त्यास इकडे तिकडे हालतांच येईना. ( ६९ ) तो वाघ वाईट उद्देशानें आपले जवळ आला तरी पार्वतीचें मन तिचे आंगीं अलौकिक

तम् ॥ न पृथग्जनवद्देवी स्वप्रभावेण विव्यधे ॥ ६९ ॥ स तु विष्टब्धसर्वांगो बुभुक्षापरिपीडितः ॥ ममामिषमितो नान्यदिति मत्वा निरन्तरम् ॥ ७० ॥ निरीक्ष्यमाणः सततं देवीमेव तदानिशम् ॥ अतिष्ठदग्रतस्तस्या उपासनमिवाचरन् ॥ ७१ ॥ देव्याश्च हृदये नित्यं ममैवायमुपासकः ॥ त्राता च दुष्टसत्वेभ्य इति प्रववृते कृपा ॥ ७२ ॥ तत एव कृपायोगात्सद्यो नष्टमलत्रयः ॥ बभूव स महाव्याघ्रो देवीं च बुबुधे तदा ॥ ७३ ॥ न्यवर्तत बुभुक्षा च तस्यांगस्तम्भनं तथा ॥ दौरात्म्यं जन्मसिद्धं च तृप्तिश्च समजायत ॥ ७४ ॥ तदा परमभावेन ज्ञात्वा कार्तार्थ्यमात्मनः ॥

---

सामर्थ्य असल्यामुळें इतर नीच मनुष्याप्रमाणें भ्यालें नाहीं. ( ७० ) त्या वाघाचें आंग तर जागचे जागीं खिळल्यासारखें झालें व त्यास भूक अतिशय लागल्यामुळें मला आतां पार्वतीचें शरीरच खाण्यास मिळेल भक्ष्याकरितां मला दुसरीकडे जावयास नको अशा समजुतीनें तो तिच्याकडेच नेहमीं टक लाऊन बसला. ( ७१ ) तो वाघ अहोरात्र तिच्यापुढें बसून तिच्याकडे सारखी नजर लाऊन बसल्यामुळें तो पार्वतीची उपासनाच करीत बसला आहे असा दिसला. ( ७२ ) पार्वतीला असें वाटलें कीं, हा वाघ माझीच नेहमीं उपासना करितो आहे व मला हिंसक जनावरांपासून पीडा होऊं नये ह्मणून माझी राखण करीत हा बसला आहे असें वाटून तिच्या मनांत त्या वाघाविषयीं दया आली. ( ७३ ) पार्वतीचे मनांत त्या वाघाविषयीं प्रेमभाव उत्पन्न होतांच लागलेच त्या वाघाच्या आणव, माया, कार्मिक ह्या तीन्ही मलांचा नाश होऊन त्याला ही महादेवी पार्वती आहे असें समजलें. ( ७४ ) त्याची भूक पार नाहींशी झाली, तसेंच त्याचें आंग जागचे जागीं खिळल्यासारखें झालें होते तें पूर्ववत् झालें त्याचा जन्मापासून असलेला दुष्ट स्वभाव मावळला व त्यास मोठें सुख झालें. ( ७५ ) नंतर त्यानें दूरवर विचार केल्यावर त्यास आपल्या जन्माचें सार्थक्य झालें असें वाटलें, व तो वाघ तेव्हांपासून खरोखरच तिचा

सत्योपासक एवैष सिषेवे परमेश्वरीम् ॥ ७५ ॥ दुष्टानामपि स-
त्वानां तथान्येषां दुरात्मनाम् ॥ स एव द्रावको भूत्वा विचचार
तपोवने ॥ ७६ ॥ तपश्च ववृधे देव्यास्तीव्रं तीव्रतरात्मकम् ॥ दे-
वाश्च दैत्यनिर्बन्धाद्ब्रह्माणं शरणं ययुः ॥ ७७ ॥ सोऽपि दैत्य-
वधासक्तः कृत्वा हेत्वाश्रयां कथाम् ॥ सामरस्त्वरितो ब्रह्मा ययौ दे
व्यास्तपोवनम् ॥७८॥ ददर्श च सुरश्रेष्ठः श्रेष्ठे तपसि निष्ठिताम् ॥
प्रतिष्ठामिव विश्वस्य भवानीं परमेश्वरीम् ॥ ७९ ॥ ननाम चास्य
जगतो मातरं स्वस्य चात्मनः ॥ रुद्रस्य च पितुर्भार्यामार्या-
मद्रीश्वरात्मजाम् ॥ ८० ॥ ब्रह्माणमागतं दृष्ट्वा देवी देवगणैः सह॥

---

भक्त असल्यासारखा तिची आराधना करूं लागला. ( ७६ ) पार्व-
तीला उपद्रव देण्याकरितां दुसरीं हिंसक जनावरें आलीं किंवा दुसरे
कोणी वाईट स्वभावाचे लोक आले तर तो वाघच त्यांस पळवून
लावी अशा रीतीनें तो तपोवनांत वागूं लागला. ( ७७ ) देवीचीही
दिवसेंदिवस फारच कडक तपश्चर्या होऊं लागली आणि त्याच वेळीं
शुंभनिशुंभाचा त्रास फारच अनिवार झाल्यामुळें सर्व देव अगदीं
त्रासून जाऊन ब्रह्मदेवास शरण आले. ( ७८ ) तेव्हां ब्रह्मदेवासही
वाटलें कीं, आतां शुंभनिशुंभास मारलेच पाहिजे मग त्या दैत्यांचा
नाश होईल असा कांहीं उपाय योजिलाच पाहिजे असें सर्व देवांस
सांगून त्या सर्व देवांस बरोबर घेऊन ब्रह्मदेव पार्वती जेथें तपश्चर्या
करीत होती त्या तपोवनास आला. ( ७९ ) त्या ब्रह्मदेवानें तेथें
येऊन पाहिलें तों पार्वती एकाग्र मनानें तपश्चर्या करीत आहे. जिला
भवानी आणि परमेश्वरी अशीं नांवें आहेत व सर्व जग उत्पन्न करण्यास
तीच मूलकारण आहे. ( ८० ) ती पार्वती सर्व जगाची आदिमाता
आहे तशी आपलीही माता आहे, श्रीशंकर आपला पिता आहे त्याची ही
स्त्री आहे तिचा स्वभाव फार उदार असून ती पर्वतश्रेष्ठ हिमालय
ह्याची मुलगी आहे अशा त्या पार्वतीला पाहतांच ब्रह्मदेवानें साष्टांग
नमस्कार घातला. ( ८१ ) ब्रह्मदेव सर्व देव बरोबर घेऊन अ-

अर्घ्यं तदर्हं दत्वास्मै स्वागताद्यैरुपाचरत् ॥ ८१ ॥ तां च प्रत्युपचारोक्तिं पुरस्कृत्याभिनन्द्य च ॥ पप्रच्छ तपसो हेतुमजानन्निव पद्मजः ॥ ८२ ॥

ब्रह्मोवाच ॥ तीव्रेण तपसानेन देव्या किमिह साध्यते ॥ तपःफलानां सर्वेषां त्वदधीना हि सिद्धयः ॥ ८३ ॥ यश्चैव जगतां भर्ता तमेव परमेश्वरम् ॥ भर्तारमात्मना प्राप्य प्राप्तं च तपसः फलम् ॥ ८४ ॥ अथवा सर्वमेवैतत्क्रीडाविलसितं तव ॥ इदन्तु चित्रं देवस्य विरहं सहसे कथम् ॥ ८५ ॥

देव्युवाच ॥ सर्गादौ भवतो देवादुत्पत्तिः श्रूयते यदा ॥

---

पल्या भेटीस आला आहे असें पाहतांच त्या पार्वतीनें ब्रह्मदेवास योग्य असें अर्घ्य त्याला देऊन आपण आलां फार चांगलें झालें वगैरे गोड गोड बोलून त्याचें आदरातिथ्य केलें. ( ८२ ) पार्वतीनें आपला आदरसत्कार केला त्यामुळें ब्रह्मदेवास मोठा आनंद झाला व त्य आदरसत्कारावद्दल त्यानें पार्वतीचे फार आभार मानून जसें कांहीं आपणास ह्यांतील कांहीं माहीतच नाहीं अशा रीतीनें ब्रह्मदेव तिला तपश्चर्या करण्याचें कारण काय ? ह्मणून विचारूं लागला.

ब्रह्मदेव ह्मणाला:-( ८३ ) हे महेश्वरि तुला असे दुर्धर तप करून काय मिळवावयाचें आहे ? कां तर तूं स्वतःच परमेश्वरी असल्यामुळें सर्व प्रकारच्या तपःफलांच्या सिद्धि तुझ्या स्वाधीनच आहेत. ( ८४ ) जो श्रीशंकर सर्व जगाचा अधिपति आहे त्या शंकरालाच तूं आपला पति केला आहेस त्यामुळें तपाचें फळ मिळालेंच आहे. ह्यापेक्षां तप करून श्रेष्ठ पद काय मिळवावयाचें राहिलें ? ( ८५ ) हें फक्त तुझें मौजेचें खेळणें असल्यासारखें आहे परंतु मला मोठें आश्चर्य असें वाटतें कीं, तूं शिवाचा विरह सहन करून तप करीत इतके दिवस येथें कशी राहिलीस ?

पार्वती ह्मणाली:—( ८६ ) ब्रह्मदेवा, मीं असें ऐकिलें आहे कीं, सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वीं तूं अगोदर उत्पन्न झालास, तूं सर्व

तदा प्रजानां प्रथमस्त्वं मे प्रथमजः सुतः ॥ ८६ ॥ यदा पुनः प्रजावृद्धौ ललाटाद्भवतो भवः ॥ उत्पन्नोऽभूत्तदा त्वं मे गुरुः श्वशुरभावतः ॥ ८७ ॥ यदा चायं गिरीन्द्रस्ते पुत्रो मम पिता स्वयम् ॥ तदा पितामहस्त्वं मे जातो लोकपितामह ॥ ८८ ॥ तदीदृशस्य भवतो लोकयात्राविधायिनः ॥ वृत्तमन्तःपुरे भर्त्रा कथयिष्ये कथं पुनः ॥ ८९ ॥ किमत्र बहुना देहे यश्चायं मम कालिमा ॥ त्यक्त्वेमं त्वद्विधानेन गौरी भवितुमुत्सहे. ॥ ९० ॥

ब्रह्मोवाच ॥ एतावता किमर्थेन तीव्रं देवि तपः कृतम् ॥ स्वेच्छैव किमपर्याप्ता क्रीडेयं हि तवेदृशी ॥ ९१ ॥ क्रीडापि च

---

जगाच्या मूलारंभापासून आहेस, ह्मणून तूं माझा पहिला मुलगा आहेस. ( ८७ ) बरें पुढें पुनः जेव्हां प्रजेची वाढ करावयाची त्यावेळीं तुझ्या मस्तकापासून शंकर जन्मला त्याअर्थीं तूं माझा गुरु आणि मी स्वतः शंकराची स्त्री असल्यामुळें तूं माझा सासरा झालास. ( ८८ ) जेव्हां हा हिमालयपर्वत तुझा मुलगा आहे आणि मी त्याची मुलगी आहे तेंव्हां तूं माझा आजा झालास, व जसा तूं माझा अजा आहेस तसा सर्व लोकांचाही आजा आहेस. ( ८९ ) लोक जे कांहीं व्यवहार करितात ते व्यवहार तुझ्या प्रेरणेनेंच करितात, स्वतंत्रपणानें करीत नाहींत, असें वास्तविक प्रकार असतां माझ्या घरीं माझा आणि माझे पती [illegible] जो कांहीं वादविवाद झाला तो तुला काय सांगावयाचा आहे? तो तुला माहीतच आहे. ( ९० ) असो फार सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं माझ्या शरीरांत जो कांहीं हा काळेपणा आहे तो तुझ्या ह्या केलेल्या आराधनेनें नाहींसा करून गौरी व्हावयास इच्छिते दुसरी माझी कांहीं इच्छा नाहीं.

ब्रह्मदेव ह्मणालाः–( ९१ ) इतक्या क्षुल्लक गोष्टीकरितां देवी तूं इतकी दुर्धर तपश्चर्या कशासाठीं केलीस? ही गोष्ट तुझ्या इच्छेनेंच तुला करितां आली नसती काय? ही फक्त तुझी क्रीडा आहे हेंच खरें, ( ९२ ) हे जगज्जननि, तुझी क्रीडा जरी असली तरी ती लोकांचें क-

जगन्मातस्तव लोकहिताय वै ॥ अतो ममेष्टमनया फलं किमपि साध्यताम् ॥ ९२ ॥ निशुम्भशुम्भनामानौ दैत्यौ दत्तवरौ मया ॥ इमौ देवान्प्रबाधेते त्वत्तो लब्धस्तयोर्वधः ॥ ९३ ॥ अलं विलम्बनेनात्र त्वच्छलेन स्थिता तव ॥ शक्तिर्विसृज्यमानाद्य तयोर्मृत्युर्भविष्यति ॥ ९४ ॥ ब्रह्मणाभ्यर्थिता चैवं देवी गिरिवरात्मजा ॥ त्वक्कोशं सहसोत्सृज्य गौरी सा समजायत ॥ ९५ ॥ सा त्वक्कोशात्मनोत्सृष्टा कौशिकी नाम नामतः ॥ काली कालाम्बुदप्रख्या कन्यका समपद्यत ॥ ९६ ॥ सा तु मायात्मिका शक्तिर्योगनिद्रा च वैष्णवी ॥ शंखचक्रत्रिशूलादिसायुधाष्टमहाभुजा ॥ ९७ ॥ सौम्या घोरा च मिश्रा च त्रिनेत्रा चन्द्रशेखरा ॥ अजातपुंस्पर्श-

---

ल्याण व्हावें ह्याच हेतूनें होते निरर्थक होत नाहीं. ह्यासाठीं ह्या क्रीडेनें [ तूं तपश्चर्या केलीस त्याचे सहाय्यानें ] माझ्या मनांतील कांहीं तरी हेतु पूर्ण कर. ( ९३ ) निशुंभ आणि शुंभ नांवाचे दोन दैत्य आहेत त्यांस मी पूर्वी वर दिलेला असल्यामुळें ते उन्मत्त होऊन सर्व देवांस मनस्वी त्रास देत आहेत तुझ्या हातून आपणास मरण यावें अशी त्यांनीं विनंति केली व ती मी मान्य केली आहे. ( ९४ ) ह्यासाठीं आतां उशीर करूं नकोस तुझ्या मिषानें राहणारी तुझी शक्ति आतां बाहेर सोड ह्मणजे ती शक्ति त्या दोघांस जिवें मारील. ( ९५ ) ब्रह्मदेवानें अशी विनंति केल्याबरोबर ती पर्वतश्रेष्ठाची मुलगी पार्वती एकदम आपल्या आंगावरील कातडीचें आवरण काढून टाकून गोरी गोरी पान अशी झाली. ( ९६ ) पार्वतीनें आपली त्वचा [ आंगावरील कातडी ] टाकून दिली ती कौशिकी ह्या नांवानें प्रसिद्ध झाली. ती स्वरूपानें काळ्या ढगासारखी काळसर रंगाची मुलगी झाली. ( ९७ ) तीच मायास्वरूप शक्ति होय. किंवा विष्णूची योगनिद्रा ह्मटली तरी चालेल. तिला आठ हात असून प्रत्येक हातांत शंख चक्र, त्रिशूल वगैरे आयुधें होतीं ( ९८ ) तिचा आकार सौम्य ( शांत ) आणि क्रूर असा होता तसा कांहीं शांत कांहीं रागीट असाही होता, तिला तीन डोळे होते तिच्या मस्तकावर चंद्र होता. तिला पुरुषशरीराचा स्पर्श करण्याची आवड मु-

रतिरधृष्या चातिसुन्दरी ॥ ९८ ॥ दत्ता च ब्रह्मणे देव्या शक्ति-
रेषा सनातनी ॥ शुम्भस्य च निशुम्भस्य निहन्त्री दैत्यसिंहयोः
॥ ९९ ॥ ब्रह्मणापि प्रत्दृष्टेन तस्यै परमशक्तये ॥ प्रबलः केसरी
दत्तो वाहनत्वे समागतः ॥ १०० ॥ विन्ध्ये च वसतिं तस्याः
पूजां चासवपूर्वकैः ॥ मांसैर्मत्स्यैरपूपैश्च निर्वर्त्यासौ समादिशत्
॥ १०१ ॥ सा चैवं सम्मता शक्तिर्ब्रह्मणा विश्वकर्मणा ॥ प्रणम्य
मातरं गौरीं ब्रह्माणं चानुपूर्वशः ॥ १०२ ॥ शक्तिभिः स्वात्मतु-
ल्याभिः स्वात्मजाभिरनेकशः ॥ परीता प्रययौ विन्ध्यं दैत्येन्द्रौ
हन्तुमुद्यता ॥ १०३ ॥ निहतौ च तथा तत्र समरे दैत्यपुंगवौ ॥

---

ळींच नसून तिचा अपमान करण्याची कोणाचीं शक्ति नव्हेती, व ती स्वरूपानें फारच सुंदर होती. ( ९९ ) असो. ब्रह्मदेवाच्या विनंतीप्रमाणें पार्वतीनेंही अनादिकालापासून असणारी, सिंहासारखे पराक्रमी असणाऱ्या शुंभ निशुंभ नांवाच्या दोघां दैत्यांचा प्राणनाश करणारी शक्ति दिली. ( १०० ) पार्वतीनें आपल्या मनाप्रमाणें आपणास शक्ति दिली असें पाहून ब्रह्मदेवास फार संतोष झाला व त्यानें त्या श्रेष्ठ शक्तीस एक बलाढ्य सिंह अर्पण केला, तो सिंह तिनें आपलें वाहन, करण्याचे उपयोगास लाविला. ( १०१ ) विंध्याद्रीवर तिचें राहण्याचें स्थान केलें व मद्य, मांस, मत्स्य, तळलेले वगैरे अनेक पदार्थ अर्पण करून ब्रह्मदेवानें तिची पूजा केली. ( १०२ ) ह्याप्रमाणें सर्व स्थावरजंगमसृष्टीची घडामोड करणाऱ्या ब्रह्मदेवास मनापासून आवडणारी ती शक्ति गौरीस ( पार्वतीस ) आणि ब्रह्मदेवास क्रमाक्रमानें नमस्कार करून ( १०३ ) आपल्यासारख्या पराक्रमी, आपल्यापासून जन्मलेल्या अशा अनेक शक्तीस बरोबर घेऊन शुंभ निशुंभ नांवाच्या दोघां दैत्यांस मारण्याच्या तयारीनें विंध्यपर्वतावर गेली. ( १०४ ) व तेथें तिनें आपल्या बाणांनीं आणि आपलें सौंदर्य पाहून भुलल्यामुळें कामविकारानें

तद्बाणैः कामबाणैश्च च्छिन्नभिन्नांगमानसौ ॥ १०४ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥

---

घायाळ झालेले दोघे दैत्य शुंभनिशुंभ ह्या युद्धांत मारिले.

ह्याप्रमाणें श्रीशैवनांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेच्या पूर्वभागापैकीं एकविसावा अध्याय संपला.



## ॥ अथ द्वाविंशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ उत्पाद्य कौशिकीं गौरी ब्रह्मणे प्रतिपाद्य च ॥ तस्य प्रत्युपकाराय पितामहमथाब्रवीत् ॥ १ ॥

देव्युवाच ॥ दृष्टः किमेष भवता शार्दूलो मदुपाश्रयः ॥ अनेन दुष्टसत्त्वेभ्यो रक्षितं मे तपोवनम् ॥ २ ॥ मय्यर्पितमना एष भजते मामनन्यधीः ॥ अस्य संरक्षणादन्यत्प्रियं मम न विद्यते ॥ ३ ॥ भवितव्यमनेनातो ममान्तःपुरचारिणा ॥ गणेश्वरपदं चास्मै प्रीतो दास्यति शंकरः ॥ ४ ॥ एनमग्रेसरं कृत्वा सखीभिर्गन्तुमुत्सहे ॥ प्रदीयतामनुज्ञा मे प्रजानां पतिना त्वया ॥ ५ ॥ इत्युक्तः प्रहसन् ब्रह्मा देवीं मुग्धामिव स्मयन् ॥ तस्य तीव्रैः पुरावृत्तैर्दौरात्म्यं समवर्णयत् ॥ ६ ॥

---

श्रीशिवास नमस्कार असो. ( १ ) वायु ह्मणालाः—ऋषीश्वरहो, ह्याप्रमाणें पार्वतीनें ( गौरीनें ) कौशिकीस उत्पन्न करून ब्रह्मदेवास सांगून व त्या उपकाराच्या मोबदला ब्रह्मदेवापासून आपणास कांहींतरी मिळावा ह्या हेतूनें ती ब्रह्मदेवास ह्मणाली.

पार्वती ह्मणालीः— ( २ ) हे ब्रह्मदेवा, ही माझी उपासना ( आराधना, भक्ति ) करणारा वाघ तुह्मीं पाहिला काय ? ह्यानें दुष्ट हिंसक जनावरांपासून माझ्या तपोवनाचें रक्षण केलें. ( ३ ) हा वाघ माझ्यावर एकनिष्ठपणानें विश्वास ठेवून माझी सेवा करितो, तेव्हां ह्याचें सरंक्षण करण्यापलीकडे मला दुसरें कांहींएक नको आहे. ( ४ ) ह्या वाघानें माझे अंत:पुराचे द्वारपाल व्हावें असें मला वाटतें, आणि माझ्याकरितां श्रीशंकर प्रसन्न होऊन ह्याला गणेश्वराचें पदही देइल. ( ५ ) आतां परत जातांना मी ह्याला पुढें करून सखीबरोबर जाऊं इच्छितें, तूं सर्व त्रैलोक्याचा अधिपति आहेस तर मला असें करण्यास आज्ञा दे. ( ६ ) पार्वतीनें ब्रह्मदेवास असें ह्मटल्यावर ब्रह्मदेव जशी कांहीं अगदींच भोळी आहे असें समजून तिला हांसला आणि मग त्या वाघाचीं पूर्वीचीं क्रूरपणाचीं दुष्टकृत्यें तिला सांगूं लागला.

ब्रह्मोवाच ॥ क्वासौ देवि मृगः क्रूरः क्व तेऽनुग्रहः शुभः ॥ आशीविषमुखे साक्षादमृतं किं निषिच्यते ॥ ७ ॥ व्याघ्रमात्रं न खल्वेष दुष्टः कोऽपि निशाचरः ॥ अनेन भक्षिता गावो ब्राह्मणाश्च तपोधनाः ॥ ८ ॥ अपर्यन्ता यथाकामं कामरूपी चरत्यसौ ॥ अवश्यं खलु भोक्तव्यं फलं पापस्य कर्मणः ॥ ९ ॥ अतः किं कृपया कृत्यमीदृशेषु दुरात्मसु ॥ अनेन देव्याः किं कृत्यं प्रकृत्या कलुषात्मना ॥ १० ॥

देव्युवाच ॥ यदुक्तं भवता सर्वं तथ्यमस्त्वयमीदृशः ॥ तथापि मां प्रपन्नोऽभून्न सक्तो मामुपाश्रितः ॥ ११ ॥

ब्रह्मोवाच ॥ यस्य भक्तिमविज्ञाय प्राग्वृत्तं ते निवेदितम् ॥

---

( ७ ) ब्रह्मदेव ह्मणालाः— हे परमेश्वरि पार्वति, हा दुष्ट स्वभावाचा हिंसक रानटी पशु कोणीकडे ? आणि त्याचेवर तुझा हा अनुग्रह कोणीकडे? प्रत्यक्ष सापाच्या तोंडांत अमृत कोणी घालील काय? (८) हा खरोखरी साधच आहे असें नाहीं. हा दुष्ट कोणीएक राक्षस आहे. ह्यानें आजपर्यंत कितीएक गायी खाल्या आणि तपश्चर्या करणारे ब्राह्मण ( ९ ) आजपर्यंत ह्यानें असंख्यात खाल्ले, हा दुष्ट मनास वाटेल तसें रूप घेऊन मनास वाटेल तिकडे फिरत असतो. प्राण्यानें जें जें पाप केलें त्याचें फळ त्यानें अवश्य भोगलें पाहिजे. ( १० ) ह्यासाठीं ह्या वाघासारख्या दुष्ट प्राण्यावर दया करून काय करावयाचें आहे ? आणि ह्या कपटी स्वभावाच्या वाघानें देवीची अशी सेवा तरी काय केली आहे ?

( ११ ) पार्वती ह्मणालीः—ब्रह्मदेवा, तुह्मी सांगतां तें सर्व खरें जरी असलें आणि हा वाघ तसाच दुष्ट स्वभावाचा असला तरी ज्या अर्थी हा मला शरण आला आहे आणि माझ्या आश्रयास येऊन राहिला आहे त्याअर्थी ह्याला मला टाकतां येत नाहीं.

( १२ ) ब्रह्मदेव ह्मणालाः—देवि, पार्वति, ह्या वाघानें तुझ्याजवळ आल्यापासून तुझी भक्ति काय केली असेल तें मला माहित नाहीं

भक्तिश्चेदस्य किं पापैर्न ते भक्तः प्रणश्यति ॥ १२ ॥ पुण्यकर्मापि किं कुर्यात्त्वदीयाज्ञानपेक्षया ॥ आज्ञा प्रज्ञा पुराणी च त्वमेव परमेश्वरी ॥ १३ ॥ त्वदधीना हि सर्वेषां बन्धमोक्षव्यवस्थितिः ॥ त्वामृते परमां शक्तिं संसिद्धिः कस्य कर्मणः ॥ १४ ॥ त्वमेव विविधा शक्तिर्भावानामभवा स्वयम् ॥ अशक्तः कर्मकरणं कर्तावा किं करिष्यति ॥ १५ ॥ विष्णोश्च मम चान्येषां देवदानवरक्षसाम् ॥ तत्तदैश्वर्यसम्प्राप्तौ तवैवाज्ञा हि कारणम् ॥ १६ ॥ अतीताः खल्वसंख्याता ब्रह्माणो हरयो भवाः ॥ अनागतास्त्वसंख्यातास्त्वदाज्ञानुविधायिनः ॥ १७ ॥ त्वामनाराध्य देवेशि पु-

---

ह्याची पूर्वीची वागणूक कशी होती ती मीं तुला सांगितली इतकेंच. ह्यानें तुझी भक्तीच केली असेल, तर ह्याच्या पातकाशीं काय करावयाचें आहे? कांतर तुझा भक्त कधींही नाश पावत नाहीं. ( १३ ) एखादा मनुष्य मोठा पुण्यवान् असला आणि त्यानें जर तुझी आज्ञा पाळली नसेल, तर त्याच्या पुण्याचा तरी काय उपयोग आहे ? तुझी आज्ञा बुद्धीपेक्षां फारच जुनी ( वडील ) आहे आणि तूंच प्रत्यक्ष देवी आहेस. ( १४ ) सर्व प्राणिमात्रांच्या बंधमोक्षाची सर्व व्यवस्था तुझ्या स्वाधीन आहे, तुझ्याखेरीज जास्त शक्तिमान तरी कोण आहे ? आणि तुझ्या कृपेवांचून काम तरी कोणाचें शेवटास गेलें आहे? ( १५ ) तुला स्वतःला जन्म नाहीं, तूंच इच्छांची ( भावांची ) अनेक प्रकारची शक्ति आहेस, कर्म, करण ( साधन ) आणि कर्ता हे तिन्ही तुझ्या साहय्यावांचून अगदीं अशक्त आहेत, तुझें जर साह्य त्यांस नसेल तर त्यांच्या हातून काय होणार आहे ? ( १६ ) विष्णूला, मला आणि दुसऱ्या कोणाला, मग ते देव असोत, दैत्य असोत, किंवा राक्षस असोत, त्यांस त्यांचें त्यांचें स्थान मिळवून देण्यास तुझीच आज्ञा कारण आहे, तुझी आज्ञा नसेल तर कोणाचें कोणतेंही कृत्य होणार नाहीं. ( १७ ) तुझ्या आज्ञेप्रमाणें वर्तन करणारे ब्रह्मदेव, विष्णु, आणि श्रीशंकर आजपर्यंत शेकडों होऊन गेले, व पुढेंही शेंकडों होणार आहेत. ( १८ ) हे परमेश्वरि, तुझी जर आराधना केली नाहीं, तर आम्ही सर्वजण देव

रुषार्थचतुष्टयम् ॥ लब्धुं न शक्यमस्माभिरपि सर्वैः सुरोत्तमैः ॥१८
व्यत्यासोऽपि भवेत्मद्यो ब्रह्मत्वस्थावरत्वयोः ॥ सुकृते दुष्कृते
चापि त्वद्व्यवस्थापनं यतः ॥ १९ ॥ त्वं हि सर्वजगद्भर्तुः शिवस्य
परमात्मनः ॥ अनादिमध्यनिधना शक्तिराद्या सनातनी ॥ २० ॥
समस्तलोकयात्रार्थं मूर्तिमाविश्य कामपि ॥ क्रीडसे विविधैर्भावैः
कस्त्वां जानाति तत्वतः ॥ २१ ॥ अतो दुष्कृतकर्मापि व्याघ्रोऽयं
त्वदनुग्रहात् ॥ प्राप्नोतु परमां सिद्धिमत्र कः प्रतिबन्धकः ॥ २२ ॥
इत्यात्मनः परं भावं स्मारयित्वानुरूपतः ॥ ब्रह्मणाभ्यर्थिता गौरी
तपसोऽपि न्यवर्तत ॥ २३ ॥ ततो देवीमनुज्ञाप्य ब्रह्मण्यन्तर्हिते
सति ॥ देवी च मातरं दृष्ट्वा मेनां हिमवता सह ॥ प्रणम्याश्वास्य

---

जरी आहेंत तरी त्यास धर्म, अर्थ काम मोक्ष ह्या चार प्रकारच्या पुरुषार्थांची प्राप्ति कधींही होणार नाहीं. ( १९ ) तूं जर मनांत आणशील तर ब्रह्मदेव मी आहे, खरा तरीपण दगड होईन आणि दगड देखील तूं मनांत आणशील तर ब्रह्मदेव होईल. सारांश, तुझी शक्ति अगाध आहे. पुण्यकर्माविषयीं आणि पापकर्माविषयीं तूंच व्यवस्था लावून दिलेली आहेस. ( २० ) शिव हा परमेश्वर आहे तो सर्व जगाचा अधिपति आहे, त्या शिवाची तूं मुख्य शक्ति आहेस, तूं अनादिकालापासून आहेस, तुला जन्म नाहीं, तुला तरुणपणा नाहीं, व तुला म्हातारपणाही नाहीं. ( २१ ) सर्व लोकांची ही प्रपंचरचना अशीच सुरळीतपणानें चालण्याकरितां तूं कोणतें तरी एखादें स्वरूप घेऊन अनेक तऱ्हेच्या रूपानें क्रीडा करितेस, तुला यथार्थ रीतीनें कोण जाणूं शकणार आहे? ( २२ ) आणि ह्या साठींच हा वाघ दुष्टकर्म करणारा आहे खरा, तरी पण तुझ्या कृपेमुळें त्यास उत्तम प्रकारची सिद्धि मिळो, त्यास कोण हरकत करणार आहे? ( २३ ) ह्याप्रमाणें आपला योग्य अभिप्राय आपल्या स्वभावास शोभेल अशा रीतीनें लोकांचे नजरेस आणून ब्रह्मदेवानें विनंति केलेल्या पार्वतीनें आपली तपश्चर्या पुरी केली. ( संपविली. ) ( २४ ) ह्याप्रमाणें पार्वतीची विनंति करून ब्रह्मदेव

बहुधा पितरौ विरहासहौ ॥ २४ ॥ ततः प्रणयिनो देवी तपोवन-
महीरुहान् ॥ विप्रयोगशुचेवाग्रे पुष्पबाष्पं विमुंचतः ॥ २५ ॥ तत्त-
च्छाखासमारूढविहगोदीरितै रुतैः ॥ व्याकुलं बहुधा दीनं विलाप-
मिव कुर्वतः ॥ २६ ॥ सखीभ्यः कथयन्त्येव सत्वरा भर्तृदर्शने ॥
पुरस्कृत्य च तं व्याघ्रं स्नेहात्पुत्रमिवौरसम् ॥ २७॥ देहस्य प्रभया-
चैव दीपयन्ती दिशो दश ॥ प्रययौ मन्दरं गौरी यत्र भर्ता महे-
श्वरः ॥ २८ ॥ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे देवी-
ब्रह्मसंवादे द्वाविंशोऽध्यायः ॥ २२ ॥

---

गुप्त झाल्यावर पार्वती आपल्या मेनामातेचे व हिमालयपित्याचें दर्शन घेऊन ( २५ ) त्यांस नमस्कार करून व आपण आतां जाणार, त्यामुळें दुःख करणाऱ्या आईबापांची समजूत घालून आपल्या आवडत्या तपोव-नांतील झाडांकडे पाहूं लागली. ( २६ ) व हीं झाडें आपली तुटातुट होणार ह्मणून मजपुढें फुलांच्या मिषानें दुःखाश्रूच गाळतात, व त्यांच्या फांद्यांवर बसलेल्या पांखरांच्या शद्बांच्या रूपानें ( २७ ) दीनवाणें शब्दच करितात कीं काय असें मला वाटतें, असें आपल्या मैत्रिणीस सांगत सांगत, पतीचें दर्शन घेण्यासाठीं घाईघाईनें लवकर लवकर ( २८ ) ममतेनें आपल्या प्रत्यक्ष पोटच्या मुलाप्रमाणें मानलेल्या त्या वाघास पुढें करून व आपल्या शरीराच्या सौंदर्यानें दाही दिशांस प्रकाशित करीत करीत ज्या ठिकाणीं तिचे पति श्रीशंकर होते, त्या मंदर पर्वतावर गेली.

ह्याप्रमाणें शैव नांवाच्या महापुराणांतील वायवीयसंहितेच्या पूर्व-भागापैकीं पार्वतीच्या आणि ब्रह्मदेवाच्या संवादांतील हा बावीसावा अ-ध्याय संपला-

---

## ॥ अथ त्रयोविंशोऽध्यायः ॥

ऋषय ऊचुः ॥ कृत्वा गौरं वपुर्दिव्यं देवी गिरिवरात्मजा ॥ कथं ददर्श भर्तारं प्रविष्टा मन्दरं सती ॥ १ ॥ प्रवेशसमये तस्या भवनद्वारगोचरैः ॥ गणेशैः किं कृतं देवस्तां दृष्ट्वा किं तदाकरोत् ॥ २ ॥

वायुरुवाच ॥ प्रवक्तुमंजसाऽशक्यस्तादृशः परमो रसः ॥ येन प्रणयगर्भेण भावो भाववतां हृतः ॥ ३ ॥ द्वास्थैः ससम्भ्रमैरेव देवो देव्यागमोत्सुकः ॥ शंकमानः प्रविष्टां तां तं च सा समपश्यत ॥ ४ ॥ तैस्तैः प्रणयभावैश्च भवनान्तरवर्तिभिः ॥ गणेन्द्रैर्वन्दि-

---

श्रीशिवास नमस्कार असो. ऋषीश्वर ह्मणालेः—( १ ) ती पतिव्रता पार्वती आपलें सुंदर स्वरूप करून मंदर पर्वतावर गेली आणि तिनें आपल्या पतीस ( श्रीशिवास ) कशा तऱ्हेनें पाहिलें ? ( २ ) ती जेव्हां शंकराकडे येऊं लागली, तेव्हां शिवाच्या दाराजवळ असणाऱ्या प्रमथगणांतील मुख्य मुख्य गणेश्वरांनीं काय केलें ? व देवीला पाहिल्यावर देवानें तेव्हां काय केलें ?

वायु ह्मणालाः— ( ३ ) त्यावेळीं जो कांहीं आनंदाचा प्रकार झाला तो प्रकार एकदम मुळींच सांगतां येण्यासारखा नाहीं. कांतर त्यावेळच्या आनंदानें सज्जनलोकांचीं मनें तल्लीन होऊन गेलीं. ( ४ ) पार्वती आपलेकडे येत आहे, असें पाहतांच द्वाराजवळ असलेल्या सर्व प्रमथगणांसहित देवीला सामोरे जाण्यास महादेव तयार झाले, आणि सामोरा जावें किंवा न जावें, असा विचार पुनः मनांत करूं लागले, तोंच पार्वती येऊन पोंचलेली शिवांनीं पाहिली, व शिव आपणास सामोरे येण्यास निघाले होते असें पार्वतीनें पाहिलें. ( ५ ) त्यावेळीं शिवाच्या अंतःपुरांत जे जे प्रमथगण होते, त्यांनीं त्यांस संतोष झाल्याचें ज्या ज्या रीतीनें उघड करून दाखविणें शक्य होतें, तितक्या रीतीनें शरीरानें

ता वाचा प्रणनाम त्रियम्बकम् ॥ ५ ॥ प्रणम्य नोत्थिता याव-त्तावत्तां परमेश्वरः ॥ प्रगृह्य दोर्भ्यामाश्लिष्य परितः परया मुदा ॥ ६ ॥ स्वांके धर्तुं प्रवृत्तोऽपि सा पर्यंके न्यषीदत ॥ पर्यंकतो बलादेवीं स्वांकमारोप्य सुस्मिताम् ॥ ७ ॥ सस्मितो विवृतैर्नेत्रैस्त-द्वक्त्रं प्रपिबन्निव ॥ तया सम्भाषणायेशः पूर्वभाषितमब्रवीत् ॥८॥

देव उवाच ॥ सा दशा च व्यतीता किं तव सर्वांगसुंदरि ॥ यस्यामनुनयोपायः कोऽपि कोपान्न लभ्यते ॥ ९ ॥ स्वेच्छयापि च कालीति नान्यत्रर्णवतीति च ॥ त्वत्स्वभावाहृतं चित्तं सुभ्रु चिन्तावहं मम ॥ १० ॥ विस्मृतः परमो भावः कथं स्वेच्छांगयो-

---

आणि वाचेनें उघड करून तिला नमस्कार केल्यावर पार्वतीनें श्रीशंक-रास नमस्कार केला. ( ६ ) पार्वती खालीं लवून नमस्कार करून उठत आहे तोंच शंकरांनीं दोन्ही हातानें उचलून धरून तिला मोठ्या आनं-दानें दृढ आलिंगन दिलें. ( ७ ) आणि श्रीशिव तिला आपल्या मांडी-वर घेऊन बसण्याचा प्रयत्न करीत आहेत, तोंच पार्वती पलंगावर बसली, तरी पलंगावरून बळजोरीनें ओढून घेऊन पार्वतीला आपल्या मांडीवर बसवून हास्य करणाऱ्या ( ८ ) त्या पार्वतीचें मुख आपल्या तिच्याक-डे वळविलेल्या नेत्रांनीं पीतोचकीं काय अशा तऱ्हेनें पाहत पाहत आणि हांसून तिजबरोबर बोलण्याकरितां शंकरच अगोदर तिजबरोबर पूर्वीं बोललेलेंच बोलूं लागले.

शिव ह्मणाले:—( ९ ) हे सौंदर्यसंपन्ने पार्वति, मी तुला काली झटल्याबरोबर तूं इतकी संतापलीस कीं, त्यावेळीं तुझें समाधानकरण्या-चा मला कोणताच उपाय राहिला नाहीं, ती तुझी काळेपणाची स्थिति जाऊन तूं आतां सुस्वरूप झालीसना ? आतां काळेपणा तुझ्या स्वरूपांत काडीमात्र राहिलेला नाहींना ? ( १० ) हे पार्वति, स्वेच्छेनें ( निजरू-पानें ) पाहिल असतां तूं काळी नाहींस, आणि दुसऱ्या रंगाचीही ना-हीस. परंतु आतांच्या या तुझ्या स्वभावानें माझें मन ठिकाणावर नसून मोठी काळजी मात्र पडली. ( ११ ) बरें ? तें असो, मी तुला विचा-रितों ? स्वेच्छांगयोगानें [ वास्तविक स्वरूपानें ] पाहिलें असतां तुझा

गतः ॥ न सम्भवन्ति ये तत्र चित्तकालुष्यहेतवः ॥ ११ ॥ पृथग्जनवदन्योऽन्यं विप्रियस्यापि कारणम् ॥ आवयोरपि यद्यस्ति नास्त्येवैतच्चराचरम् ॥ १२ ॥ अहमग्निशिरोनिष्ठस्त्वं सोमशिरसि स्थिता ॥ अग्नीषोमात्मकं विश्वमावाभ्यां समधिष्ठितम् ॥ १३ ॥ जगद्धिताय चरतोः स्वेच्छाधृतशरीरयोः ॥ आवयोर्विप्रयोगे हि स्यान्निरालम्बनं जगत् ॥ १४ ॥ अस्ति हेत्वपरं चात्र शास्त्रयुक्तिविनिश्चितम् ॥ वागर्थमयमेवैतज्जगत्स्थावरजंगमम् ॥ १५ ॥ त्वं हि वागमृतं साक्षादहमर्थामृतं परम् ॥ द्वयमप्यमृतं कस्माद्वियुक्तमुपपद्यते ॥ १६ ॥ विद्या प्रत्यायिका त्वं मे वेद्योऽहं प्रत्ययात्तव ॥

---

तो भाव कसा विसरला गेला बरें ? कारण ज्या निजरूपामध्यें मनांत पाप आणणारें असलें कारण असावयास शक्य नाहींत. ( १२ ) जगांतल्या प्राकृत लोकांप्रमाणें मन वितुष्ट व्हावयास जीं कारणें लागतात, तीं कारणें आह्मा दोघांमध्यें असतील तर स्थावरजंगम रूप जग हें नाहींच ह्मणावयास काय हरकत आहे ? ( १३ ) हे पार्वति, मी अग्नीच्या शिरोभागांवर असून तूं सोमाच्या ( चंद्राच्या ) शिरोभागावर आहेस जग हें अग्नीषोमात्मक ( अग्नीषोमस्वरूप ) आहे. आणि या जगाचे स्थापक [ सृष्टि करणारे ] आह्मी दोघेच आहोंत. ( १४ ) अशा जगाचें पालन करण्याकरितां स्वेच्छेनें हें शरीर धारण केलें आहे. असें असून आह्मा दोघांमध्यें वियोग घडून आला तर जगाला आधारच नाहींसा होईल अर्थात वियोग होणें मुळींच शक्य नाहीं असें समज.(१५) आमच्यामध्यें वियोग कधींही घडून येत नाहीं, अशाबद्दल पुष्कळ कारणें सांगून शास्त्राच्या युक्तीनेंही सप्रमाण सिद्ध करून दाखवितों. पहा. हें स्थावरजंगम जग ह्मणजे वाणी ( शब्द ) आणि अर्थमय आहे. (१६) आतां वाणीरूपीअमृत तूं असून अर्थरूपीअमृत मी आहे, या दोन्ही अमृतांचा ( शब्दार्थांचा ) वियोग कधींतरी होऊं शकेल काय ? अर्थात शब्दाला सोडून अर्थ राहत नाहीं, आणि अर्थाला सोडून शब्द राहत नाहीं, हें अनुभवानें सिद्ध झालेलें आहे. ( १७ ) तसेंच प्रमाणभूत वेदविद्या तूं असून वेद्य ( जाणावयास योग्य ) मी आहे. तर विद्येचा आणि वेद्याचा

विद्यावेद्यात्मनोरेव विश्लेषः कथमावयोः ॥ १७॥ न कर्मणा सृजामीदं जगत्प्रतिसृजामि च ॥ सर्वस्याज्ञैकलभ्यत्वादाज्ञा त्वं हि गरीयसी ॥ १८ ॥ आज्ञैकसारमैश्वर्यं यस्मात्स्वातन्त्र्यलक्षणम् ॥ आज्ञया विप्रयुक्तस्य ऐश्वर्यं मम कीदृशम् ॥ १९ ॥ न कदाचिदवस्थानमावयोर्विप्रयुक्तयोः ॥ तथापि विरहो वृत्त इत्यतोऽन्यत्किमद्भुतम् ॥ २० ॥ न परानुग्रहादन्यत्प्रयोजनमिहात्मनः ॥ प्रवृत्तिलक्षणं तस्माल्लीलापि न वृथावयोः ॥ २१ ॥ देवानां कार्यमुद्दिश्य लीलोक्तिं कृतवानहम् ॥ त्वयाप्यविदितं नास्ति कथं कुपितवत्यसि ॥ २२ ॥ ततस्त्रिलोकरक्षार्थे कोपो मय्यपि ते कृतः ॥ यदनर्थाय भूतानां न तदस्ति खलु त्वयि ॥ २३ ॥ इति प्रियंवदे

---

वियोग कधींतरी होईल काय ? अर्थात आह्मांमध्यें वियोग व्हावयाचाच नाहीं. ( १८ ) या जगाची सृष्टि कृतीनें कधीं मी केली नाहीं, आणि प्रतिसृष्टि कर्मानें करीत नाहीं. या सृष्टीला प्रतिसृष्टीला मुख्य कारण माझी आज्ञा आहे. अशी ती श्रेष्ठ आज्ञा तूंच आहेस ( १९ ) माझें स्वतंत्र ऐश्वर्य ह्मणजे आज्ञाच ( हुकुम ) होय. अशी ती आज्ञा मला सोडून दूर राहिली तर माझें ऐश्वर्य काय राहिले ? ( २० ) एकूण तात्पर्य हेंच कीं आह्मा परस्परांमध्यें वियोग कधींच होत नाहीं. असें असूनही वियोग होतो, असें ह्मणशील तर यासारखें आश्चर्यच नाहीं. (२१) मग सध्या असा रागाचा आवेश कसा घडून आला असें ह्मणशील तर सांगतों ऐक. लोकांवर अनुग्रह करावयास हें प्रवृत्तिमार्गांतलें शरीर आह्मीं धारण केलें आहे, यावांचून दुसरें प्रयोजन नाहीं. पार्वति, ही प्रवृत्तिमार्गाची आमची लीलाही व्यर्थ नाहीं असें समज. ( २२ ) देवांच्या कार्याकरितां मीं हें लीलेचें भाषण केलें, हें तूं जाणत असन रागावलीस कशी ? ( २३ ) असो त्रैलोक्याच्या रक्षणाकरितां माझ्यावर त्वां राग केला, याशिवाय लोकांच्या अकल्याणाकरितां कांहीं राग तुझ्या ठिकाणीं नाहीं, हेंच बरोबर आहे. ( २४ ) याप्रमाणें गोडगोड बोलणाऱ्या साक्षात् ईश्व-

साक्षादीश्वरे परमेश्वरी ॥ श्रृंगारभावसाराणां जन्मभूमिरकृत्रिमा ॥ २५ ॥ स्वभर्त्रा ललितं तथ्यमुक्तं मत्वा स्मितोत्तरम्‌ ॥ लज्जया न किमप्यूचे कौशिकीवर्णनात्परम्‌ ॥ २५ ॥

देव्युवाच ॥ किं देवेन न सा दृष्टा या सृष्टा कौशिकी मया ॥ तादृशी कन्यका लोके न भूता न भविष्यति ॥२६॥ तस्या वीर्यं बलं विन्ध्ये निलयं विजयं तथा ॥ शुम्भस्य च निशुम्भस्य मारणं च रणे तयोः ॥२७॥ प्रत्यक्षफलदानं च लोकाय भजते सदा ॥ देवानां रक्षणे शश्वद्ब्रह्मा विज्ञापयिष्यति ॥ २८ ॥ इति सम्भाषमाणाया देव्या एवाज्ञया तदा ॥ व्याघ्रः सख्या समानीय पुरोऽवस्थापितस्तथा ॥ २९ ॥ तं प्रेक्ष्याह पुनर्देवी देवानीतमुपायनम्‌ ॥ व्याघ्रं पश्य

---

राला पाहून श्रृंगारभावांच्या केवळ साराची जी जन्मभूमि, अशा अकृत्रिम पार्वतीनें ( २५ ) आपल्या पतीचें सुंदर सत्यवाणी ऐकून किंचित गालांतल्या गालांत हंसून लाजून कौशिकीच्या वर्णनावांचन दुसरीं अक्षरेंच काढिलीं नाहीं. ( २६ ) देवी ह्मणाली माझ्या आंगापासून उत्पन्न झालेल्या कौशिकीला इकडून ( आपणांकडून ) पाहणं झालं नाहीं वाटतं ? मीं ह्मणतें कीं, तशी कन्या जगामध्यें मागं झाली नसेल, पुढें होणार नाहीं आतां तर तिच्याप्रमाणें कुणीच नाहीं. ( २७ ) तिनें विंध्य पर्वतावर घर केलें असून मोठा जय मिळविला. तिचा पराक्रम तिचे ते बळ काय सांगू आपल्याला ? अतिशय माजलेल्या त्या शुंभाला आणि त्याच्या भावाला ( निशुंभाला ) एका क्षणांत नाहींसे करून टाकले, (२८) आणि ती उदार इतकी कांहीं आहे कीं, जो आपल्याला भजतो, अशा भक्ताला प्रत्यक्षफल वाटेल तें देते. तो एवढा ब्रह्मदेव देवांना राखण्याविषयीं नेहमीं तिचीं आर्जवं करीत असतो. ( २९ ) याप्रमाणें आपल्या पतीपुढें कालीचें वर्णन करून तिचा प्रिय असा एक वाघ होता, तो आणावयास तिनें आपल्या सखीस सांगितलें, नंतर त्या सखीनें लौकरच तो वाघ आणून पुढें उभा केला. ( ३० ) त्या वाघाला पाहून देवीनें पुनः श्रीशंकरास ह्मटलें कीं, देवा पूर्वी देवांनीं मला हा वाघ प्रेमानें आंदण ह्मगून आणून दिला परंतु, याच्याप्रमाणें सेवा करणारा दुसरा

न चानेन सदृशो मदुपासकः ॥ ३० ॥ अनेन दुष्टसत्त्वेभ्यो रक्षितं मत्तपोवनम् ॥ अतीव मम भक्तश्च विश्रब्धश्च स्वरक्षणात् ॥ ३१॥ स्वदेशं च परित्यज्य प्रसादार्थं समागतः ॥ यदि प्रीतिरभून्मत्तो यदि प्रीतिं करोषि मे ॥ ३२ ॥ नित्यमन्तःपुरद्वारि नियोगान्नन्दिनः स्वयम् ॥ रक्षिभिः सह तच्चिन्हैर्वर्ततामयमीश्वर ॥ ३३ ॥ मधुरं प्रणयोदर्कं श्रुत्वा देव्याः शुभं वचः ॥ प्रीतोऽस्मीत्याह तं देवः स चादृश्यत तत्क्षणात् ॥ ३४ ॥ बिभ्रद्वेत्रलतां हैमीं रत्नचित्रं च कंचुकम् ॥ छुरिकामुरगप्रख्यां गणेशो रक्षवेषधृक् ॥ ३५ ॥ यस्मात्सोमो महादेवो नन्दी चानेन नन्दितः ॥ सोमनन्दीति वि-

---

भक्त कोणी नसेल असें मला वाटतें (३१) मी तपोवनांत असतां माझें तें वन दुष्ट मृगापासून या वाघानें राखलें ह्मणून याच्यावर माझें प्रेम फार फार आहे. तसेंच यानें माझें रक्षण केलें. ह्मणून याच्यावर फार फार माझा विश्वास बसला. ( ३२ ) महाराज, हा वाघ आमचा प्रसाद मिळावा ह्मणून आपली जागा सोडून येथें माझ्याकडे आला. तर याच्यावर माझ्यापेक्षां ज्यास्त प्रीति करीत असाल, किंवा माझ्यावर आपली खरी प्रीति असेल तर ( ३३ ) हे ईश्वरा, आमच्या खास वाड्याच्या दरवाज्यासमोर नेहमीं शिपायांचा पाहरा जेथें आहे. तेथें याला राहण्याकरितां जागा देण्याविषयीं आपल्या नंदीला हुकूम द्यावा, ( ३४ ) याप्रमाणें भार्येचें प्रेमळ गोड भाषण ऐकून तुझ्यावर माझें प्रेम अतिशय आहे, आणि तुझ्या मनाप्रमाणें करितों असें सांगून शंकर त्याक्षणींच अंतर्धान पावले. ( ३५ ) नंतर पार्वतीला वचन दिल्याप्रमाणें श्रीशंकरानें असें केलें कीं, सोन्याची काठी हातांत धरिली आहे, रत्नें बसविलीं होतीं, असा आंगरखा आंगांत घातला होता आणि सर्पाप्रमाणें शोभणारी एक सुरी हातांत घेतली होती, नेहमीं राक्षसाच्या वेषांत राहत होता, असा जो गणाधीश ( ३६ ) त्यानें उमासहित शंकराला आणि नंदीला फार फार संतोष दिला होता, ह्मणून श्रीशिवानें पार्वतीला

ख्यातस्तस्मादेष समाख्यया ॥ ३६ ॥ इत्थं देव्याः प्रियं कृत्वा देवश्चार्द्धेन्दुभूषणः ॥ भूषयामास तां दिव्यैर्भूषणै रत्नभूषितैः ॥३७॥ वृत्तं ॥ ततः स गौरी गिरिशो गिरीन्द्रजां सगौरवं सर्वमनोहरां हरः ॥ स्वमंकमारोप्य वरांगभूषणैर्विभूषयामास शशांकभूषणैः॥३८

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे त्रयोविंशोऽध्यायः ॥ २३ ॥

---

संतोष होण्याकरितां त्या गणाधीशाचें नांव सोमनंदी असें ठेवलें. ( ३७ ) अशा रीतीनें चंद्रशेखरानें देवीला आवडेल तसें करून रत्नाचे दागिने स्वतः देवीच्या आंगावर घातले. ( ३८ ) नंतर शिवानें सर्वांपेक्षां सुंदर अशा आपल्या गिरिजेला आपल्या अंकावर घेऊन त्या चंद्रशेखरानें पुनः श्रेष्ठ श्रेष्ठ दागिन्यांनीं मढवून काढिलें.

याप्रमाणें शैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील पूर्वभागांतला तेवीसावा अध्याय संपला.



## ॥ अथचतुर्विंशोऽध्यायः ॥

ऋषय ऊचुः ॥ देवीं समादधानेन देवेनेदं किमीरितम् ॥ अग्नीषोमात्मकं विश्वं वागर्थात्मकमित्यपि ॥ १ ॥ आज्ञैकसारमैश्वर्यमाज्ञा त्वमिति चोदितम् ॥ तदिदं श्रोतुमिच्छामो यथावदनुपूर्वशः ॥ २ ॥

वायुरुवाच ॥ अग्निरित्युच्यते रौद्री घोरा या तैजसी तनुः ॥ सोमः शाक्तोऽमृतमयः शक्तेः शान्तिकरी तनुः ॥ ३ ॥ अमृतं यत्प्रतिष्ठा सा तेजोविद्याकला स्वयम् ॥ भूतसूक्ष्मेषु सर्वेषु ते एव रसतेजसी ॥४॥ विविधा तेजसो वृत्तिः सूर्यात्मा चानलात्मिका॥ तथैव रसवृत्तिश्च सोमात्मा च जलात्मिका ॥५॥ वैद्युतादिमयं तेज

---

ऋषी बोलले ( १ ) वायो, ईश्वरानें देवीस [ सतीस ] समाधान करतेवेळीं असें ह्मटलें कीं, हें जग अग्नीषोमात्मक[अग्नीसोमस्वरूप] आहे, वागर्थात्मक [ शब्दार्थरूप ] आहे, ( २ ) आणि ऐश्वर्य हें आज्ञेचें मुख्य सार आहे, अतएव आज्ञा तूं [ पार्वती ] असून आज्ञात्व [ आज्ञा करण्याचा धर्म ] माझ्या ठिकाणीं आहे, इत्यादि वचनें शिवानें सतीस सांगितलीं तर तीं वचनें अनुक्रमानें सविस्तर ऐकावयाची इच्छा करतो अतएव कृपा करून सांगा. ( ३ ) वायु ह्मणाला रुद्राची भयंकर तेजस्वी जी तनु [ देह ] तिला अग्नि असें नांव आहे. आणि शक्तीची [ पार्वतीची ] अमृतस्वरूप शांत अशी जी तनु आहे, तिला सोम असें ह्मणतात ( ४ ) प्रतिष्ठाकलेला अमृत असें ह्मणत असून विद्याकलेला तेज असें ह्मणतात. आणि तेज हे दोनी सर्व प्राणिमात्रामध्यें वास करतात. ( ५ ) सूर्यरूपी अग्निरूपी वगैरे तेजाची वृत्ति [ स्थिति ] अनेक आहे. तसेंच रस हा चंद्र जल वगैरे अनेक ठिकाणीं वास करितो ( ६ ) वीज वगैरे पदार्थामध्यें तेज आहे; मधुर मधुर पदार्थामध्यें रस आहे. एकूण हें स्थावर जंगमरूप जग हें तेजानें

मधुरादिमयो रसः ॥ तेजो रसविभेदैस्तु धृतमेतच्चराचरम् ॥ ६ ॥ अग्नेरमृतनिष्पत्तिरमृतैरग्निरेधते ॥ अत एव हविःक्लृप्तमग्नीषोमं जगद्धितम् ॥ ७ ॥ हविःशेषस्य सम्पत्तिर्वृष्टिः सस्याभिवृद्धये ॥ वृष्ट्ये च हविस्तस्मादग्नीषोमधृतं जगत् ॥ ८ ॥ अग्निरूर्ध्वं ज्वलत्येष यावत्सौम्यं परामृतम् ॥ यावदग्न्यास्पदं सौम्यममृतं च स्रवत्यधः ॥ ९ ॥ अत एव हि कालाग्निरधस्ताच्छक्तिरूर्ध्वतः ॥ तावता दहनं चोर्ध्वमधश्चाप्लावनं भवेत् ॥ १० ॥ आधारशक्त्यैव धृतः कालाग्नि-रयमूर्ध्वगः ॥ तथैव निम्नगः सोमः शिवशक्तिपदास्पदः ॥ ११ ॥ शिवश्चोर्ध्वमधः शक्तिरूर्ध्वं शक्तिरधः शिवः ॥ तदित्थं शिवशक्तिभ्यां नाव्याप्तमिह किंचन ॥ १२ ॥ असकृच्चाग्निना दग्धं जगद्यद्भस्म-

---

रसानें बनविलेलें आहे. [ व्याप्त आहे. ] ( ७ ) अतएव अग्नीपासून अमृत उत्पन्न होतें, व अमृतापासून अग्नि वाढतो. ह्मणून यज्ञांत महत्वाचा पदार्थ हविष्य जें आहे त्याची सिद्धि होते. अर्थात जग हें अग्नीषोमस्वरूप ह्मणून सिद्ध झालें. ( ८ ) यज्ञांतल्या अवशिष्ट हविर्भागापासून पाऊस पडतो, पावसापासून सस्याची वाढ होते अर्थात वृष्टी करितां हवि पाहिजे असें झालें यावरून जग हें अग्नीषोमात्मक आहे असें सिद्ध झालें. ( ९ ) अग्नीची गति वर असून श्रेष्ठ अमृताची गति सौम्य आहे. अर्थात अग्नीच्या तडाक्यांत जें जें सांपडेल त्याच्या रक्षणाकरितां अमृताचा स्राव त्या त्या पदार्थावर होत असतो. ( १० ) ह्मणूनच कालाग्नि हा वर असून त्याच्याखालीं शक्तिही राहते. तितक्यांत कालाग्नि वर जाळूं लागला तर खालीं शक्ति असल्यामुळें ती भिजवून टाकिते. ( ११ ) खालच्या बाजूला आधारशक्ति आहे ह्मणून ऊर्ध्वगामी अग्नी तो धरिला गेला आहे. अतएव शिवशक्तीच्या आश्रयाला निम्नगामीं [ खालीं स्रवणारा ] सोम हा राहतो. ( १२ ) वर शिव असून खालीं शक्ति आहे, आणि वर शक्ति असून खालीं शिव अशाक्रमानें ही दोघांची स्थिति आहे. एकूण शिव आणि शक्ति यांच्यावाचून तिळमात्र स्थलही जगांत सांपडावयाचें नाहीं. ( १३ ) वारंवार हें

सात्कृतम् ॥ अग्नेर्वीर्यमिदं प्राहुस्तद्वीर्यं भस्म यत्ततः ॥ १३ ॥ यश्चेत्थं भस्मसाद्भावं ज्ञात्वा स्नाति च भस्मना ॥ अग्निरित्यादिभिर्मन्त्रैर्बद्धः पाशाद्विमुच्यते ॥ १४ ॥ अग्नेर्वीर्यं तु तद्भस्म सोमेनाप्लावितं पुनः ॥ अयोगयुक्त्या प्रकृतेरधिकाराय कल्पते ॥ १५ ॥ योगयुक्त्या तु तद्भस्म प्लाव्यमानं समन्ततः ॥ शाक्तेनामृतवर्षेण चाधिकारान्निवर्तयेत् ॥ १६ ॥ अतो मृत्युजयायेदममृतप्लावनं सताम् ॥ शिवशक्त्यमृतस्पर्शे लब्ध एव कुतो मृतिः ॥ १७ ॥ यो वेद दहनं गुह्यं प्लावनं च यथोदितम् ॥ अग्नीषोमपुटं हित्वा न स भूयोऽभिजायते ॥ १८ ॥ शिवाग्निना तनुं दग्ध्वा शक्तिसौम्यामृतेन यः ॥ प्लावयेद्योगमार्गेण सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १९ ॥ इममर्थं

---

जग अग्नीच्या संपर्कानें जळून जें भस्म होतें तें अग्नीचें वीर्य होय. असें जें अग्नीचें वीर्य भस्म आहे. ( १४ ) त्याला [ भस्माला ] जाणून [ हें जळून भस्म झालें आहे असें जाणून ] " अग्नि " वगैरे मंत्र ह्मणून जो भस्मस्नान करतो तो प्राणी संसारबंधापासून मुक्त होतो. ( १५ ) अग्नीचें वीर्य जें भस्म असेल त्याला योगरूपी युक्ति न करतां सोमानें पुनः भिजविलें असतां तें [ भस्म ] प्रकृतीच्या अधिकाराला पात्र होतें. [ एकदा प्रकृतीपासून उत्पन्न झालेला देह पवित्र भस्मानें पुनीत झाला असतां सावधान होऊन पुनः मायेमध्यें पडला तर पुनः जन्माच्या मरणाच्या अधिकाराला जीव पात्र होतो. ] ( १६ ) योगरूपी युक्तीनें चोहोंकडून तें भस्म शक्तिरूपी अमृतवृष्टीनें भिजवून सोडलें असतां प्रकृतीच्या अधिकारापासून परावृत्त होतो. ( १७ ) अतएव मृत्यूला जिंकण्याकरितां सज्जनास अमृतप्लावन [ अमृतानें भिजविणें ] हें संमत झालें आहे ? शिवशक्तिरूप अमृताचा स्पर्श झाला असतां मरण कोठून येईल बरें ? ( १८ ) ही दहन करण्याची कृति परम गूढ असूनही जो विधिपूर्वक या कृतीचें ज्ञान करून घेतो, तो प्राणी अग्नीषोमस्वरूपी जगाकडे पुनः ढुंकून पाहत नाहीं [ जन्माला येत नाहीं ] ( १९ ) शिवरूपी अग्नीनें तनु जाळून शक्तिरूपी अमृतानें योगाच्या युक्तीनें जो भिजवितो तो मोक्षाला पात्र होतो. ( २० ) जनहो, ह्याच अर्थ ह्रद-

हृदि कृत्य देवेन समुदाहृतम् ॥ अग्नीषोमात्मकं विश्वं जगदित्य-
नुरूपतः ॥ २० ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे चतु-
र्विंशोऽध्यायः ॥ २४ ॥

---

थांत ठेऊन शिवानें सतीस हें जग अग्नीषोमात्मक आहे असें सांगितलें.

याप्रमाणें शैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील पूर्वभागांतला चोवीसावा अध्याय संपला.



## ॥ अथ पंचविंशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ अथ वक्ष्यामि जगतो वागर्थात्मकता यथा ॥ षडध्ववेदनं सम्यक् समासान्न तु विस्तरात् ॥ १ ॥ नास्ति कश्चिदशब्दोऽर्थो नापि शब्दो निरर्थकः ॥ ज्ञाते हि समये शब्दः सर्वः सर्वार्थबोधकः ॥ २ ॥ प्रकृतेः परिणामोऽयं द्विधा शब्दार्थभावितः ॥ तामाहुः प्रकृतिं भूतिं शिवयोः परमात्मनोः ॥ ३ ॥ शब्दात्मिका विभूतिर्या सा त्रिधा कथ्यते बुधैः ॥ स्थूला सूक्ष्मा परा चेति स्थूला या श्रुतिगोचरा ॥ ४ ॥ सूक्ष्मा चिन्तामयी प्रोक्ता चिन्तया रहिता परा ॥ या परा सा क्रियाशक्तिः शिवतत्वसमाश्रया ॥ ५ ॥ ज्ञानशक्तिसमायोगादिच्छोपोद्वलिता तथा ॥ सर्वशक्तिसमष्ट्यात्मा शक्तितत्वसमाख्यया ॥ ६ ॥ समस्तकार्यजा-

वायु ह्मणालाः— ( १ ) आतां जग हें वागर्थस्वरूप कसें आहे तें सांगतों आणि षडध्वज्ञानही सांगतों पण विस्तारानें न सांगतां संक्षेपानें सांगतों. ( २ ) जगांत जितके अर्थ आहेत तितके शब्दाशिवाय नाहींत. आणि जितके शब्द आहेत तितके त्यांचे अर्थ आहेत. अतएव निरर्थक एक शब्द सुद्धां सांपडत नाहीं. समय आला असतां सर्व शब्द सर्व अर्थाला बोधन करणारे होतात. ( ३ ) शब्द अर्थ हे दोन्ही प्रकृतीचे परिणाम आहेत त्या प्रकृतीला परमात्म्या शिवाची आणि सतीची विभूति असें ह्मणतात. ( ४ ) शब्दरूप जी विभूति आहे ती तीन प्रकारची आहे ह्मणून पंडित सांगतात. स्थूला, सूक्ष्मा परा असे हे तीन प्रकार होत. त्यांत स्थूला ही श्रुतीला [ कानाला ] गोचर होते. ( ५ ) सूक्ष्माविभूति चिंतामय आहे असें ह्मणतात. पराविभूति चिंतेनें रहित आहे. शिवतत्वाला आश्रय करून राहणारी क्रिया शक्ती जी आहे तीच परा होय. ( ६ ) या पराशक्तीमध्यें ज्ञानशक्तीचा समावेश होतो, आणि इच्छाशक्तीचाही समावेश होतो. असो. क्रियापराशक्ति, ज्ञानपराशक्ति, इच्छापराशक्ति या तिन्ही शक्तींनीं युक्त जी सर्वशक्तिसमष्ट्यात्मकाशक्ती ह्मणजे जिच्यामध्यें सर्व शक्तींचा समावेश होतो अशा आत्मशक्तितत्वानें ( ७ ) सर्व कार्यें होतात, या सर्व कार्यांच्या बुडाशीं एक जी शक्ति आहे, ति-

तस्य मूलप्रकृतितां गता ॥ सैव कुण्डलिनी माया शुद्धाध्वपरमा सती ॥ ७ ॥ सा विभागस्वरूपैव षडध्वात्मा विजृम्भते ॥ तत्र शब्दस्त्रयोऽध्वानस्त्रयश्चार्थाः समीरिताः ॥ ८ ॥ सर्वेषामपि ते पुंसां नैजशुद्ध्यनुरूपतः ॥ लयभोगाधिकाराय पर्याप्ता इति निश्चयः ॥ ९ ॥ मन्त्राध्वा च पदाध्वा च वर्णाध्वा चेति शब्दतः ॥ भुवनाध्वा च तत्वाध्वा कालाध्वा चार्थतः क्रमात् ॥ १० ॥ तत्रान्योऽन्य च सर्वेषां व्याप्यव्यापकतोच्यते ॥ मन्त्राः सर्वे पदै. व्याप्ता वाक्यभावात्पदानि च ॥ ११ ॥ वर्णैर्वर्णसमूहं हि पदमाहुर्विपश्चितः ॥ वर्णास्तु भुवनैर्व्याप्तास्तेषां तेषूपलम्भनात् ॥ १२ ॥ भुवनान्यपि तत्वौघैरंडस्यान्तर्बहिःक्रमात् ॥ व्याप्तानि कारणैस्त-

---

लाच मूलप्रकृति असें ह्मणतात, आणि तिलाच कुंडलिनीमाया ह्मणत असून उत्कृष्ट शुद्धाध्वस्वरूप असेंही ह्मणतात ( ८ ) त्या कुंडलिनी मायेचा विभाग केला असतां षडध्वस्वरूप व्यक्त होतात. त्यांत तीन शब्दाध्व असून तीन अर्थाध्व आहेत. ( ९ ) असो. सर्व प्राण्यांमध्यें ज्यांची ज्यांची शुद्धि जशी जशी असेल त्या त्या प्रमाणें लयभोगाचे अधिकार त्या त्या अध्वापासून मिळतात असा सिद्धांत निश्चयानें केला आहे. ( १० ) आतां मंत्राध्व, पदाध्व, वर्णाध्व असें तीन शब्दाध्व होत. भुवनाध्व, तत्वाध्व, कलाध्व असे तीन अर्थाध्व होत. ( ११ ) यांचा परस्परसंबंध असल्यामुळें ज्ञानी लोक या संबंधाला व्याप्यव्यापकभावसंबंध ह्मणतात. तो संबंध कसा आहे हें दाखवितात कीं, जितके मंत्र आहेत तितक्या मंत्रांत पदें आहेत, अर्थात पदांनीं व्याप्त मंत्र आहेत असें सिद्ध झालें. कारण सर्व मंत्र वाक्यरूप आहेत. अर्थात जगांत जितकीं वाक्यें आहेत तितक्यांत पदेंहीं आहेतच. ( १२ ) आतां पद ह्मणजे वर्णाचा समुदाय होय अर्थात पदेंहीं वर्णांनीं व्याप्त आहेत असें सिद्ध झालें. याचप्रमाणें मोठमोठ्या पंडितांचीं मतें आहेत. असो. तेच वर्ण सर्व भुवनांमध्यें ( लोकांमध्यें ) व्यापक होऊन आहेत. कारण त्या त्या भुवनांमध्यें अक्षरांची उपलब्धि होतेच होते. ( १३ ) आतां तें भुवन क्रमानें ब्रह्मांडाच्या आंत बाहेर व्याप्त होऊन राहिले आहेत. ते असे आहेत कीं, त्या त्या कार-

त्वैरारब्धत्वादनेकशः ॥ १३ ॥ अन्तरण्डस्थितानीह भुवनानि तु कानि चित् ॥ पौराणिकानि चान्यानि विज्ञेयानि शिवागमे ॥१४॥ सांख्ययोगप्रसिद्धानि तत्वान्यपि च कानिचित् ॥ शिवशास्त्रप्रसिद्धानि ततोऽन्यान्यपि कृत्स्नशः ॥ १५ ॥ कलाभिस्तानि तत्वानि व्याप्तान्येव यथातथम् ॥ परस्याः प्रकृतेरादौ पंचधा परिणामतः ॥ १६ ॥ कलाश्च ता निवृत्ताद्या व्याप्ताः पंच यथोत्तरम् ॥ व्यापिकातः परा शक्तिरविभक्ता षडध्वनाम् ॥१७॥ परप्रकृतिभावस्य तत्सत्वाच्छिवतत्वतः ॥ शक्त्यादि च पृथिव्यन्तं शिवतत्वसमुद्भवम् ॥ १८ ॥ व्याप्तमेकेन तेनैव मृदा कुम्भादिकं यथा ॥ शैवं तत्परमं

---

णांनीं त्या त्या तत्वांनीं आरब्ध ( आरंभ केले गेलेले ) झालेले आहेत ह्मणून जगाच्या आंत बाहेर व्याप्त होऊन अस्तित्वांत आहेत. ( १४ ) कांहीं भुवन [ लोक ] ब्रह्मांडाच्या आंत आहेत. याचें ज्ञान करून घ्यावयाचें झालें तर शिवागमांत पाहावें व पुराणामध्यें पाहावें ह्मणजे ज्ञान होईल ( १५ ) सांख्यामध्यें योगामध्यें कांहीं तत्व प्रसिद्ध आहेत ते तत्वही सर्व शिवशास्त्रांमध्यें प्रसिद्ध असून दुसरे कांहीं तत्वही यांत प्रसिद्ध आहेत ( १६ ) असे ते सर्व तत्व त्या त्या कलांनीं व्याप्त आहेत. प्रथमतः पराप्रकृतीचे परिणाम पांच प्रकारचे होत असल्यामुळें त्या त्या कलांनीं व्याप्त झाले आहेत असें समजावें. ( १७ ) आतां त्या कला ह्मणजे क्रमानें निवृत्ति वगैरे पांच कला होत. या कला पुढें पुढें प्राप्त होऊन राहिल्यामुळें षडध्वांमध्यें पराशक्तिही व्यापिकाशक्तीपासून अविभक्त ( निराळी न दिसणारी ) होऊन दिसते. ( १८ ) अशा या पराशक्तितत्वामध्यें शिवतत्वाचें सांनिध्य असल्यामुळें शक्तितत्वापासून पृथ्वीतत्वापर्यंत जितकीं तत्वें असतील त्या तत्वांचें उत्पादकतत्व ( उत्पन्न करणारें तत्व ) ह्मणजे शिवतत्व हेंच होय. ( १९ ) मातीनें घागरी वगैरे पदार्थ जसे व्याप्त आहेत, तसें शिवतत्वानें हें जग व्यापिलें गेलें आहे असें समजावें. अतएव या शिवतत्वाचें ज्ञान व्हावयास षडध्वशुद्धि करून घेतली पाहिजे अर्थात ज्याची ज्याची शुद्धि जशी जशी झाली

धाम यत्प्राप्यं षड्भिरध्वभिः ॥ १९ ॥ प्रापिका व्यापिका शक्तिः पंचतत्वविशोधनात् ॥ निवृत्त्या रुद्रपर्यन्ता स्थितिरण्डस्य शोध्यते ॥ २० ॥ प्रतिष्ठया तदूर्ध्वन्तु यावदव्यक्तगोचरम् ॥ तदूर्ध्वं विद्यया मध्ये यावद्विद्येश्वरावधि ॥ २१ ॥ शान्त्या तदूर्ध्वमध्वान्ते विशुद्धिः शान्त्यतीतया ॥ यामाहुः परमं व्योम परप्रकृतियोगतः ॥२२॥ एतानि पंच तत्वानि यैर्व्याप्तमखिलं जगत् ॥ तत्रैव सर्वमेवेदं द्रष्टव्यं खलु साधकैः ॥ २३ ॥ अध्वव्याप्तिमविज्ञाय शुद्धिर्यः कर्तुमि-

---

असेल तसतसें शिवतत्वज्ञानाचा लाभ होतो. ( २० ) प्रापिकाशक्ति ( पराशक्ति ) व्यापिका शक्ति ( पांच कला ) या दोनी शक्तींचा शोध केल्यावांचून ज्ञान होत नाहीं. तोच क्रम ( शुद्धीचा क्रम ) सांगतात कीं निवृत्तिनांवाच्या कलेच्या ज्ञानानें रुद्रापर्यंत ब्रह्मांडाची जी स्थिति आहे तिचा शोध होतो. (ती स्थिति कळते) ( २१ ) नंतर प्रतिष्ठा नांवाच्या कलेनें ( या कलेच्या ज्ञानानें ) रुद्राच्या पलीकडे अव्यक्त तत्वाची स्थिति जेथपर्यंत आहे तेथपर्यंत शुद्धि होते. (तेथपर्यंत ज्ञान मिळतें) नंतर विद्या नांवाच्या कलेनें [ कलेच्या ज्ञानानें ] अव्यक्ताच्या पलीकडे मध्यभागीं असणाऱ्या विद्येश्वराच्या स्थितीपर्यंत शोध होतो. ( तेथपर्यंत ज्ञान होतें ) ( २२ ) नंतर शांति नांवाच्या कलेनें ( कलेच्या ज्ञानानें ) विद्येश्वरापलीकडे असणाऱ्या अध्वापर्यंत शुद्धि होते. ( त्याच्या पलीकडे असलेल्या मार्गाचें ज्ञान होतें. ) नंतर शेवटच्या शांत्यतीत नांवाच्या कलेनें ( कलेच्या ज्ञानानें ) विशुद्धि होते. [ परतत्वाचें ज्ञान होतें. ] परप्रकृतीच्या संबंधामुळें या शांत्यतीत कलेला पराकाश असें ह्मणतात. ( अर्थात पराकाशाचें ज्ञान झालें असतां परतत्वाचें ज्ञान होतेंच यांत नवल नाहीं ) ( २३ ) असो. हीं जीं पंचतत्वें आहेत या तत्वांनीं हें जग व्यापिलें आहे, करितां साधकानें ( साधन करून घेणारानें ) या जगामध्येंच सर्व कांहीं पाहावें ( या जगाचें ज्ञान करून घ्यावें ) ( २४ ) या षडध्वाची जी व्याप्ति आहे तिचें ज्ञान झाल्यावांचून जो शुद्धि करून घेण्याची इच्छा करतो [ व्याप्ति कळल्यावांचून परतत्वाचे ज्ञान करून घे-

च्छति ॥ स विप्रलम्भकः शुद्धेर्नालं प्रापयितुं फलम् ॥ २४ ॥ वृथा परिश्रमस्तस्य निरयायैव केवलम् ॥ शक्तिपातसमायोगादृते तत्वानि तत्वतः ॥ २५ ॥ तद्व्याप्तिस्तद्विशुद्धिश्च ज्ञातुमेव न शक्यते ॥ शक्तिराज्ञा परा शैवी चिद्रूपा परमेश्वरी ॥ २६ ॥ शिवोऽधितिष्ठत्यखिलं यया करणभूतया ॥ नात्मनो नैव मायैषा न विकारो विचारतः ॥ २७ ॥ न बन्धो नापि मुक्तिश्च बन्धमुक्तिविधायिनी ॥ सर्वैश्वर्यपरा काष्ठा शिवस्याव्यभिचारिणी ॥ २८ ॥ समानधर्मिणी तस्य तैस्तैर्भावैर्विशेषतः ॥ स तयैव गृही सापि तेनैव गृहिणी सदा ॥ २९ ॥ तयोरपत्यं यत्कार्यं परप्रकृतिजं जगत् ॥ स कर्ता करणं

---

ण्याची इच्छा करतो ] तो प्राणी विप्रलंभक ( कपट करणारा ) जाणावा. आणि त्याला शुद्धीचें ( ज्ञानाचें ) फल मिळत नाहीं. ( २५ ) शिवाय त्याचे ते श्रम व्यर्थ होऊन उलट नरकाला साधन करून घेतल्याप्रमाणें मात्र होतें. वस्तुतः शक्तिपात झाल्यावांचून ( श्रम केल्यावांचून किंवा शक्ति व कला यांचें ज्ञान झाल्यावांचून ) तत्वाचें ज्ञान होत नाहीं ( २६ ) आणि त्या तत्वाच्या व्याप्तीचें विशुद्धीचें ज्ञान होऊं शकत नाहीं. शक्ति ह्मणजे उत्कृष्ट शैवी [ शिवाची ] आज्ञा होय. ती चिद्रूप असून तिला परमेश्वरी असें ह्मणतात. ( २७ ) ही शैवी आज्ञा शिवाजवळ एक प्रकारचें साधन [ जगाची उत्पत्ति करावयास साधन ] होऊन राहिली आहे. तथापि त्या आत्म्याला [ शिवाला ] माया नाहीं, व तिच्यापासून इतराप्रमाणें विकार नाहीं, आणि अविचारानें ह्मणजे ( अज्ञानानें ) ( २८ ) त्याला बंध नाहीं मुक्ति नाहीं. परंतु बंधमोक्षाला देणारी सर्व ऐश्वर्य जिच्याजवळ आहेत अशी ती काष्ठारूपी माया शिवाला सोडून न जाणारी ( अव्यभिचारिणी ) असून ( २९ ) शिवाची समान धर्मिणी ( अर्धांगी ) होऊन राहिली आहे. विशेषेंकरून त्या त्या भावांनीं त्याच्याजवळ ( शिवाजवळ ) राहते ह्मणून शिवाला गृही ( गृहस्थाश्रमी ) असें ह्मणतात. आणि तिला गृहिणी ( बायको ) असें ह्मणतात. ( ३० ) अशा या दांपत्यापासून संतति ह्मणजे हें जग होय. हें जग परप्रकृतीपासून ( मायेच्या पोटीं शिवापासून ) उत्पन्न झालें. एकूण जगाचा उत्प-

सोति तयोर्भेदो व्यवस्थितः ॥ ३० ॥ एक एव शिवः साक्षाद्विधा सौ समवस्थितः ॥ स्त्रीपुंसभावेन तयोर्भेद इत्यपि कचन ॥ ३१ ॥ अपरे तु परा शक्तिः शिवस्य समवायिनी ॥ प्रभेव भानोश्चिद्रूपा भिन्नैवेति व्यवस्थितिः ॥ ३२ ॥ तस्माच्छिवः परो हेतुस्तस्याज्ञा परमेश्वरी ॥ तयैव प्रेरिता शैवी मूलप्रकृतिरव्यया ॥ ३३ ॥ महामाया च माया च प्रकृतिस्त्रिगुणेति च ॥ त्रिविधा कार्यभेदेन सा प्रसूते षडध्वनः ॥३४॥ वागर्थमयश्चाध्वा षड्विधो निखिलं

---

त्तिकर्त्ता शिव असून ती माया जगाची सृष्टि करावयास साधन होऊन शिवासन्निध आहे. असें सि॒द्ध झालें. अर्थात दोघांमध्यें कर्ता एक आणि करण ( साधन ) एक असा भेद आहे असें झालें. ( ३१ ) खरें पाहिलें असतां शिव हा एकटाच असून स्त्री आणि पुरुष असे दोन रूप त्यानें घेतले ह्मणून परस्परांमध्यें भेद आहे असें कैक विद्वानांचें मत आहे. ( ३२ ) इतर लोक असेंही ह्मणतात कीं पराशक्ति आणि शिव यांच्यामध्यें समवायसंबंध आहे ( अर्थात शक्ति ह्मणजे शिवाचा अवयव ) जगांत सूर्याच्या किरणांमध्यें सूर्यांमध्यें जसा समवायसंबंध आहे ( किरण हे सूर्याचे अवयव जसे आहेत) तसें ही माया शिवाचा अवयव आहे (३३) अतएव शिव हा मूलकारण असून शक्ति ही शिवाची आज्ञा होय तिला परमेश्वरी असे ह्मणतात. हीच शक्ति शिवासंबंधीं अव्यय अशा मूलप्रकृतीला जगाची सृष्टि करावयास प्रेरणा करिते ( ३४ ) तीच मूलप्रकृती महामाया, माया, त्रिगुणात्मकप्रकृति अशीं तीन रूपें घेती, आणि तदनुसार कार्य करीत फिरती. शिवाय हिच्यापासूनच षडध्व झाले आहेत. ( ३५ ) हे षडध्व ह्मणजे शब्दरूपी तीन आणि अर्थरूपी तीन असे सहा आहेत, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. अशा षडध्वानींच हें जग

जगत् ॥ अस्यैव विस्तरं प्राह शास्त्रजातमशेषतः ॥ ३९ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे षडध्व-कथनं नाम पंचविंशोऽध्यायः ॥ २५ ॥

---

व्यापिलें आहे. शास्त्रांमध्यें सुद्धां सविस्तर रीतीनें सर्व ठिकाणीं याच षड-ध्वाचे प्रकार सांगितले आहेत.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील पूर्वभागांतील षडध्वकथननांवाचा पंचविसावा अध्याय संपला.



## ॥ अथ षड्विंशोऽध्यायः ॥

ऋषय ऊचुः ॥ चरित्राणि विचित्राणि गुह्यानि गहनानि च ॥ दुर्विज्ञेयानि देवस्य मोहयंति मनांसि नः ॥ १ ॥ शिवयोस्तत्वसंबोधे न दोष उपलभ्यते ॥ चरितैः प्राकृतो भावस्तयोरपि विभाव्यते ॥ २ ॥ ब्रह्मादयोऽपि लोकानां सृष्टिस्थित्यन्तहेतवः ॥ निग्रहानुग्रहौ प्राप्य शिवस्य वशवर्तिनः ॥ ३ ॥ शिवः पुनर्न कस्यापि निग्रहानुग्रहास्पदम् ॥ अतोऽनतिशयैश्वर्यं तस्यैवेति विनिश्चितम् ॥ ४ ॥ यच्चेदमीदृगैश्वर्यं तत्तु स्वातंत्र्यलक्षणम् ॥ स्वभावसिद्धं चैतस्य मूर्तिमत्तास्पदं भवेत् ॥ ५ ॥ न मूर्तिश्च स्वातं-

---

ऋषी ह्मणालेः—( १ ) हे वायो, श्रीशिवाचें चरित्र विचित्र असून गौप्य व गहन आहे, ह्मणून समजण्यास फार श्रम लागतात. त्यामुळें आमच्या मनाला मोह येतो. ( २ ) त्या शिवपार्वतीच्या तत्वज्ञानामध्यें थोडा सुद्धां दोष नाहीं, आणि त्या दोघांनीं ( शिवपार्वतींनीं ) आपलीं अनेक चरित्रें दाखविलीं त्यामुळें प्राकृतचेष्टा यांच्याजवळ आहेत काय ? अशी एक मनाची कल्पना होते. ( ३ ) या जगाच्या सृष्टीला पालनाला, नाशाला ब्रह्मादिदेव सुद्धां कारण असून शिवाच्या निग्रहाला ( शिक्षेला ) अनुग्रहाला ( कृपेला ) पात्र होऊन शिवाच्या ताब्यांत राहिले आहेत. ( ४ ) परंतु शिव मात्र कोणाच्या निग्रहानुग्रहाला पात्र नसून कोणाच्याहा ताब्यांत नाहीं. अतएव शिवाचें ऐश्वर्य फार मोठें आहे असें निश्चित झालें आहे. ( ५ ) ज्याअर्थीं असें ऐश्वर्य आहे, त्याअर्थीं तो परम स्वतंत्र ह्मणून गायिला जातो. आणि स्वातंत्र्याचें लक्षण तें हेंच आहे. हें त्याचें स्वातंत्र्य हें त्याचें ऐश्वर्य स्वभावसिद्धच आहे प्राकृताप्रमाणें कोठूनही उसनें आणलेलें नाहीं ( ६ ) अशा स्वतंत्र मूर्तीला

न्त्रस्य घटते मूलहेतुना ॥ मूर्त्तेरपि च कार्यत्वात्तत्सिद्धिः स्यादहैतुकी ॥ ६ ॥ सर्वत्र परमो भावो भावो नान्यश्च कथ्यते ॥ परमापरमौ भावौ कथमेकत्र संगतौ ॥ ७ ॥ निष्कलो हि स्वभावोऽस्य परमः परमात्मनः ॥ स एव सकलः कस्मात्स्वभावो ह्यविपर्ययः ॥ ८ ॥ स्वभावोऽपि विपर्यस्येत्स्वतन्त्रस्येच्छया यदि ॥ न करोति किमीशानो नित्यानित्यविपर्ययम् ॥ ९ ॥ मूर्त्यात्मा सकलः कश्चित्स चान्यो निष्कलाच्छिवात् ॥ शिवेनाधिष्ठितश्चेति सर्वत्र खलु कथ्यते ॥ १० ॥ मूर्त्यात्मैव तदा मूर्तिः शिवस्यास्य भवेदिति ॥ तस्यां मूर्तौ मूर्तिमतः पारतंत्र्यं हि निश्चितम् ॥ ११ ॥ अन्यथा

---

( शिवाच्या शरीराला ) मूलकारण कोणतेंही नाहीं. परंतु, कांहीं लोक असें ह्मणतील कीं, कार्य हें कारणावांचून घडत नाहीं तर शिवाची मूर्ति ही कार्यरूप असून याला कारण कसें नाहीं तर याला उत्तर देतात कीं, आपल्या मूर्तीला आपणच कारण आहे दुसरें नाहीं. अतएव ती मूर्ति अहेतुकी ( कारण नसलेली ) अशी प्रसिद्ध झाली आहे. ( ७ ) तेव्हां याच्यावरून सर्व ठिकाणीं परमभावच आहे, अर्थात दुसरा अपरमभाव नाहींच असें सिद्ध झालें, तर आतां हे वायो, आमचा प्रश्न असा आहे कीं, एका ठिकाणीं परमभाव आणि अपरमभाव हे दोन्ही मिळाले कसे ? ( ८ ) हा परमभाव ह्मणजे साक्षात् शिवाचा स्वभाव निष्फल असून तोच स्वभाव सकल ( कलासहित ) कसा झाला ? व कारण काय ? अशा अविपरीत स्वभावाच्या स्थितीचें वर्णन कर ( ९ ) स्वतंत्र अशा शिवाच्या स्वेच्छेनें स्वभाव वाटेल तसा होऊं शकतो, असें ह्मणाल तर समर्थ असा शिव नित्य आणि अनित्य याचा विपर्यास करीत नाहीं कीं काय ? ( १० ) किंवा सकल असा मूर्त्यात्मा शिवाव्यतिरिक्त दुसराच आहे असें ह्मणाल तर सर्वत्र शिवाचेंच अधिष्ठान आहे असें सांगितलें आहे हें कसें? ( ११ ) मूर्त्यात्मक मूर्ति शिवाचीच आहे असें जर सिद्ध होईल तर शिवाच्या त्या मूर्तीच्या ठिकाणीं पारतंत्र्य आहे असें निश्चयानें कबूल करावें लागेल ? ( १२ ) नाहीं तर तो शिव निरपेक्ष आहे असें सांगाल तर

निरपेक्षेण मूर्तिः स्वीक्रियत कथम् ॥ मूर्तिस्वीकरणं तस्मान्मूर्त्तिसाध्यफलेप्सया ॥ १२ ॥ न हि स्वेच्छाशरीरत्वं स्वातंत्र्यायोपपद्यते ॥ स्वेच्छैव तादृशी पुंसां यस्मात्कर्मानुसारिणी ॥ १३ ॥ स्वीकर्तुं स्वेच्छया देहं हातुं च प्रभवंत्युत ॥ ब्रह्मादयः पिशाचांताः किं ते कर्मातिवर्तिनः ॥ १४ ॥ इच्छया देहनिर्माणमिंद्रजालोपमं विदुः ॥ अणिमादिगुणैश्वर्यवशीकारानतिक्रमात् ॥ १५ ॥ विश्वरूपं दधद्विष्णुर्दधीचेन महर्षिणा ॥ युध्यता समुपालब्धस्तद्रूपं दधता स्वयम् ॥ १६ ॥ सर्वस्मादधिकस्यापि शि-

---

अशा शिवानें मूर्तीचा स्वीकार कां केला ? व कसा कला ? मूर्तीनें साध्य होणाऱ्या फलाची आकांक्षा धरून मूर्तीचा स्वीकार करणें शिवाला युक्त दिसत नाहीं. ( १३ ) आपणच सांगा कीं, स्वतंत्र वस्तूला स्वेच्छेनें कां होईना परंतु, मूर्तीचा स्वीकार करणें हें युक्त दिसतें कां ? स्वेच्छा ह्मणजे पुरुषाची वासना ती अशीच आहे कीं, कर्माला अनुसरून चालणारी आहे. ज्याअर्थीं कर्मानुसारिणी स्वेच्छा आहे. ( १४ ) त्याअर्थीं स्वेच्छेनें देहत्यागही केला पाहिजे असें ह्मणावें लागेल. आतां ब्रह्मादिकांपासून पिशाचापर्यंत जितक्या ह्मणून मूर्ति आहेत तितक्या त्या मूर्ति कर्माच्या पलीकडे आहेत कीं काय ? असाही संशय येणार आहे. ( १५ ) आतां आपण ह्मणता कीं, स्वेच्छेनें मूर्तीचा स्वीकार करण्याची शक्ति शिवाची आहे, असें जर आपलें मत असेल तर शिवाजवळ गारुडी विद्या आहे असें ह्मणवावें लागेल, कारण जगांत गारुडी लोक अशी चलाखी करतात. कदाचित् असे कोणी असतील तर ते अणिमादि ऐश्वर्यापासून अलिप्त आहेत त्याप्रमाणें हा शिव आहे कीं काय ? ( १६ ) पूर्वीं एकदां दधीचिऋषीचें आणि विष्णूचें युद्ध झालें, त्यावेळीं मुनीला भीति दाखविण्याकरितां विष्णूनें विश्वरूप दाखविलें, तेव्हां तें पाहून दधीचीनें त्याच्याहीपेक्षां भयंकर असें विश्वरूप विष्णूला दाखविलें. ( १७ ) त्याप्रमाणें सांप्रत सर्वांपेक्षां श्रेष्ठ परमात्म्या शिवाला शरीर आहे असें ह्मणताक्षणींच

वस्य परमात्मनः ॥ शरीरवत्तयान्यात्मसाधर्म्यं प्रतिभाति नः ॥१७॥ सर्वानुग्राहकं प्राहुः शिवं परमकारणम् ॥ स निगृह्णाति देवादीन्सर्वानुग्राहकः कथम् ॥ १८ ॥ बिभेद बहुशो देवो ब्रह्मणः पंचमं शिरः ॥ विष्णोरापि नृसिंहस्य रभसा शरभाकृतिः ॥१९॥ बिभेद पद्भ्यामाक्रम्य हृदयं नखरैः खरैः ॥ देवस्त्रीषु च देवेषु दक्षस्याध्वरकारणात् ॥२०॥ वीरभद्रेण वीरेण न हि कश्चिददंडितः पुरत्रयं च सस्त्रीकं सदैसं सह बालकैः ॥ २१ ॥ क्षणेनैकेन देवेन नेत्राग्नेरिन्धनीकृतम् ॥ प्रजानां रतिहेतुश्च कामो रतिपतिः स्वयम् ॥२२॥ क्रोशतामेव देवानां हुतो नेत्रहुताशने ॥ गावश्च काश्चिद्दुग्धौघं स्त्रवन्त्यो मूर्ध्नि खेचराः ॥ २३ ॥ सरुषा प्रक्ष्य देवेन

---

शरीर असणाऱ्या दुसऱ्या प्राण्याच्या बरोबरीला हा शिव आला असा आह्माला भास होतो याची काय वाट ? ( १८ ) आणखी परमकारण शिव हा सर्वाला अनुग्रह करणारा आसून देवादिकांना शासन करितो, तर सर्वाला अनुग्रह करणारा कसा झाला ? हा संशय येतो. ( १९ ) श्रीशिवानें पुष्कळ कर्में केलीं त्यांपैकीं उदाहरणार्थ ह्मणजे ब्रह्मदेवाचें पांचवें डोकें कांपलें, आणि नरहरीचें रूप घेतलेल्या विष्णूला पाहून आपण अति वेगानें शरभाचा अवतार घेऊन ( २० ) पायांनीं त्याच्या उरावर तुडवून तीक्ष्ण नखांनीं त्याचें हृदय फाडिलें. तिसरें असें कीं, देवांगना जमल्या असून सर्व देव जमले होते, अशा त्या दक्षाच्या यज्ञामध्यें दक्षाचा नाश करावयास वीरभद्राची सृष्टि केली. ( २१ ) नंतर वीरभद्रानें सर्व देवांसकट दक्षाची फजिती केली, पुनः शिवानें पोरांबाळांसहित त्यांच्या बायकांसहित त्रिपुराचा ध्वंस केला. ( २२ ) शिवाय एका क्षणांत प्रभूनें त्रेताग्नीचें मातेरें करून टाकिलें. आणखी सर्व प्रजेला रति देणारा रतिपति कामाकरितां ( २३ ) सर्व देव आक्रोश करून घेत असतां तें लक्षांत न आणतां त्या बिचाऱ्याला जाळून टाकिलें. आणि त्यावर कांहीं गायी व कांहीं यक्ष वगैरे त्यावर दुधाचा वर्षाव करीत असतां ( २४ ) देवानें त्यांच्यावर विनाकारण संताप करून तत्काळ

तत्क्षणाद्भस्मसात्कृताः ॥ जलन्धरासुरोदीर्णश्चक्रीकृत्य जलं पदा ॥ २४ ॥ बध्वानंतेन यो विष्णुं चिक्षेप शतयोजनम् ॥ तमेव जलसंधाय शूलेनैव जघान सः॥२५॥तच्चक्रं तपसा लब्ध्वा लब्धवीर्यो हरिः सदा ॥ जिघांसते सुरारीणां कुलं निर्घृणचेतसाम् ॥ २६ ॥ त्रिशूलेनांधकस्योरः शिखिनेवोपतापितम् ॥ कण्ठात्कालांगनां सृष्ट्वा दारुकोऽपि निपातितः ॥ २७ ॥ कौशिकीं जनयित्वा त गौर्यास्त्वक्कोशगोचराम् ॥ शुम्भः सह निशुम्भेन प्रापितो मरणं रणे ॥२८॥ श्रुतं च महदाख्यानं स्कान्दे स्कन्दसमाश्रयम् ॥ वधार्थे तारकाख्यस्य दैत्येन्द्रस्येन्द्रविद्विषः ॥ २९ ॥ ब्रह्मणाभ्यर्थितो देवो मन्दः

---

भस्मवत् साफ करून टाकिलें. आणि आपल्या ( शिवाच्या ) पायाच्या अंगठ्यानें पाणी गरगर फिरवून पाण्यावर चक्ररेषा काढून बिचाऱ्या जलंधराला शिवानें मारून टाकिलें. ( २५ ) तो जलंधर असा पराक्रमी होता कीं, पूर्वी अनंत नांवाच्या सापानें आवळून शंभर योजनपर्यंत त्या जलंधरानें श्रीविष्णूला फेंकून दिले, अशा पराक्रमी जलंधराला पाण्यांतच चक्रानें शिवानेंच मारून टाकिलें ( २६ ) पुढें कडक तप करून मोठा पराक्रम मिळवून शिवापासून तें चक्र विष्णूनें मागून घेतलें. नंतर देवांशीं द्वेष करणाऱ्या क्रूर दैत्यांचा वंश त्यानें नाश करून टाकिला. (२७) पुनः अंधकासुराच्या उरांत त्रिशूल खुपसून त्याच्या ज्वाळेनें त्या दैत्याचें ऊर शिवानेंच जाळून टाकिलें आणि कालांगना नांवाची स्त्री उत्पन्न करून दारुकासुराला यानेंच मारिलें. ( २८ ) आपण इतकें करावयाचें करून शिवाय सतीच्या त्वचेपासून कौशिकी नावाच्या स्त्रीला उत्पन्न करावयास सांगून त्या कौशिकीकडून शुंभनिशुंभ नांवाच्या दोघां बंधूंचे प्राण यानेंच घेवविले. ( २९ ) आणि इंद्राशीं द्वेष करणाऱ्या तारकासुराला षण्मुखाकडून यानेंच मारविलें. ही कथा स्कांदपुराणांत आम्ही ऐकिली. ( ३० ) आणि पूर्वी ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्याबरोबर विहाराच्या

रान्तःपुरं गतः ॥ विहृत्य सुचिरं देव्या विहारातिप्रसंगतः ॥ ३० ॥ रसां
रसातलं नीतामिव कृत्वाभिघाततः ॥ देवीं च वंचयंस्तस्यां
स्ववीर्यमतिदुर्वहम् ॥ ३१ ॥ अविसृज्य विसृज्याग्नौ हविः पूतमिवाऽमृ-
तम् ॥ गंगादिष्वपि निक्षिप्य वन्हिद्वारा तदंशतः ॥ ३२ ॥ ततसमाहृत्य
शनकैः स्तोकं स्तोकमितस्ततः ॥ स्वाहया कृत्तिकारूपात्स्वभर्त्रा रम-
माणया ॥ ३३ ॥ सुवर्णीभूतया न्यस्तं मेरौ शरवणे क्वचित् ॥ सन्दीप-
यित्वा कालेन तस्य भासा दिशो दश ॥ ३४ ॥ रंजयित्वा गिरीन्सर्वा-
न्कांचनीकृत्य मेरुणा ॥ ततश्चिरेण कालेन संजाते तत्र तेजसि ॥ ३५ ॥
कुमारे सुकुमारांगे कुमाराणां निदर्शने ॥ तच्छैशवं स्वरूपं च तस्य दृष्ट्वा

---

निमित्तानें मंदर पर्वताच्या शिखरावर असलेल्या राजवाड्यांत शिरून देवीबरोबर यथेच्छ याच शिवानें पुष्कळ वेळ क्रीडा केली. ( ३१ ) नंतर अभिघातानें ( ताडनानें ) भूमीला रसातलाला न्यावयाचा बाहणा केला. याचें कारण असें होतें कीं, देवीला फसवावयाचें होतें ह्मणून शिवानें तसें केलें. परंतु धरावयास अशक्य असें आपलें वीर्य तिच्या ( भूमीच्या ) गर्भांत किंवा पार्वतीच्या गर्भांत ( ३२ ) न ठेवतां पवित्र हविष्याप्रमाणें अग्नीच्या ठिकाणीं तें ( वीर्य ) सोडिलें, आणि अमृताप्रमाणें गंगा वगैरे नद्यांमध्येंही अग्नीच्या मार्फत अंशानें टेविलें. ( ३३ ) नंतर स्वाहेनें कृत्तिकेचें रूप घेऊन आपल्या पतीबरोबर विलास करतांना इकडे तिकडे थोडथोडें पडलेलें तें शिवाचें वीर्य आपल्या गर्भांत ठेऊन घेतलें. ( ३४ ) त्या योगानें कृत्तिकेचें रूप सोन्याचें झालें, त्यामुळें तें वीर्य सहन न होऊन मेरुपर्वतावर पुष्कळ दर्भ उगवले होते, त्याठिकाणीं कृत्तिकेनें सोडून टाकिलें. नंतर त्या वीर्याचा प्रकाश जिकडे तिकडे पडल्यामुळें दाहीदिशा प्रदीप्त झाल्या. ( ३५ ) त्या शिवाच्या वीर्याच्या सामर्थ्यानें मेरु सोन्याचा होऊन इतर पर्वतांवर सुद्धां मेरूनें प्रकाश पाडिला. पुढें पुष्कळ दिवसांनीं तें त्या तेजाचा ( वीर्याचा ) आकार बनत चालला. ( ३६ ) सुकुमार ज्याचे अवयव असून सर्व लहान पोरांमध्यें जो अतिशय सुंदर होता, तोच कुमार या नांवाचा मागें सांगितलेला आकार होय.

मनोहरम् ॥ ३६ ॥ सह देवासुरैर्लोकैर्विस्मिते च विमोहिते ॥ देवो ऽपि स्वयमायातः पुत्रदर्शनलालसः ॥ ३७ ॥ सह देव्यांकमारोप्य तत्तस्य स्मेरमाननम् ॥ पीत्वामृतमिव स्नेहविवशेनान्तरात्मना ॥ ३८॥ देवेष्वपि च पश्यत्सु वीतरागैस्तपस्विभिः ॥ स्वस्य वक्षःस्थले रंगे नर्त्तयित्वा कुमारकम् ॥ ३९ ॥ अनुभूय च तत्क्रीडां सम्भाष्य च परस्परम् ॥ स्तन्यमाज्ञापयद्देव्याः पाययित्वामृतोपमम् ॥ ४० ॥ तवावतारो जगतां हितायेत्यनुशास्य च ॥ स्वयं देवश्च देवी च न तृप्तिमुपजग्मतुः ॥ ४१ ॥ ततः शक्रेण सन्धाय बिभ्यता तारकासुरात् ॥ कारयित्वाभिषेकं च सैनापत्ये दिवौकसाम् ॥ ४२ ॥

---

असें तें बाळपणचें सुंदर स्वरूप पाहून ( ३७ ) देव दैत्य सर्व आश्चर्यचकित झाले, व मोहित झाले. तितक्यांत पुत्राला पाहण्याच्या लालसेनें साक्षात शिवही तेथें आले. ( ३८ ) नंतर देवीला एका मांडीवर आणि दुसऱ्या मांडीवर त्या मुलाला घेऊन त्या मुलाचें हास्यमुख पाहून त्या प्रीतीनें देहभान विसरून अंतःकरणपूर्वक गोड अमृताप्रमाणें शिवानें मुलाच्या मुखाचें पान वरचेवर केलें ( अतिशय टक लाऊन पाहिलें ) ( ३९ ) नंतर तेथें आलेल्या सर्व देवांनीं पाहून आपल्या उरावर त्या कुमाराला खेळविलें, व ज्यांच्या स्वप्नामध्येंही स्नेहाचा ( प्रीतीचा ) अंश नाहीं, अशा मोठमोठ्या तपस्व्यांनीं सुद्धां त्या कुमाराला घेऊन आपल्या उरावर नाचविलें. ( ४० ) याप्रमाणें बाळलीलेचा उपभोग घेऊन आलेल्या देवादिक ऋष्यादिक मंडळींशीं आनंदानें संभाषण करून मुलाला आंगावर घेण्याकरितां देवीला शिवानें आज्ञा केली. नंतर बाजूला होऊन कुमाराला पोट भरेपर्यंत देवीनें अमृततुल्य स्तन्य पाजविलें. ( ४१ ) मग देवानें ( शिवानें ) त्या कुमाराला ह्मटलें कीं, बाळा, हा तुझा अवतार जगाच्या कल्याणाकरितां आहे बरें? असें सांगून मुलाकडे दोघांनीं ( शिवपार्वतींनीं ) अतिशय पाहिलें. परंतु, किती वेळ पाहिलें तरी त्यांची तृप्ति कांहीं झाली नाहीं. ( ४२ ) इतक्यांत तारकासुराच्या त्रासानें भ्यालेल्या इंद्रानें शिवाला विनंती करून त्या कुमारास आपल्या सर्व सेनेच

पुत्रमन्तरतः कृत्वा देवेन त्रिपुरद्विषा ॥ स्वयमन्तर्हितेनैव स्कन्दमिन्द्राभिरक्षितम् ॥ ४३ ॥ तच्छक्त्या क्रौंचभेदिन्या युधि कालाग्निकल्पया ॥ छेदितं तारकस्यापि शिरः शक्रभिया सह ॥ ४४ ॥ तथा रक्षोऽधिपः साक्षाद्रावणो बलगर्वितः ॥ उद्धरन्स्वभुजैर्दीर्घैः कैलासं गिरिमात्मनः ॥ ४५ ॥ तदागोऽसहमानस्य देवदेवस्य शूलिनः ॥ पादांगुष्ठपरिस्पन्दान्ममज्ज मृदितो भुवि ॥४६॥ बटोः कस्यचिदर्थेन स्वाश्रितस्य गतायुषः ॥ त्वरयागत्य देवेन पादान्तं गमितोऽन्तकः ॥ ४७ ॥ स्ववाहनमविज्ञाय वृषेन्द्रं वडवानलः ॥ सगलग्रहमानीतस्ततस्त्वेकोदकं जगत् ॥ ४८ ॥ अलोकविदितैस्तैस्तैर्नृत्यैरानन्दसुन्दरैः ॥ अंगहारवशेनेदमसकृच्चलितं जगत् ॥ ४९ ॥

---

आधिपत्य दिलें. ( ४३ ) नंतर त्रिपुरद्वेषी शिवानें इंद्राचें रक्षण करणाऱ्या स्कंद नांवाच्या आपल्या पुत्राला मध्यें करून आपण गुप्त रूपानें राहून ( ४४ ) क्रौंचासारख्या पर्वताला सुद्धां विदारण करणाऱ्या व दुसरा कालाग्नीच काय याप्रमाणें दिसणाऱ्या अशा स्कंदाच्या हातांतल्या शक्तीनें तारकासुराचा शिरछेद केला, व इंद्राची भीति नाहींशी करून टाकली ( ४५ ) ज्यानें आपल्या हातांनीं कैलासपर्वत झेलला, अशा रावणाला जेव्हां आपल्या सामर्थ्याचा गर्व झाला, (४६) तेव्हां देवाधिदेव शिवाला त्या रावणाचा अपराध सहन झाला नाहीं, त्यामुळें नुसता आपल्या (शिवाचा) पायाचा आंगठा हलवून कैलासाला भूमींत बुडवून रावणाला माती खावयास याच शिवानें लाविलें. ( ४७ ) कोणत्या एका कारणानें एका बटूनें ( ब्रह्मचारीनें ) शिवाचा आश्रय केला होता, परंतु त्या मुलाचें आयुष्य संपलें असून त्याचा मृत्यु जवळ आला होता, तथापि याच शिवानें तत्काल येऊन त्या अंतकाला आपल्या पायाखालीं तुडवून मुलाला वांचविलें. ( ४८ ) वडवानलानें आपलें वाहन आहे, असें लक्ष्यांत न आणितां नंदीच्या गळ्यांत बांधून आकर्षण केलें, त्यामुळें एकदम जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन जगाचा प्रळय झाला. ( ४९ ) याप्रमाणें अलौकिक अशा त्या त्या नृत्यांनीं शिवानें यथेछ क्रीडा केल्या. आनंदानें सुंदर सुंदर नर्तनें करून त्या नर्तनानें सर्व जग शिवानें हालवून सोडिलें.

शान्त एव सदा सर्वमनुगृह्णाति चेच्छिवः ॥ सर्वान्युगपदेवैष कथं शक्तो न मोचयेत् ॥ ५० ॥ अनादिकर्मवैचित्र्यमपि नात्र नियामकम् ॥ कारणं खलु कर्मापि भवेदीश्वरकारितम् ॥ ५१ ॥ किमत्र बहुनोक्तेन नास्तिक्यं हेतुकारितम् ॥ यथास्माद्धु निवर्तेत तथा कथय मारुत ॥ ५२ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे षड्विंशोऽध्यायः ॥ २६ ॥

---

( ५० ) असा तो शिव सर्वदां शांत असून ज्याच्या त्याच्यावर अनुग्रह करीत असेल तर एकाच वेळेला सर्वांना या संसारयातनेंतून मुक्त करावयास तो समर्थ शिव कां प्रवृत्त होत नाहीं बरें ? ( ५१ ) कदाचित् बंधमोक्षाला हें विचित्र अनादिकर्म ( परंपरा चालत आलेलें ) कारण आहे, असें ह्मणाल तर कर्म सुद्धां ईश्वरानेंच करविलें आहे ना ? मग कारणाला कारण ईश्वरच झाला मग सर्वांना कां सोडवूं नये ? ( ५२ ) मारुता, विशेष चिकित्सा करण्यांत मतलब नाहीं, मुख्य आमचा प्रश्न एवढाच आहे कीं, बंधमोक्षाला कारण झालेल्या कर्माबद्दल ह्मणा, किंवा कर्माला कारण ईश्वराबद्दल ह्मणा आमच्या मनांत नास्तिकपणा वाढत चालला, तो नास्तिकपणा कसा नाहींसा होईल हें सांगा.

यांप्रमाणें वायवीयसंहितेंतील शैवमहापुराणांतील पूर्वभागांतील सव्वीसावा अध्याय संपला.



## ॥ अथ सप्तविंशोऽध्यायः ॥

वायुरुवाच ॥ स्थाने संशयितं विप्रा भवद्भिर्हेतुचोदितैः ॥ जिज्ञासा हि न नास्तिक्यं साधयेत्साधुबुद्धिषु ॥ १ ॥ प्रमाणमत्र वक्ष्यामि सतां मोहनिवर्त्तकम् ॥ असतान्त्वन्यथाभावः प्रसादेन विना प्रभोः ॥ २ ॥ शिवस्य परिपूर्णस्य परानुग्रहमन्तरा ॥ न किंचिदपि कर्त्तव्यमिति साधु विनिश्चितम् ॥ ३ ॥ स्वभाव एव पर्याप्तः परानुग्रहकर्मणि ॥ अन्यथा निःस्वभावेन न किमप्यनुगृह्यते ॥ ४ ॥ परं सर्वमनुग्राह्यं पशुपाशात्मकं जगत् ॥ परस्यानुग्रहार्थं

---

वायु ह्मणालाः—( १ ) ब्राह्मणहो, तुह्माला योग्य ठिकाणीं सकारण संशय आला आहे, परंतु, विचार करावयास सवड असतां विचारी मनुष्यानें आपल्या चांगल्या बुद्धींत नास्तिकपणाला जागा कधींही देऊं नये. ( २ ) तुह्मी सज्जन आहांत अतएव तुमच्या मनांत मोह ठेवणें योग्य नव्हे, यामुळें संशय दूर करण्याकरितां प्रमाणपूर्वक वाक्य सांगतों. जे दुष्ट असतील त्यांच्यावर शिवाचा प्रसाद उत्कृष्ट होत नसल्यामुळें त्यांची बुद्धि नेहमीं विपरीत चालते. ( ३ ) परिपूर्ण शिवानें अनुग्रह केल्यावांचून ( शिवाचा उत्कृष्ट अनुग्रह झाल्यावांचून ) जगांत इतिकर्तव्य कोणतेंही नाहीं, असें निश्चित झालें आहे. किंवा दुसरा अर्थ असा आहे कीं, परिपूर्ण अशा शिवानें कर्तव्य ह्मणजे दुसऱ्यावर ( सज्जनांवर ) अनुग्रह करणें हेंच होय. यावांचून शिवाचें कर्तव्य दुसरें नाहींच असें निश्चयानें सिद्ध झालें आहे. (४) दुसऱ्यावर अनुग्रह करावयास तोच स्वभाव ( अनुग्रह करावयाचाच स्वभाव ) अनुग्रह करणाऱ्याच्या आंगीं नेहमीं असावा लागतो, जगामध्यें ज्याचा स्वभाव अनुग्रह करावयाचाच असा बनलेला नाहीं अशा प्राण्याकडून कोणावर तरी अनुग्रह केला गेला आहे, असें घडलें आहे काय ? ( ५ ) असो, आतां दुसऱ्यावर अनुग्रह करणें हाच एक स्वभाव शिवाचा आहे असें जरी ह्मटलें तथापि दुसरे ह्मणजे ते कोण ? असा एक तुमचा साहजिक प्रश्न निघेल

स्तु पत्युराज्ञासमन्वयः ॥५॥ पतिराज्ञापकः सर्वमनुगृह्णाति सर्वदा ॥ तदर्थमर्थस्वीकारे परतन्त्रः कथं शिवः ॥ ६ ॥ अनुग्राह्यानपेक्षोऽस्ति न हि कश्चिदनुग्रहः ॥ अतः स्वातन्त्र्यशब्दार्थो नानपेक्षत्वलक्षणः ॥ ७ ॥ यत्तत्पुनरनुग्राह्यं परतन्त्रं तदिष्यते ॥ अनुग्राहके तस्य भुक्तिमुक्त्योरनन्वयात् ॥ ८ ॥ मूर्तात्मानोऽप्यनुग्राह्याः शिवाज्ञान-निवर्तनात् ॥ अज्ञानाधिष्ठितं शम्भोर्न किंचिदिह विद्यते ॥ ९ ॥ येनोपलभ्यतेऽस्माभिः सकलेनापि निष्कलः ॥ स मूर्त्यात्मा शिवस्यैव

---

तर त्याला उत्तर हें आहे कीं, पर ( दुसरें ) ह्मणजे पशुपाशात्मक ( पशूप्रमाणें होऊन मायारूपी पाशांत अडकलेलें ) हें सर्व जग होय. अर्थांत असें हें जग शिवाला अनुग्राह्यच ( अनुग्रह करावयास योग्यच ) झालें आहे. आतां " दुसऱ्यावर अनुग्रह करणें " या वाक्यांत अनुग्रह शब्दाचा अर्थ काय ? ह्मणजे पतीची ( शिवाची ) आज्ञा असा अर्थ होतो. ती आज्ञा मानणें या जगाचें कर्तव्य आहे. ( ६ ) अशा आज्ञा करणारा पति [ शिव ] सर्वदां सर्वांवर अनुग्रह करीत असतो. याकरितां ( अनुग्रह करण्याकरितां ) शिवानें अर्थाचा ( विषयाचा ) स्वीकार केला असतां तो शिव परतंत्र कसा होईल बरें ? ( ७ ) जगांत जो अनुग्राह्य[ अनुग्रह करावयास योग्य ]असेल त्याची इच्छा माझ्यावर अनुग्रह करूं नये अशी असेल काय ? अर्थात तो ( अनुग्राह्य ) सापेक्ष झाला. अतएव स्वातंत्र्य शब्दाचा अर्थ निरपेक्ष असा होतो. (८) आतां अनुग्राह्यवस्तु जी असेल ती परतंत्र असलीच पाहिजे, कारण अनुग्रह झाल्यावांचून अनुग्राह्याला भुक्तिमुक्तीचा ( ऐहिक पारत्रिक सुखाचा ) अधिकारच मिळत नाहीं. ( ९ ) जगांत जितके ह्मणून शरीरी ( प्राणी ) असतील, ते सर्व शिवाला अनुग्राह्यच आहेत, कारण ते सर्व शिवाच्या ज्ञानानें हीन असून मायापाशानें बद्ध होऊन अज्ञानावस्थेंत असतात, आणि शिवाच्याच अनुग्रहानें अज्ञानापासून सुटतात. शिवाला मात्र जगांतल्या कोणत्याही वस्तूंविषयीं बिलकुल अज्ञान नाहीं. ( १० ) मग मूर्त्यात्मे ( शरीरी ) जितके, तितके अज्ञानी, आणि अमूर्त्यात्मा तो ज्ञानी असें सांगितल्यानंतर अर्थात् शिव हा मूर्त्यात्मा आहे, किंवा अमूर्त्यात्मा आहे हीं काढलेली

मूर्तिरित्युपचर्यते ॥ १० ॥ नह्यसौ निष्कलः साक्षाच्छिवः परम-
कारणम् ॥ स्वाकारेणानुभाव्येन केनाप्यनुपलक्षितः ॥११॥ प्रमा-
णगस्थतामात्रं तत्स्वभावोपपादकम् ॥ न तावतात्रापेक्षाधीरुपलक्ष-
णमन्तरा ॥ १२ ॥ आत्मोपलक्षणं साक्षान्मूर्तिरेव हि काचन ॥

---

शंका तुमची राहिली आहे तर तर त्याला उत्तर हें आहे कीं, ऋषिज-
नहो, मूर्त्यात्मे जे आह्मी अहोंत, अशा आह्माला शिवाचें ज्ञान व्हावयास
सकल मूर्त्यात्मा जो शिव आहे, ( शरीर धारण केलेला शिव जो आहे )
त्याचीच उपासना केली तरच आह्मास मागाहून निष्कल शिवाचें ज्ञान
मिळतें. आतां आमच्या उपासनेकरितां मूर्त्यात्मा शिवाची कल्पना जी के-
लेली ती शिवाची मूर्ति औपचारिक आहे असें समजा. वास्तविक ह्मणजे
शिव हा निष्कल असून अमूर्त्यात्मा आहे हेंच खरें आहे. ( ११ ) का-
रणाला कारण आहे ह्मणून ज्याला परमकारण ह्मणतात, अशा शिवाला
मूर्त्यात्मा ह्मणावयाचें ह्मणजे हें मूर्खपणाचें लक्षण होय. अर्थात तो सा-
क्षात् शिव निष्कलच आहे असें निश्चयानें जाणा. परंतु अनुभविक अशा
ज्ञान्याला शिवाला जर पहावयाचें झालें तर आपल्या ( पाहणाऱ्याच्या )
आकाराप्रमाणें शिवाच्या आकाराची कल्पना केल्याखेरीज शिवाला को-
णत्याही ज्ञात्याला पाहतां यावयाचें नाहीं. (१२) उपासनेकरितां आपल्या
मूर्तीला प्रमाण ठेऊन तिच्याप्रमाणें [ आपल्या आकृतीप्रमाणें ] शिवाच्या
मूर्तीची कल्पना केली पाहिजे, व त्या मूर्तीला अनुसरून शिवाच्या स्व-
भावाच्या वगैरे कल्पना केल्या पाहिजेत, परंतु इतक्या कल्पनेवरून शिव
हा मूर्त्यात्मा असून आपल्याप्रमाणें सापेक्ष आहे असें मात्र ह्मणतां येत
नाहीं. कारण अशा मूर्तीची कल्पना करणें ह्मणजे औपलक्षणिक ( गौण )
कल्पना होय खरी नव्हे. ( खरा मूर्त्यात्मा नव्हे ) ( १३ ) आतां जगांत
एखाद्या प्राण्याला असें ह्मटलें कीं अहो, तुमच्यासारखी तुमची मूर्ति
दाखवा ? तेव्हां तो दाखविणारा काय करतो, तें पाहा ? आपल्या
( दाखविणाऱ्याच्या ) मूर्तीसारखी एखादी कोणती तरी एक मूर्ति ( औ-
पलक्षणिक मूर्ति ) ह्मणजे तसबिरी वगैरे काय असतील त्या मूर्ति पाहणा-
ऱ्याला दाखवितो. यावरून त्याच्या त्या तसबिरी वगैरे काय असतील

शिवस्य मूर्तिमूर्त्यात्मा यतस्तस्योपलक्षणम् ॥ १३ ॥ यथा काष्ठाद्यनारूढो न वन्हिरुपल। ` ॥ एवं शिवोऽपि मूर्त्यात्मन्यनारूढ इति स्थितिः ॥१४॥ यथाग्निमानयेत्युक्ते ज्वलत्काष्ठादृते स्वयम् ॥ नाग्निरानीयते तद्वत्पूज्यो मूर्त्यात्मना शिवः ॥ १५ ॥ अत एव हि पूजादौ मूर्त्यात्मपरिकल्पनम् ॥ मूर्त्यात्मनि कृतं साक्षाच्छिव एव कृतं यतः ॥ १६ ॥ लिंगादावपि तत्कृत्यमर्चायां च विशेषतः ॥

---

त्या खऱ्या मूर्ति ( प्रत्यक्ष दाखविणारा जो असतो तो ) कधीं जगांत ठरतील काय? त्याप्रमाणें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें तितक्या लक्षणांनीं युक्त अशी एक शिवाची मूर्ति [ औपलक्षाणिक ] केली मग तिची उपासना केली तर तेवढ्यावरून शिव मूर्त्यात्मा होऊं शकेल काय? कधींही होणार नाहीं. अर्थात काल्पनिक ती मूर्ति गौण ( औपचारिक ) आहे, असें समजावें. ( १४ ) किंवा एखाद्या मनुष्याला असें सांगितलें कीं, बाबा, आह्माला अग्नि पाहिजे आहे तर लौकर आण. असें सांगितल्यानंतर तो ( आणणारा ) आपल्या घरीं जातो, आणि एक जळकें लांकूड ( खरा अग्नि नव्हे ) आणतो आणि देतो. त्यावरून आणलेल्या त्या जळक्या लांकडाला अग्नि असें ह्मणावें कीं काय? आणि तो खरा अग्नि होईल कीं काय? तर तो अग्नि जसा खरा नसून औपचारिक अग्नि आहे असा जगांत ठरतो, तद्वत एका अज्ञानानें ज्ञात्याला असें ह्मटलें कीं, मला शिव दाखवा, असें ह्मटल्याबरोबर शास्त्रीय शिवाच्या मूर्तीची कल्पना करून ती दाखवितो, असें केल्यावांचून उपासनेला अन्य गति नाहीं. ( १५ ) तात्पर्य हें कीं अग्नि आण, असें ह्मटल्याबरोबर जळक्या लांकडाशिवाय दुसरा पदार्थ आणणारा आणीत नाहीं, त्याप्रमाणें शिवाला दाखवा असें ह्मटल्याबरोबर शास्त्रीय शिवाची मूर्तीच करून दाखविली पाहिजे, व उपासकानें तिचीच उपासना केली पाहिजे. ( १६ ) अतएव पूजकानें प्रथमतः मूर्त्यात्म्याची कल्पना करून त्या मूर्त्यात्म्याची पूजा करावी. ह्मणजे साक्षात निष्कल शिवाची पूजा केल्याचें श्रेय मिळतें. ( १७ ) तसेंच लिंगादिकाच्या ठिकाणींही शिवाची भावना करून पूजा करावी. विशेषेंकरून पूजेकरतां उपास-

तत्तन्मूर्त्यात्मभावेन शिवोऽस्माभिरुपास्यते ॥ १७ ॥ यथानुगृह्यते सोऽपि मूर्त्यात्मा परमेष्ठिना ॥ तथा मूर्त्यात्मनिष्ठेन शिवेन पशवो वयम् ॥ १८ ॥ लोकानुग्रहणायैव शिवेन परमेष्ठिना ॥ सदाशिवादयः सर्वे मूर्त्यात्मानोऽप्यधिष्ठिताः ॥ १९ ॥ ते हि मूर्त्यात्मभावेन लब्ध्वा स्वयमनुग्रहम् ॥ अन्यात्मनोऽनुगृण्हन्ति शिवेन समधिष्ठिताः ॥ २० ॥ आत्मनामेव भोगाय मोक्षाय च विशेषतः ॥ तत्त्वातत्त्वस्वरूपेषु मूर्त्यात्मसु शिवान्वयः ॥ २१ ॥ भोगः कर्मविपाकात्मा सुखदुःखात्मको यतः ॥ न च कर्म शिवेऽस्तीति तस्य भोगः किमात्मकः ॥ २२ ॥ सर्वं शिवोऽनुगृण्हाति न निगृण्हाति किंचन ॥ निगृण्हतान्तुये दोषाः शिवे तेषामसम्भवात् ॥ २३ ॥ ये पुनर्नि-

---

काच्या इच्छेप्रमाणें त्या त्या मूर्तींची (आवडेल त्या आकाराच्या मूर्तींची) पूजा आह्मी करितो, ह्मणजे निष्कल अमूर्त्यात्मक शिवाचीच पूजा करितो, असें समजावें. ( १८ ) परमेष्ठि शिव आपल्याच मूर्त्यात्मक अंशावर ( शरीर असलेल्या सकल मूर्तीवर ) अनुग्रह जसा करतो, तद्वत मूर्त्यात्म्याच्या ठिकाणीं असणारा शिव पशुप्रमाणें असणाऱ्या आमच्यावर अनुग्रह करतो. ( १९ ) लोकांना अनुग्रह करण्यासाठींच परमेष्ठि शिव सदाशिव वगैरे मूर्त्यात्मक अवतार घेत असतो. ( २० ) ते मूर्त्यात्मक सदाशिवादिरूपें शिवाचा अनुग्रह आपण मिळवून नंतर शिवसान्निध्यानें दुसऱ्यावर अनुग्रह करतात. ( २१ ) शरीरांच्या भोगाकरितां आणि मोक्षाकरितां तत्वरूपी अतत्वरूपी अशा मूर्त्यात्मकांमध्यें शिवाचा संबंध होतो. ( २२ ) शरीराचा भोग ह्मणजे कर्माचा परिणाम होय. कारण तो भोग सुखदुःखात्मक आहे. आतां असें सुखदुःखात्मक कर्म शिवाजवळ आहे काय ? अर्थात नाहीं. मग त्याला भोग कोठून येईल बरें ? ( २३ ) सर्वांवर शिव अनुग्रह करितो परंतु कोणाला निग्रह करीत नाहीं. कारण निग्रह करणारे जे असतील त्यांचे दोष शिवाच्या ठिकाणीं असणें मुळींच संभवत नाहीं. ( २४ ) आतां कांहीं ब्रह्मादिदेवांना निग्रह

ग्रहाः केचिद्ब्रह्मादिषु निर्दशिताः ॥ तेऽपि लोकहितायैव कृताः श्रीकण्ठमूर्तिना ॥ २४ ॥ अण्डस्याप्याधिपत्यं हि श्रीकण्ठस्य न संशयः ॥ श्रीकण्ठाख्यां शिवो मूर्तिं क्रीडन्तीमधितिष्ठति ॥ २५ ॥ सदोषा एव देवाद्या निगृहीता यथोचितम् ॥ ततस्तेऽपि विपाप्मानः प्रजाश्च विगतज्वराः ॥ २६ ॥ निग्रहोऽपि स्वरूपेण विदुषां न जुगुप्सितः ॥ अत एव हि दण्ड्येषु दण्डो राज्ञां प्रशस्यते ॥ २७ ॥ यत्सिद्धिरीश्वरत्वेन कार्यवर्गस्य कृत्स्नशः ॥ न स चेदीशतां कुर्याज्जगतः कथमीश्वरः ॥ २८ ॥ ईशता च विधातृत्वं विधि-

---

केल्याचीं उदाहरणें आहेत, असें जर ह्मणाल तर तो निग्रहसुद्धां श्रीकंठानें अनुग्रहरूपच निग्रह केला असें समजा. ( २९ ) ब्रह्मांडाचें आधिपत्य साक्षात श्रीकंठाकडे ( शिवाकडे ) आहे श्रीकंठ नांवाची जी खेळणारी मूर्ति आहे, तींत शिव हा राहत असतो. ( २६ ) आतां देवादिकांचा निग्रह शिवानें केला, असा एक आक्षेप तुह्मांकडून आला आहे. त्यालाही एवढेंच उत्तर आहे कीं, देवादिक प्रजा ज्याअर्थीं सदोष ( अपराधी ) आहे त्याअर्थीं राजाला ( शिवाला ) शिक्षा देणें आवश्य वाटल्यावरून प्रजेला ( अपराधी देवादिकांना ) राजानें ( शिवानें शिक्षा दिली हें योग्यच झालें कारण ती प्रजा शुद्ध ( निष्पाप ) होऊन चांगल्या मार्गाला ( शिवाच्या अनुग्रहाला ) पात्र झाली. अर्थात त्यांच्या मनांतला ताप ( प्रजेच्या मनांतला ताप ) नाहींसा झाला ( २७ ) निग्रह (शिक्षा ) हा विद्वानांच्या मतें निंद्य नाहीं, असें ठरलें आहे. ह्मणूनच जगामध्यें राजा हा अपराध्यास शिक्षा करीत असतो. ( २८ ) ज्याच्या ठिकाणीं ईश्वरत्व हा धर्म (प्रभुपणा) आहे, त्याच्या सर्व कार्यवर्गाची सिद्धि झाली नाहीं. ( प्रभूनें जी कांहीं आज्ञा वगैरे केली ती जर सिद्ध नाहीं झाली ) त्याच्या ठिकाणीं प्रभुत्व काय राहिलें ? मग तो जगाचा प्रभु कसचा ? आणि त्याच्या हाताखालची ती प्रजा कसची ? ( २९ ) प्रभुत्व ह्मणजे विधातृत्व होय. ( हुकुम करावयाचा अधिकार असणें ) विधि ह्मणजे

राज्ञापनं परम् ॥ आज्ञा चेत्थमिदं कुर्यान्न कुर्यादिति शासनम् ॥ २९ ॥ तच्छासनानुवर्तित्वं साधुभावस्य लक्षणम् ॥ विपरीतमसाधु स्यान्न सर्वं तत्तु दृश्यते ॥ ३० ॥ साधु संरक्षणीयं चेद्विनिवर्त्यमसाधु यत् ॥ विनिवर्तने च सामादेरंते दंडो हि साधनम् ॥ ३१ ॥ हितार्थलक्षणं चेदं दंडांतमनुशासनम् ॥ अतोऽन्यद्विपरीतं तदहितं संप्रचक्षते ॥ ३२ ॥ हिते सदा निषण्णानामीश्वरः स्यान्निदर्शनम् ॥ स कथं दूष्यते सद्भिरसतामेव निग्रहात् ॥ ३३ ॥ अयुक्तकारिणो लोके गर्हणीया विवेकिना ॥ यदुद्वेजयते लोकं तदयुक्तं प्रचक्षते ॥ ३४ ॥ सर्वोऽपि निग्रहो लोके न च विद्वेषपूर्वकः ॥ न हि द्वेष्टि

---

आज्ञा ( हुकुम ) होय. हुकुम ह्मणजे ' अमुक कार्य कर ' ' अमुक कार्य करूं नको ' असें शासन सांगणें हें होय. ( ३० ) असो या तऱ्हेच्या शासनाला अनुसरून वागणें हें संभावित माणसाचें लक्षण होय. याचें विपरीत वागणें हें दुष्ट माणसाचें लक्षण आहे. परंतु जगामध्यें आज्ञेला अमान्य करून वागणारे लोक थोडे सांपडतील.सर्व कांहीं सांपडणार नाहींत. ( ३१ ) जगांत जो कांहीं साधुवर्ग असेल तो रक्षणीय ( पालन करावयास योग्य ) असून असाधुवर्ग जो असेल तो शासन करावयास योग्य आहे असें जाणावें. आतां शासनामध्यें साम, दान, भेद, दंड असे चार प्रकार आहेत. त्यामध्यें पहिल्या तीन प्रकारानीं असाधुवर्ग ताळ्यावर नाहीं आला तर अखेरचा प्रकार ह्मणजे दंड हा प्रकार उपयोगांत आणावा. ( ३२ ) हीं जीं चार प्रकारचीं शासनें सांगितलीं आहेत तीं प्रजेच्या हिताकरितांच आहेत याशिवाय निष्कारण प्रजेला त्रास सोसावा लागला तर त्याला अहित ( अकल्याण ) असें नांव येतें. ( ३३ ) चांगल्या मार्गानें वागणाऱ्या लोकांना राजा हा प्रमाण आहे. असा राजा दुष्ट लोकांना शासन करीत असेल तर तो जगांत निंद्य कसा बरें होईल? ( ३४ ) अयोग्य काम जो कारितो तो निंद्य आहे असें विवेकी ( विचारी ) लोक ह्मणतात. आतां अयोग्य काम ह्मणजे ज्यापासून लोकांना भय वगैरे ताप होतो, त्याला अयोग्य कर्म असें ह्मणतात. ( ३५ ) असा अयोग्य कर्म करणारा सर्व वर्ग तो शिक्षेस पात्र आहे. परंतु त्यांत ( शिक्षेंत )

पिता पुत्रं यो निगृह्यापि शिक्षयेत् ॥ ३५ ॥ माध्यस्थेनापि निग्रा-ह्यान्यो निगृण्हाति मार्गतः ॥ तश्याप्यवश्यं यत्किंचिन्नैर्घृण्य मनुवर्तते ॥ ३६ ॥ अन्यथा न हिनस्त्येच स दोषानप्यसौ परान् ॥ हिनस्ति चायमप्यज्ञान्परं माध्यस्थमाचरन् ॥ ३७ ॥ तस्माद्दुःखा-त्मिकां हिंसां कुर्वाणो यः स निर्घृणः ॥ इति निर्बन्धयन्त्येके नि-यमो नेति चापरे ॥ ३८ ॥ निदानज्ञस्य भिषजो रुग्णे हिंमां प्रयुं-जतः ॥ न किंचिदपि नैर्घृण्यं घृणैवात्र प्रयोजिका ॥ ३९ ॥ घृणा पि न गुणायैव हिंस्रेषु प्रतियोगिषु ॥ तादृशेषु घृणी भ्रान्त्या

---

द्वेषाचा संबंध मात्र नसावा. जगांत बाप मुलाच्या हिताकरितां मुलाला शिक्षा करतो ह्मणून बाप हा मुलाचा शत्रु होईल काय ? ( ३६ ) जे खरोखर अपराधी आहेत त्यांच्याकरितां एखाद्या मनुष्यानें मध्यस्थी करून शिक्षा करविली, तर तो कांहीं निर्घृग ( दयाहीन ) आहे, अशा दोषाला पात्र होत नाहीं. ( ३७ ) अशा लोकांना शासन करणें हा एक अपराध ( दोष ) होत असेल तर कोणी कोणाची हिंसा [शिक्षा] करणार नाहींत. परंतु जगांत अपराध्याला कांहीं कारणामुळें शासन होत नसेल तर ए-खादा मध्यस्थ होऊन दंड्याला शासन करवितो. हा त्याचा ( मध्यस्थाचा ) दोष असा कधींही व्हावयाचा नाहीं. ( ३८ ) परंतु, शासन करविणें हा एक दोष आहे असें मानून हिंसा ही क्रिया दुःखरूप आहे अशा हिंसेला जो करतो व करवितो, ते दोघे निर्घृणी ( निर्दय ) आहेत असा एक निर्बंध जगांत कैक लोकांकडून करण्यांत येतो. परंतु कित्येक दुसरे लोक हा दोष नव्हे असेंही ह्मणतात. ( ३९ ) हा दोषच ठरत असेल तर रोग बरा करणारा वैद्यही दोषी ठरला पाहिजे. कारग निदान जाणणारा ( रोग जाणणारा ) वैद्य रोगाची हिंसा करतो. तर रोगाचा नाश करणारा वैद्य जसा निर्घृण ( निर्दय ) असा मानला जात नाहीं. उलट दयाशील असा मानला जातो. त्याप्रमाणें अपराध्याला शिक्षा करणारा दोषी होत नाहीं. ( ४० ) दया ही स्वभावानें गुणरूप जरी मानली आहे, तथापि तीच दया कैक वेळीं प्रतियोगी ( सज्जनांचे प्रतियोगी ) हिंसा लोकांवर

घृणान्तरितनिर्घृणः ॥ ४० ॥ उपेक्षापि हि दोषाय रक्ष्येषु प्रतियोगिषु ॥ शक्त्यां सत्यामुपेक्षातो रक्ष्यः सद्यो विपद्यते ॥ ४१ ॥ सर्पस्यास्यगतं पश्यन्यस्तु रक्ष्यमुपेक्षते ॥ दोषाभासात्समुत्प्रेक्ष्यः फलतः सोऽपि निर्घृणः ॥ ४२ ॥ तस्माद्घृणा गुणायैव सर्वथेति न संमतम् ॥ संमतं प्राप्तकारित्वं सर्वन्त्वन्यदसंमतम् ॥ ४३ ॥ मूर्त्यात्मस्वपि रागाद्या दोषाः सन्त्येव वस्तुतः ॥ तथापि तेषामेवैते न

---

केली असतां ( शिक्षेस पात्र अशा लोकांवर केली असतां ) ती दया दोषरूप मानिली जाते. अशा लोकांवर ( अपराध्यावर ) सदय मनुष्यानें भ्रांतीनें ( मूर्खपणा करून ) दया केली तर दयारूपीं विघ्न आडवें आल्यामुळें दया करणारा तोच मनुष्य निर्घृण ( निर्दय ) आहे असा लोकांत ठरतो. ( ४१ ) एखादा रक्ष्य ( पालन करावयास योग्य ) असा प्राणी दोषामध्यें पडून दुःख जर भोगतो, तर तशा प्राण्याला शिक्षा ( पालनरूप शिक्षा ) करावयास शक्ति असून उपेक्षा केली तर तो बिचारा [ रक्ष्य ] आपदेमध्यें पडणार नाहीं काय? ( ४२ ) तुह्मीं समजा कीं, एखादा प्राणी सापाच्या दाढेंत सांपडला आहे तर त्या आपदेंत पडलेल्या प्राण्याला सोडविण्याकारितां सापाला मारावें लागणार अर्थात सर्पहिंसेचें पातक लागतें, न सोडवावे तर तो मनुष्य विनाकारण मरतो, अशा दोन संकटांत पडलेल्या दयाशील मनुष्यानें आपल्या मनांत विचार असा केला कीं, आपण होऊन सर्प मारून पातक घेण्यापेक्षां आपोआप घटिकाभरानें सापच त्याला सोडून देईल अशा फाजील दयेनें सापाला मारावयाची शक्ति असून त्यानें उपेक्षा केली तर तोच अखेरीस दोषी ( दयाशील असला तरी ) ठरतो. ( ४३ ) अतएव दया ही वस्तु जरी गुणरूप मानली आहे तथापि सर्वथा ( सर्व ठिकाणीं ) गुणरूप होणार नाहीं. याकरितां वेळ जशी येईल त्या मानाप्रमाणें प्राप्तकालाला ( आलेल्या वेळेला ) स्मरून वागणें हेंच सर्वसंमत होईल. अशी वागणूक ज्याची नसेल, तो सर्वसंमत होणार नाहीं. ( ४४ ) तसेंच इतर मूर्त्यात्मकांमध्यें [ शरीरी प्राण्यामध्यें ] रागादिदोष वस्तुतः जरी आहेत तथापि ते दोष शरीर धारण करणाऱ्या

शिवस्य तु सर्वथा ॥ ४४ ॥ अग्नावपि समाविष्टं ताम्रं खलु सका-
लिकम् ॥ इति नाग्निरसौ दुष्येत्ताम्रसंसर्गकारणात् ॥४५॥ नाग्ने-
रशुचिसंसर्गादशुचित्वमुपेयते ॥ अशुचेस्त्वग्निसंयोगाच्छुचित्वमपि
जायते ॥ ४६ ॥ एवं शोध्यात्मसंसर्गान्नह्यशुद्धः शिवो भवेत् ॥
शिवसंसर्गतस्त्वेष शोध्यात्मैव हि शुध्यति ॥ ४७ ॥ अयस्यग्नौ
समाविष्टे दाहोऽग्नेरेव नायसः ॥ मूर्त्यात्मन्येवमैश्वर्यमीश्वरस्यैव
नात्मनाम् ॥ ४८ ॥ न हि काष्ठं ज्वलत्यूर्ध्वमग्निरेव ज्वलत्यसौ ॥
काष्ठस्यांगारता नाग्नेरेवमत्रापि योज्यताम् ॥ ४९ ॥ अतएव जग-
त्यस्मिन्काष्ठपाषाणमृत्स्वपि ॥ शिवावेशवशादेव शिवत्वमुपचर्यते

---

प्राण्यांचेच आहेत असें समजावें परंतु सदाशिवादि अवतार शिवाचे आ-
हेत ह्मणून शिवाला कांहीं त्या रागादि दोषाचा संपर्क सुद्धां होत नाहीं.
( ४५ ) तांबें हें अग्नींत ( जाळ्यांत ) तापविण्याकरितां टाकिलें असतां
जेव्हां कांहीं वेळानें ताम्रावरचा काळेपणा जाऊन अग्नीसारखेंच रूप तां-
ब्याला येतें, ह्मणून तांब्याच्या संसर्गानें अग्नि दोषी झाला असें ठरेल काय?
( ४६ ) अशुद्ध पदार्थाच्या संपर्कानें अग्नि जसा अशुद्ध होत नाहीं,
उलट अग्नीच्या संपर्कानें अशुद्ध पदार्थालाच शुचित्व ( शुद्धपणा )
येतें. ( ४७ ) त्याप्रमाणें शोध्यात्म्याचा ( शुद्ध व्हावयास योग्य अशा
आत्म्याचा ) संपर्क शिवाला होतो ह्मणून शिव कधीं अशुद्ध होत नाहीं.
उलट शिवाच्या संपर्कानें शोध्यात्माच शुद्ध होतो. ( ४८ ) अग्नींत
एखादा लोहाचा गोळा टाकिला ह्मणजे जळावयाची शक्ति जी आगींत
आहे ती शक्ति लोहाच्या गोळ्यामध्यें जरी आली तरी ती शक्ति अग्नीचीच
आहे, असें कसें सिद्ध होतें. तद्वत शिवाच्या संपर्कानें मिळालेलें ऐश्वर्य मू-
र्त्यात्म्याचें नसून ते शिवाचेंच आहे असें समजावें. ( ४९ ) अग्नीमध्यें
लांकडें घातलीं असतां जो वरपर्यंत जाळ होतो, तो लांकडाचा नसून
अग्नीचा आहे परंतु लांकडाला अग्नित्व मात्र मिळतें तसेंच मूर्त्यात्मा
आणि शिव यांच्यामधला संबंध जाणावा. ( ५० ) ह्मणूनच या जगामध्यें
असलेल्या काष्ठपाषाण, मृत्तिका ( लांकूड दगड माती ) यामध्यें शिवाचा
आवेश ( प्रवेश ) होत असल्यामुळें काष्ठादि पदार्थांत शिवत्व औप-

॥ ९० ॥ मैत्र्यादयो गुणा गौणा यस्माच्चे चित्तवृत्तयः ॥ तैर्गुणैरुपरक्तानां दोषाय च गुणाय च ॥ ९१ ॥ यत्तु गौणमगौणं च तत्सर्वमनुगृह्णतः ॥ न गुणाय न दोषाय शिवस्य गुणवृत्तयः ॥ ९२ ॥ न चानुग्रहशब्दार्थं गौणमाहुर्विपश्चितः ॥ संसारमोचनं किन्तु शैवमाज्ञामयं हितम् ॥ ९३ ॥ हितं तदाज्ञाकरणं यद्धितं तदनुग्रहः ॥ सर्वं हिते नियुंजानः सर्वानुग्राहकः शिवः ॥ ९४ ॥ यस्तूपकारशब्दार्थस्तमप्याहुरनुग्रहम् ॥ तस्यापि हितरूपत्वाच्छिवः सर्वोपकारकः ॥ ९५ ॥ हिते सदानियुक्तन्तु सर्वं चिदचिदात्मकम् ॥ स्वभावप्रतिबन्धं तत्समं न लभते हितम् ॥ ९६ ॥ यथाविकासं या-

---

चारिक आहे असें जाणावें. ( ९१ ) मनाच्या व्यापारांवर अवलंबून असलेल्या मैत्र्यादिगुणाला गौण गुण असें ह्मणतात. त्या गुणांनीं जे युक्त आहेत, त्यांना ते गुण दोषाला कारण आणि गुणालाही कारण होत आहेत. ( ९२ ) जें कांहीं गौण असो, वा मुख्य असो, त्या सर्वांवर अनुग्रह करणाऱ्या शिवाच्या गुणाचे व्यापार दोषाला आणि गुणाला कारण होत नाहींत. ( ९३ ) पंडित लोक अनुग्रह या शब्दाचा अर्थ गौण आहे असें ह्मणत नाहींत. परंतु संसाराला सोडविणारा असून शिवाचा अनुग्रह आज्ञारूप असून हितकारक आहे. ( ९४ ) शिवाची आज्ञा पाळणें हें सर्वांना हितकारक आहे आणि त्यापासून जें हित ( कल्याण ) होतें त्यालाच अनुग्रह असें ह्मणतात. अर्थात सर्वांना हितकारक मार्गाला लावतो, ह्मणून सर्वांवर अनुग्रह करणारा शिव आहे असें सिद्ध होतें. ( ९५ ) आणि जो उपकार नांवाचा शब्द आहे. त्याचा ( शब्दाचा ) अर्थही अनुग्रह असाच होतो. त्यानें ( उपकारानें ) सुद्धां सर्वांना हितच होतें, ह्मणन शिव हा सर्वोपकारी आहे असें ह्मणतात. ( ९६ ) चिदचिदात्मक ( जीवजडात्मक ) सर्व जग हें हितकारक मार्गाकडे नियुक्त झाल आहे. तथापि एका वेळेस सर्वाला हित होत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, त्या त्या वस्तूचा स्वभाव हा प्रतिबंधक होतो. ( ९७ ) सूर्याचा उदय झाल्याबरोबर कमलाच्या सर्व पाकळ्या एकदम

न्त्येव रवेः पद्मानि भानुभिः ॥ समं न विकसन्त्येव स्वस्वभावानु-
रोधतः ॥ ५७ ॥ स्वभावोऽपि हि भावानां भाविनोऽर्थस्य कार-
णम् ॥ न हि स्वभावतोऽसन्तमर्थं कर्तैषु साधयेत् ॥ ५८ ॥
सुवर्णमेव नांगारं द्रावयत्यग्निसंगमः ॥ एवं पक्वमलानेव मोचयेच्च
शिवः परान् ॥ ५९ ॥ यद्यथा भवितुं योग्यं तत्तथा न भवेत्स्वयम् ॥
विना भावनया कर्ता स्वतन्त्रः सन्नतो भवेत् ॥ ६० ॥ स्वभाव
विमलो यद्वत्सर्वानुग्रहकारकः ॥ स्वभावमलिनास्तद्वदात्मानो जी-
वसंज्ञिताः ॥ ६१ ॥ अन्यथा संसरन्त्येते नियमान्न शिवः कथम् ॥
कर्ममायानुबन्धोऽस्य संसारः कथ्यते बुधैः ॥६२॥ अनुबन्धोऽयम-

---

न उमलतां जसजशीं किरणें त्यावर पडतील त्या त्याप्रमाणें पाकळ्या उ-
मळतात. याला कारण स्वभावच आहे (५८) मनांत वागत असलेल्या
भावी अर्थाला (पुढें होणाऱ्या कार्यसिद्धीला) स्वभाव हा कारण आहे.
स्वभावावांचून नसलेल्या अर्थाला (मनांत न योजलेल्या कार्याला) कर्ता
(साधणारा) कधीं साधेल काय ? कधीं साधणार नाहीं. (५९) सोनें
अटावयाला अग्नि (लांकूड) कांहीं कारण नसून अग्नीचा सहवास
कारण आहे (सोन्यांतला मळ काढावयाला लांकूड समर्थ नसून अग्नि
समर्थ आहे.) तसें शिव हा प्रपंचांतल्या प्राण्यांच्या मळाला काढतो.
(पाप काढतो) परंतु प्राण्याला कांहीं सोडीत नाहीं. (६०) जें जसें
व्हावयास योग्य आहे, तें तसें आपोआप होत नाहीं. तसें व्हावयास भा-
वना लागते, आणि तशा भावनेचा कर्ता लागतो. अर्थात कर्ता हा सर्वदां
स्वतंत्र आहे, असें जाणावें. (६१) अतएव जो स्वभावतः(मुळापासून)
निर्मळ असेल तोच सर्वाला अनुग्रह करावयास समर्थ होतो. अर्थात अशा
स्वभावाचा शिव हाच होय. हा जसा स्वभावानें निर्मळ आहे. तसें जीव
या नांवाचे आत्मे हे स्वभावानें (मुळापासून) मलिन (दोषी) आहेत.
(६२) असा जर नियम कदाचित् नसेल तर शिव हा जीवाला विना-
कारण या फेऱ्यांत [ संसारांत ] कां घालीत होता ? आतां संसार ह्मणजे
कर्म आणि माया यांचा संबंध होय. कर्ममाया संबंधालाच पंडित लोक
संसार असें ह्मणतात. (६३) हा संबंध शिवाला नसून जिवालाच आहे.

स्यैव न शिवस्येति हेतुमान्॥स हेतुरात्मनामेव निजो नागन्तुको मलः ॥ ६३ ॥ आगन्तुकत्वे तस्यापि भाव्यं केनापि हेतुना ॥ योऽयं हेतुरसावेकः कल्पतेऽनेकशक्तिकः ॥ ६४ ॥ कार्यभेदोऽपि तच्छक्तिभेदो नात्रोपपद्यते॥ कर्ममायानुबन्धो यः सविचित्रः स्वभावतः ॥ ६५ ॥ आत्मतायाः समत्वेऽपि बद्धा मुक्ताः परे यतः ॥ बद्धेष्वेव पुनः केचिल्लयभोगाधिकारतः ॥ ६६ ॥ ज्ञानैश्वर्यादिवैषम्यं भजन्ते सोत्तराधराः ॥ केचिन्मूर्त्यात्मतां यांति केचिदासन्नगो

---

अर्थांत संसाराला कारणीभूत हा संबंध जीवाचाच आहे, असें सिद्ध झालें. हा संसारहेतुरूपी मळ ( संसाराचें कारण ) आत्म्यांचाच स्वाभाविक असून तो मळ आगंतुक कांहीं नाहीं. [ ६४ ] कदाचित मळ हा जीवाच्या ठिकाणीं आगंतुक आला आहे; अशी कल्पना केली तर, या मळाला कोणता तरी हेतु एक सांगितलाच पाहिजे. कारण एक हेतु असून त्या एका हेतूच्या ठिकाणीं अनेक शक्ति आहेत, अशी कल्पना करणें असंभवनीय आहे. ( ६५ ) कार्य अनेक आहेत ह्मणून शक्ति अनेक आहेत असें कां ह्मणूं नये ? अशी शंका कदाचित येण्याचा संभव आहे, तथापि कर्ममायारूप संबंध हा स्वभावतःच विचित्र असल्यामुळें हा हेतु एकच आहे, यामुळें या एका हेतूमध्यें अनेक शक्ति आहेत अशीं कल्पना करून अनेक हेतु आहेत असें ह्मणणें चुकीचें होतें. ( ६६ ) आतां आत्म्याच्या ठिकाणीं आत्मत्व ह्मणून जो धर्म वास करीत आहे, तो धर्म सर्वत्र सम जरी आहे, तथापि कर्मानुबंधामुळें कांहीं जीव बद्ध असून कांहीं जीव मुक्त आहेत. आणि बद्ध जीवांमध्यें लय भोगाच्या अधिकारानें [ ६७ ] कमी अधिक प्रमाणानें ज्ञान व ऐश्वर्य यामध्यें वैषम्याला पावतात [ कांहीं ज्ञानी होतात, कांहीं ऐश्वर्यवान होतात, कांहीं ज्ञानी होऊन ऐश्वर्यवानही होतात. ] कांहीं जीव मूर्त्यात्मतेला पावतात [ मूर्त्यात्मक सदाशिवादि रूपाला पावतात. ] कांहीं जीव आसन्नगोचर होतात. ( शिवाच्या स्वरू-

चराः ॥६७॥ मूर्त्यात्मसु शिवाः केचिदध्वनां मूर्धसु स्थिताः ॥ मध्ये महेश्वरा रुद्रास्त्वर्वाचीनपदे स्थिताः ॥ ६८ ॥ आसन्नेऽपि समावेशे परस्तात्कारणत्रयम् ॥ तत्राप्यात्मा स्थितोऽधस्तादन्तरात्मा तु मध्यतः ॥ ६९ ॥ परस्तात्परमात्मेति ब्रह्मविष्णुमहेश्वराः ॥ वर्तंते पशवः केचित्परमात्मपदाश्रयाः ॥ ७० ॥ अन्तरात्मपदे केचित्केचिदात्मपदे तथा ॥ शांत्यतीतपदे शैवाः शांतौ माहेश्वरा मताः ॥ ७१ ॥ विद्यायां तु तथा रौद्राः प्रतिष्ठायां तु वैष्णवाः ॥ निवृत्तौ च तथात्मानो ब्रह्मा ब्रह्मांगयोनयः ॥ ७२ ॥ देवयोन्य-

---

पाला आपल्याजवळ पाहतात. ) ( ६८ ) मूर्त्यात्मक स्वरूपांमध्यें शिवाचे अनेक रूप षडध्वाच्या शिरोभागावर राहतात. आणि षडध्वाच्या मध्यभागीं महेश्वररूप असून षडध्वाच्या अलीकडच्या पदांत रुद्ररूप आहेत. ( मूर्त्यात्मक सदाशिवादि रूपांमध्यें शिवस्वरूप झालेले कांहीं जीव षडध्वाच्या शिरावर आहेत, आणि कांहीं शिवस्वरूप पावलेले जीव महेश्वर या नांवानें षडध्वाच्या मध्यभागीं आहेत, आणि कांहीं शिवस्वरूप पावलेले जीव रुद्र अशा नांवानें षडध्वाच्या अलीकडच्या पदावर आहेत. ) ( ६९ ) कांहीं जीव शिवस्वरूपाजवळ जरी गेले आहेत, तथापि त्याच्यापुढें आणखी तीन कारणें आहेत त्या तीन कारणांत आत्मा हा( आत्मा या नांवाचा ) खालीं असून मध्यभागीं अंतरात्मा वास करतो.(७०) व वर परमात्मा वास करितो. या तीन्ही आत्म्याला अनुक्रमानें ब्रह्मा, विष्णु, महेश्वर अशीं तीन नांवें आहेत. त्यांत वर वास करणाऱ्या परमात्म्याजवळ कांहीं पशु ( जीव ) आहेत. ( ७१ ) अंतरात्मपदावर कांहीं पशु ( जीव ) वास करीत असून आत्मपदावर कांहीं पशु ( जीव ) वास करतात, नंतर शांत्यतीतकलेच्या पदावर ( स्थानावर ) जे जीव वास करितात, त्यांना शैव असें ह्मणतात. शांतिकलेच्या पदावर वास करणाऱ्या जीवाला माहेश्वर असें ह्मणतात. (७२) विद्याकलेच्या पदावर वास करणाऱ्या जीवाला रौद्र असें ह्मणतात. प्रतिष्ठा कलेच्या पदावर वास करणाऱ्या जिवाला वैष्णव असें ह्मणतात. निवृत्तिकलेच्या पदावर वास करणाऱ्या जीवापैकीं एकाला ब्रह्मा असें नांव असून बाकीचे जे आहेत ते ब्रह्मदेवाच्या अंगापासून उत्पन्न झालेले जीव आहेत असें जाणावें. ( ७३ ) आठ प्रकारच्या देवयोनी

ष्टकं मुख्यं मानुष्यमथ मध्यमम् ॥ पश्वादयोऽधमाः पंच योनयस्ताश्चतुर्दश ॥ ७३ ॥ उत्तराधरभावोऽपि नैजः संसारिणो मलः ॥ यथामभावो मुक्तस्य पूर्वं पश्चात्तु पक्वता ॥ ७४ ॥ मलोऽप्यामश्च पक्वश्च भवेत्संसारकारणम् ॥ आमे त्वधरता पुंसां पक्वे तूत्तरता क्रमात् ॥ ७५ ॥ पश्वात्मानस्त्रिधा भिन्ना एकद्वित्रिमलाः क्रमात् ॥ तत्रोत्तरा ह्येकमला द्विमला मध्यमा मताः ॥ ७६॥ त्रिमलास्त्वधमा ज्ञेया यथोत्तरमधिष्ठिताः ॥ त्रिमलानधितिष्ठन्ति द्विमलैकमलाः क्रमात् ॥ ७७ ॥ एकद्वित्रिमलान्सर्वाञ्छिव एकोऽधितिष्ठति ॥ अशिवात्मकमप्येतच्छिवेनाधिष्ठितं तथा ॥ ७८ ॥ अरुद्रात्मकमप्येवं

---

असून त्या मुख्य मानिल्या आहेत, मनुष्ययेनि एक असून ती मध्यम मानिली आहे. पशूंची योनि आठ प्रकारची असून अधम मानिली आहे. एकूण योनि चौदा जाणाव्या. ( ७४ )संसारी जीवाचा मळ हा साहजिक होऊन राहिला असून या मळाला उत्तराधरभाव ( कमी अधिक प्रमाण ) आहे. जसें रोग्याला आम झाला असतां ( आमगत रोग झाला असतां ) रोगाला उत्तराधरभाव येतो. ( अधिक कमी प्रमाणांवर रोग असतो ) ह्मणजे आमातिशय झाला असतां पूर्वरूपांत उत्तरभाव असतो. ( वाढत्या प्रमाणावर रोग असतो ) आम परिपक्व झाला असतां अधरभाव असतो. ( कमी प्रमाणावर रोग असतो ) त्याप्रमाणें हा मल जाणावा.(७५)मल हा आमातिशयामध्यें असो, पक्वदशेमध्यें असो, कसा असला तरी संसाररोगाला तो मल कारण होतो. परंतु आमदशेमध्यें असतां अधिक संसाररोग जडतो, पक्वदशेमध्यें असला तर कमी संसाररोग असतो. ( ७६ ) पशु ज्याला ह्मणतात, असे जीव, एक मळाचे, दोन मळाचे, तीन मळाचे असे तीन प्रकारचे आहेत. त्यांत एक मळाचे जीव [ पशु ] श्रेष्ठ असून दोन मळाचे जीव [ पशु ] मध्यम आहेत. ( ७७ ) आणि तीन मळाचे जीव अधम आहेत असें जाणावें. द्विमळ, त्रिमळ जीव क्रमानें त्रिमळाच्या ठिकाणीं राहतात. ( ७८ ) एकमल, द्विमल, त्रिमल या सर्वांमध्यें शिव एकटाच व्याप्त होऊन राहतो. अमंगळरूपानें भरलेल्या या जगतांत शिवही भरून राहिला आहे. [ ७९ ] त्याप्रमाणें अरुद्रात्मक हें सर्व

रुद्रैर्जगदधिष्ठितम् ॥ अण्डान्ता हि महाभूमिः शतरुद्राद्यधिष्ठिता ॥ ७९ ॥ मायान्तमन्तरिक्षन्तु अमरेशादिभिः क्रमात् ॥ अंगुष्ठमात्रपर्यन्तैः समन्तात्सन्ततं ततम् ॥ ८० ॥ महामायावसाना द्यौर्वामाद्यैर्भुवनाधिपैः ॥ अनाश्रिता तैरध्वान्तर्वर्तिभिः समधिष्ठिता ॥ ८१ ॥ ते हि साक्षाद्दिविषदस्त्वन्तरिक्षसदस्तथा ॥ पृथिवीषदइत्येवं देवा देवव्रतैः स्तुताः ॥ ८२ ॥ एवं त्रिभिर्मलैरामैः पक्वैरेव पृथक्पृथक् ॥ निदानभूतैः संसाररोगः पुंसां प्रवर्तते ॥ ८३ ॥ अस्य रोगस्य भैषज्यं ज्ञानमाज्ञौषधोद्भवम् ॥ भिषगाज्ञापकः शम्भुः शिवः परमकारणम् ॥ ८४ ॥ अदुःखेनापि शक्तश्चेत्पशून्मोचयितुं शिवः ॥ कथं दुःखं करोतीति नात्र कार्या विचारणा ॥ ८५ ॥ दुःखमेव हि सर्वोऽपि संसार इति निश्चितम् ॥ कथं दुःखमदुःखं

---

रुद्रांनीं व्यापिलें गेलें आहे. ब्रह्मांडापर्यंत असलेली सर्व भूमि शतरुद्रांनीं व्यापिली गेली आहे. [ ८० ] मायाच ज्याची हद्द आहे, अशा अंतरिक्षांत सर्व देव राहतात. ते देव अंगठ्या एवढ्या रूपाचे असून सर्व जग चोंहोकडून त्यांनीं व्यापिलें गेलें आहे. [ ८१ ] महामाया सीमेपर्यंत असलेल्या निराश्रित द्युलोकांत वामादि भुवनाधिपति राहतात. ते सर्व अध्वाच्या [ षडध्वाच्या ] मध्यभागीं असतात. [ ८२ ] त्यांना दिविषद असें ह्मणतात. अंतरिक्षांतले अंतरिक्षसद ह्मणवून घेतात. पृथ्वीतले पृथ्वीषद ह्मणवून घेतात. हे सर्व देव इतर देवांकडून स्तोत्र करून घेतात. [ ८३ ] याप्रमाणें तीन मळ परिपक्व होईपर्यंत संसाररूपी रोग प्राण्यांना जडतो. [ ८४ ] या रोगाला शिवाची आज्ञा जी आहे, तिजपासून उत्पन्न झालेलें ज्ञानच उत्तम औषध आहे परमकारण शिव हाच औषध देणारा वैद्य जाणावा. [ ८५ ] असा हा शिव पशूंना विन आयासानें रोगापासून सोडवावयास समर्थ जर आहे. तर तो शिव दुःख कां करील ? अर्थात करणार नाहींच यांत विचार करावयास नकोच आहे. [ ८६ ] जगांतले सर्व दुःखच संसार ह्मणून निश्चित झालें आहे. दुःख हें अदुःख ( सुख ) कसें होऊं शकेल ? कारण अदुःखाचा ( सुखाचा ) स्वभाव दुःखाच्या स्वभावाहून विपरीत ( विरुद्ध ) आहे. तात्पर्य हें कीं,

स्यात्स्वभावा ह्यविपर्ययः ॥ ८६ ॥ न हि रोगो ह्यरोगः स्याद्भिष-
ग्भैषज्यकारणात् ॥ रोगार्तं तु भिषग्रोगाद्भैषज्यैः सुखमुद्धरेत् ॥८७
एवं स्वभावमलिनान्स्वभावाद्दुःखिनः पशून् ॥ स्वाज्ञौषधविधानेन
दुःखान्मोचयते शिवः ॥ ८८ ॥ न भिषक्कारणं रोगे शिवः संसा-
रकारणम् ॥ इत्येतदपि वैषम्यं न दोषायास्य कल्पते ॥ ८९ ॥
दुःखस्वभावसंसिद्धेः कथं तत्कारणं शिवः ॥ स्वाभाविको मलः
पुंसां स हि संसारयत्यमून् ॥ ९० ॥ संसारकारणं यत्तु मलं मा-
याद्यचेतनम् ॥ तत्स्वयं सम्प्रवर्तेत शिवसान्निध्यमन्तरा ॥ ९१ ॥
यथा मणिरयस्कान्तः सान्निध्यादुपकारकः ॥ अयसश्चलतस्तद्व-
च्छिवोऽप्यस्येति सूरयः ॥ ९२ ॥ न निवर्तयितुं शक्यं सान्निध्यं

---

ज्या पदार्थाचा स्वभाव जसा असेल. तसाच तो पदार्थ राहूं शकतो. ( ८७ ) वैद्य आहे, औषधें आहेत. ह्मणून ( याकारणानें ) रोग अरोग होईल काय ? रोग्याला वैद्यानें औषध दिलें असतां त्या औषधानें रोग्याला सुख मात्र मिळेल. (८८) याप्रमाणें जे स्वभावानेंच मलिन आहेत, ह्मणून त्या मलिन स्वभावामुळें जे पशु दुःख भोगतात, त्या पशूंना आपलें आज्ञारूप औषध देऊन शिव दुःखापासून मुक्त करतो. ( ८९ ) रोगाला वैद्य जसा कारण होत नाहीं, तसा शिव हा संसाराला कारण होत नाहीं. अशा तऱ्हेचें हें वैषम्य दोषरूप कधींही होत नाहीं. अर्थात अशा दोषाला ( वैषम्याला ) शिव कधीं पात्र होत नाहीं. ( ९० ) ज्या पशूंचा [ अज्ञानी जीवाचा ] स्वभाव मूळापासून दुःखाचा आहे, त्या पशूच्या संसाराला शिव कसा कारण होईल ? पुरुषांचा स्वाभाविक जो मल आहे, तो त्या प्राण्यांना संसार देतो. [ ९१ ] अचेतन [ जड ] मायादि मलच संसाराला कारण असून संसारामध्यें जीवांना आणण्यास मायादि मळच प्रवृत्त होत आहे. परंतु शिवाचें सान्निध्य मात्र नसावें. [ ९२ ] लोखंडाजवळ जोंपर्यंत अयस्कांतमणि [ लोहचुंबक मणि ] नसतो, तोंपर्यंत लोखंड आपल्या जागेपासून जसें हालत नाहीं, तसें शिव जवळ जोंपर्यंत नाहीं, तोंपर्यंतच संसारांत जीव जातो असें मोठमोठे पंडित ह्मणतात. [ ९३ ] शिवाचें सान्निध्य हें संसारनिवृत्तीला कारण आहे. [ शिव

सह कारणम् ॥ अधिष्ठाता ततो नित्यमज्ञातो जगतः शिवः ॥९३॥ न शिवेन विना किंचित्प्रवृत्तमिह विद्यते ॥ तत्प्रेरितमिदं सर्वं तथापि स न दुष्यति ॥९४॥ शक्तिराज्ञात्मिका तस्य नियन्त्री विश्वतोमुखी ॥ तया ततमिदं शश्वत्तथापि स न दुष्यति ॥९५॥ अनिदं प्रथमं सर्वमीशितव्यं स ईश्वरः ॥ ईशनाच्चतदीयाज्ञा तथापिं स न दुष्यति ॥९६॥ योऽन्यथा मन्यते मोहात्सविनश्यति दुर्मतिः ॥ तच्छक्तिवैभवादेव तथापि न स दुष्यति ॥९७॥ एतस्मिन्नन्तरे व्योम्नि श्रौती वागशरीरिणी ॥ सत्यमोममृतं सत्यमित्याविरभवत्स्फुटम् ॥ ॥९८॥ ततो त्दृष्टतराः सर्वे विनष्टाशेषसंशयाः ॥ मुनयो विस्मयाविष्टाः प्रणेमुः पवनं प्रभुम् ॥९९॥ तथा विगतसन्देहान्कृत्वापि पवनो मुनीन् ॥ नैते प्रतिष्ठितज्ञाना इति मत्वैवमब्रवीत् ॥१००॥

---

जवळ आहे, असें ज्ञान होईपर्यंत संसारापासून जीव मुक्त होत नाहीं. ] जगामध्यें शिव हा निरंतर अज्ञात होऊन राहिला आहे. (९४) या जगांत शिवाशिवाय कोणतीही गोष्ट प्रवृत्त होत नाहीं. हें सर्व जग शिवानेंच प्रेरित झालें आहे. तथापि शिव कांहीं दोषी होत नाहीं. (९५) आज्ञारूप शिवाची जी शक्ति आहे, तीच चोहोंकडून नियमन करणारी आहे. त्या आज्ञारूप शक्तीनें हें जग व्यापिलें गेलें आहे. तरी शिव हा दोषी होत नाहीं. (९६) अशिक्षित या जगाचें शासन करतो, ह्मणून त्याला ईश्वर असें ह्मणतात. त्या ईश्वराची आज्ञा जगाला शासन करिते, तरी ती आज्ञा दोषी होत नाहीं. (९७) असें असून मोहामुळें जो शिवाविषयीं विपरीत बुद्धि मनांत आणितो, तो दुष्ट लवकरच नष्ट होतो. त्या शिवाचें शक्तिवैभव असें आहे ह्मणून शिव कांहीं दोषी होत नाहीं. (९८) अशा वेळेस आकाशांत "सत्यं" 'ओं' 'अमृतं' 'सत्यं' ( खरें, सत्य, तसेंच आहे. ) अशी अशरीरवाणी एकदम स्पष्ट प्रकट झाली. (९९) नंतर तेथें बसलेल्या सर्व मुनींच्या मनांतील संशयाचा निरास होऊन त्यांना मोठा आनंद झाला. नंतर सर्व मुनींनीं वायु देवाला नमस्कार केला. (१००) याप्रमाणें ते मुनि जरी निःसंदिग्ध ( संशयरहित ) झाले तरी त्यांचें ज्ञान कायमचें झालें नव्हतें, ह्मणून वायु पुनः बोलला.

वायुरुवाच ॥ परोक्षमपरोक्षञ्च द्विविधं ज्ञानमिष्यते ॥ परोक्षमस्थिरं प्राहुरपरोक्षन्तु सुस्थिरम् ॥१०१॥ हेतूपदेशगम्यं यत्तत्परोक्षं प्रचक्षते ॥ अपरोक्षं पुनः श्रेष्ठादनुष्ठानाद्भविष्यति ॥१०२॥ नापरोक्षादृते मोक्ष इति कृत्वा विनिश्चयम् ॥ श्रेष्ठानुष्ठानसिद्ध्यर्थं प्रयतध्वमतन्द्रिताः ॥१०३॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे शिवतत्वकथनं नामसप्तविंशोऽध्यायः ॥२७॥

---

वायु बोलतो.—(१०१) ऋषिजनहो, ज्ञानामध्यें परोक्ष अपरोक्ष असे दोन प्रकार आहेत, त्यांत परोक्षज्ञान हें चंचल असून अपरोक्ष ज्ञान हें स्थिर आहे, असें समजा. (१०२) कांहींतरी कारणानें किंवा कोणाच्या तरी उपदेशानें जें ज्ञान होतें, त्याला परोक्षज्ञान ह्मणतात. व केवळ शिवाच्या अनुष्ठानानें जें ज्ञान होतें, त्याला अपरोक्षज्ञान असें ह्मणतात. (१०३) अपरोक्ष ज्ञानावांचून मोक्ष कांहीं मिळत नाहीं, असा निश्चय करून श्रेष्ठ अशा अनुष्ठानाच्या सिद्धीकरतां तुह्मी आळस न करतां प्रयत्न करा.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणाच्या वायवीयसंहितेच्या पूर्वभागांतील शिवतत्वकथन नांवाचा सत्ताविसावा अध्याय संपला.

---

## अथ अष्टाविंशोऽध्यायः

ऋषय ऊचुः ॥ किं तच्छ्रेष्ठमनुष्ठानं मोक्षो येनापरोक्षितः ॥ तत्तस्य साधनञ्चाद्य वक्तुमर्हसि मारुत ॥१॥

वायुरुवाच ॥ शैवो हि परमो धर्मः श्रेष्ठानुष्ठानशब्दितः ॥ यत्रापरोक्षं लक्ष्येत साक्षान्मोक्षप्रदः शिवः ॥२॥ स तु पंचविधो ज्ञेयः पंचभिः पर्वभिः क्रमात् ॥ क्रियातपोजपध्यानज्ञानात्मभिरनुत्तरैः ॥ ॥३॥ तैरेव सोत्तरैः सिद्धो धर्मस्तु परमो मतः ॥ परोक्षमपरोक्षं च ज्ञानं यत्र च मोक्षदम् ॥४॥ परमोऽपरमश्चोभौ धर्मौ हि श्रुतिचोदितौ ॥ धर्मशब्दाभिधेयेऽर्थे प्रमाणं श्रुतिरेव नः ॥५॥ परमो योगपर्यंतो धर्मः श्रुतिशिरोगतः ॥ धर्मस्त्वपरमस्तद्वदधः श्रुतिमुखे स्थितः ॥६॥ अपश्वात्माधिकारः स्याद्योधर्मः परमो मतः ॥ साधारणस्ततो

---

ऋषि बोलतात.—(१) वायो, श्रेष्ठ असें अनुष्ठान कोणतें आहे अपरोक्षज्ञानानें मोक्ष कोणीं मिळविला? आणि मोक्ष मिळविण्याचीं साधनें कोणतीं आहेत? हे सर्व आज तूं सांग.

वायु बोलतो.—(२) अनुष्ठानांमध्यें श्रेष्ठ अनुष्ठान शैव धर्म हाच होय. हें शैवधर्माचें अनुष्ठान केलें असतां अपरोक्षज्ञान मिळतें. नंतर साक्षात शिव हा मोक्ष देतो. (३) अनुत्तर क्रिया, तप, जप, ध्यान, ज्ञान या पांच पर्वांनीं शैव धर्म हा पांच प्रकारचा आहे. (४) सोत्तर (उत्कृष्ट) अशा त्याच पांच पर्वांनीं युक्त शैवधर्म हा सर्वांत श्रेष्ठ आहे, असें ह्मणतात. या शैवधर्मानें परोक्षज्ञान व मोक्ष देणारें अपरोक्षज्ञान अशीं हीं दोन्ही ज्ञानें मिळतात. (५) परमधर्म व अपरमधर्म हे दोन्ही धर्म वेदांत सांगितले आहेत. धर्म या शब्दाचा जो अर्थ होतो, तो अर्थ प्रमाण आहे, असें मानावयास आह्मास वेदच प्रमाण आहे. (६) योगापर्यंत सांगितलेला परमधर्म हा श्रुतीच्या शिरोभागावर ( डोक्यावर ) सांगितला आहे. त्याप्रमाणेंच श्रुतीच्या अधोभागांत (खालीं) अपरमधर्म हा सांगितला आहे. (७) त्यांत परमधर्म हा करावयास अपशु ( ज्ञानी ) हे अधिकारी आहेत. दुसरा अपरमधर्म क-

ऽन्यस्तु सर्वेषामधिकारतः ॥७॥ स चायमपरो धर्मः परधर्मस्य साधनम् ॥ धर्मशास्त्रादिभिः सम्यक्साङ्ग एवोपबृंहितः ॥८॥ तत्राद्यो यः परो धर्मः श्रेष्ठानुष्ठानशब्दितः ॥ इतिहासपुराणाभ्यां कथञ्चिदुपबृंहितः ॥९॥ शैवागमैस्तु स पुनः सहाङ्गोपांगविस्तरः ॥ स संस्काराधिकारश्च सम्यगेवोपबृंहितः ॥१०॥ शैवागमोऽपि द्विविधः श्रौतोऽश्रौतश्च स स्मृतः ॥ श्रुतिसारमयः श्रौतः स्वतन्त्र इतरो मतः ॥११॥ स्वतन्त्रो दशधा पूर्वं तथाष्टादशधा पुनः ॥ कामिकादिसमाख्याभिः सिद्धः सिद्धान्तसंज्ञितः ॥१२॥ श्रुतिसारमयो यस्तु शतकोटिप्रविस्तरः ॥ परं पाशुपतं यत्र व्रतं ज्ञानंच कथ्यते ॥१३॥ युगावर्तेषु शिष्येषु योगाचार्यस्वरूपिणा ॥ तत्र तत्रावतीर्णेन शिवेनैव प्रवर्तते ॥१४॥ संक्षिप्यास्य प्रवक्तारश्चत्वारः परमर्षयः ॥ रुरुर्दधी-

---

रावयास जगांतले सर्व प्राणी अधिकारी आहेत. (८) दुसरा अपरमधर्म हा परमधर्माचें साधन आहे, असें जाणावें. धर्मशास्त्रामध्यें अपरमधर्माचें वर्णन यथासांग केलें आहे. (९) ज्याला श्रेष्ठ अनुष्ठान ह्मटलें आहे असा तो पहिला परमधर्म इतिहास पुराणांमध्यें फार कष्टानें वर्णिला आहे. (१०) पुनः शैवागमांमध्यें अंगोपांगसहित, संस्कारांसहित, अधिकारांसहित चांगल्या रीतीनें त्या धर्माचें वर्णन केलें आहे. (११) शैवागमांत सुद्धां श्रौत अश्रौत असे दोन प्रकार सांगितले आहेत. त्यांत वेदमय जे आगम असतील. ते आगम श्रौत आहेत, असें जाणावें. आणि इतर आगम जे असतील, ते स्वतंत्र आहेत, असें समजावें. (१२) प्रथम स्वतंत्र आगमांमध्यें दहा प्रकार होते, मागून अठरा प्रकार झाले. कामिक वगैरे अठरा नांवें त्यांचीं आहेत. या अठरा आगमांनीं सिद्धांत ( शिवसिद्धांत ) सिध्द झाला आहे. (१३) वेदसारमय असा जो परमधर्म आहे, त्याचा विस्तार शंभरकोटींचा आहे. या धर्मांत पाशुपतव्रताचें व पाशुपत ज्ञानाचें वर्णन केलें आहे. (१४) प्रत्येक युग फिरल्यावरोबर त्या त्या युगांत शिष्यांच्या घरीं योगाचार्याच्या रूपानें अवतार घेऊन शिव हा धर्माची अभिवृध्दि करतो. (१५) संक्षेपरूपानें धर्माचे वक्ते चार श्रेष्ठ ऋषि असतात. रुरु, दधीच, अगस्त्य, महा-

चोऽगस्त्यश्च उपमन्युर्महायशाः ॥१५॥ ते च पाशुपता ज्ञेयाः संहितानां प्रवर्तकाः ॥ तत्सन्ततीया गुरवः शतशोऽथ सहस्रशः ॥१६॥ तत्रोक्तः परमो धर्मश्चर्याद्यात्मा चतुर्विधः ॥ तेषु पाशुपतो योगः शिवं प्रत्यक्षयेद्दृढम् ॥१७॥ तस्माच्छ्रेष्ठमनुष्ठानं योगः पाशुपतो मतः ॥ तत्राप्युपायः कोऽप्युक्तो ब्रह्मणा स तु कथ्यते ॥१८॥ नामाष्टकमयो योगः शिवेन परिकल्पितः ॥ तेन योगेन सहसा शैवी प्रज्ञा प्रजायते ॥१९॥ प्रज्ञया परमं ज्ञानमचिराल्लभते स्थिरम् ॥ प्रसीदति शिवस्तस्य यस्य ज्ञानं प्रतिष्ठितम् ॥२०॥ प्रसादात्परमो योगो यः शिवश्चापरोक्षयेत् ॥ शिवापरोक्षात्संसारकारणेन वियुज्यते ॥२१॥ ततः स्यान्मुक्तसंसारो मुक्तः शिवसमो भवेत् ॥ शिवो महेश्वरश्चैव रुद्रो विष्णुः पितामहः ॥२२॥ संसारवैद्यः सर्वज्ञः परमात्मेति मुख्यतः ॥ नामाष्टकमिदं नित्यं शिवस्य प्रतिपादकम् ॥२३॥ आद्यन्तु प-

---

यशस्वी उपमन्यु अशीं त्यांचीं चार नांवें होत. (१६) ते मोठमोठ्या संहितेचे कर्ते असून पाशुपत या नांवानें प्रसिध्द होतात. पुढें यांची जी सहस्रावधि संतति होईल, ते सर्व लोक जगाचे गुरु होऊन संचार करतात. (१७) त्या पाशुपतांत परमधर्माचें वर्णन केलें आहे, आणि चर्यादि चार प्रकारच्या आत्म्याचें वर्णनही केलें आहे. त्यामध्यें पाशुपत योग हा शिवाला प्रत्यक्ष करून दाखविणारा आहे. (१८) ह्मणून पाशुपतयोग हा श्रेष्ठ असा मानिला आहे. त्यांतही ब्रह्मदेवानें कांहीं एक उपाय सांगितला आहे, त्या उपायाचें वर्णन करतों. (१९) शिवानें स्वतः नामाष्टकमय योगाचें वर्णन केलें आहे, त्या योगाचें अनुष्ठान केलें असतां शिवाविषयीं उत्तम प्रज्ञा उत्पन्न होते. (२०) त्या प्रज्ञेनें (बुद्धीनें) लौकरच स्थिर ज्ञान मिळतें. असें ज्ञान झाल्याबरोबर तात्काळ शिव प्रसन्न होतो. (२१) प्रसादाच्या योगानें परमयोग साधतो, त्या परमयोगानें शिवाचें अपरोक्षज्ञान होतें, त्या अपरोक्षज्ञानानें संसाराचीं कारणें नष्ट होतात. (२२) नंतर संसार सुटला ह्मणजे तो प्राणी शिवासारखा होतो. शिव, महेश्वर, रुद्र, विष्णु, पितामह, (२३) संसारवैद्य, सर्वज्ञ, परमात्मा अशीं हीं आठ नांवें मुख्यत्वेंकरून शिवाचें प्रतिपादन नित्य करतात. (२४) पहिलीं पांच नांवें शांत्यतीतादि कलां-

ञ्चकं तत्र शान्त्यतीताद्यनुक्रमात् ॥ संज्ञा सदाशिवादीनां पंचोपाधिपरिग्रहात् ॥२४॥ उपाधिविनिवृत्तौ तु यथास्वं विनिवर्तते ॥ पदमेव हि तन्नित्यमनित्याः पादिनः स्मृताः ॥२५॥ पदानां परिवृत्तौ तु मुच्यन्ते पदिनो यतः ॥ परिवृत्यन्तरेभूयः पदप्राप्तिरुपाधिना ॥२६॥ आत्मान्तराभिधानं स्याद्यदाद्यं नाम पंचकम् ॥ अन्यत्तु त्रितयं नाम्नामुपादानादियोगतः ॥२७॥ त्रिविधोपाधिवचनाच्छिव एवानुवर्तते ॥ अनादिमलसंश्लेषप्रागभावात्स्वभावतः ॥२८॥ अत्यन्तपरिशुद्धात्मेत्यतोऽयं शिव उच्यते ॥ अथवाशेषकल्याणगुणैकघन ईश्वरः ॥२९॥ शिव इत्युच्यते सद्भिः शिवतत्वार्थवेदिभिः ॥ त्रयोविंश-

---

च्या अनुक्रमानें सदाशिवादि पांच सकल मूर्तींचीं नांवें आहेत. या पांच मूर्ति पांच उपाधींनीं युक्त आहेत. (२५) उपाधि निघून गेल्यानंतर नामादि वगैरे स्वत्व निघून जातें. कारण, जगामध्यें असें पाहण्यांत येतें कीं, मूळ गादी नित्य असून त्या गादीवर येणारे अधिकारी वरचेवर बदलत असतात अर्थात् अनित्य आहेत, ह्मणून मूळपद नित्य आहे व पदावर येणारे अनित्य आहेत. (२६) लौकिकांत असें पहाण्यांत येतें कीं, जागांची बदली होते, व मूळ अधिकारांवर असणारे अधिकारी दुसऱ्या जागेवर जातात; तदनुसार त्याचें नांव, हुद्दा व अधिकार हीं बदलतात; ह्मणून पदी हे अनित्य आहेत असें ठरतें. उलट काळ फिरला असतां ( दुसरी परिवृत्ति आली असतां ) उपाधिवशानें मूळपदावर पुन्हा तोच पदी येतो. अर्थात् त्याचें नांव, व्यापार वगैरे पूर्ववत् होतात. (२७) तद्वत् शिव वगैरे हीं पांच नांवें, उपाधिवशानें त्या त्या पदावर जाणाऱ्या प्राण्याला येतात. दुसरीं हीं तीन नांवें देखील उपादानादि उपाधिवशानेंच प्राप्त झालेलीं आहेत. (२८) तीन प्रकारच्या उपाधींनीं तीनही नांवें शिवाला अनुसरूनच रहातात. वस्तुतः शिवाच्या ठिकाणीं मलाचा संबंध वगैरे नसल्यामुळें (२९) शिवाचें रूप अत्यंत शुद्ध आहे. ह्मणूनच त्याला शिव असें ह्मणतात. किंवा तो सर्व कल्याण गुणांचा राशि असून, सर्वांचा प्रभु असल्यामुळें (३०) शिवतत्व जाणणारे सज्जन लोक, त्याला शिव असें ह्मणतात. प्रकृति ही तेवीस त-

तितत्वेभ्यः परा प्रकृतिरुच्यते ॥३०॥ प्रकृतेस्तु परं प्राहुः पुरुषं पंचविंशकम् ॥ यं वेदादौ स्वरं प्राहुर्वाच्यवाचकभावतः ॥३१॥ वेदैकवेद्ययाथात्म्याद्वेदान्ते च प्रतिष्ठितः ॥ स एव प्रकृतौ लीनो भोक्ता यः प्रकृतेर्मतः ॥३२॥ तस्य प्रकृतिलीनस्य यः परः स महेश्वरः॥ तदधीनप्रवृत्तित्वात्प्रकृतेः पुरुषस्य च ॥३३॥ अथवा त्रिगुणं तत्वं मायेयमिदमव्ययम् ॥ मायान्तु प्रकृतिं विद्यान्मायिनन्तु महेश्वरम् ॥ ॥३४॥ मायाविक्षोभकोऽनन्तो महेश्वरसमन्वयात् ॥ रुदुःखं दुःखहेतुर्वा तद्द्रावयति नः प्रभुः ॥३५॥ रुद्र इत्युच्यते सद्भिः शिवः परमकारणम् ॥ शिवतत्वादिभूम्यन्तं शरीरादि घटादि च ॥३६॥ व्याप्याधितिष्ठति शिवस्ततो रुद्रा इतस्ततः ॥ जगतः पितृभूतानां शिवो

---

त्वांपेक्षां श्रेष्ठ आहे. (३१) प्रकृतीपेक्षां पुरुष हा श्रेष्ठ आहे. प्रकृति व पुरुष मिळून एकंदर पंचवीस तत्वें झालीं. वेदांच्या आरंभीं जो प्रणव ह्मणजे ॐकार असतो त्यांत अकार, उकार, मकार, नाद, बिंदु व स्वर वगैरे आठ अवयव आहेत. त्यांमध्यें जो स्वर ह्मणून आहे तो ब्रह्मरूप असून ब्रह्मवाचकही आहे. (३२) पंचविसावें तत्व जो पुरुष तो केवळ वेदानें समजण्यास योग्य असून वेदांतामध्यें सांगितलेला आहे. तोच पुरुष प्रकृतीमध्यें लीन असून प्रकृतीचा भोक्ता आहे. (३३) प्रकृतीमध्यें लीन असणाऱ्या त्या पुरुषापेक्षां तो महेश्वर श्रेष्ठ आहे; कारण प्रकृति किंवा पुरुष या दोघांचीही प्रवृत्ति त्या परमेश्वराच्या स्वाधीन असते (३४) अथवा त्रिगुणात्मक तत्त्व ह्मणजे प्रकृति हीच माया होय. ही माया अविनाशी आहे. प्रकृतीला माया ह्मणतात. व महेश्वराला मायी ह्मणतात. (३५) महेश्वराचा व मायेचा संबंध झाला ह्मणजे, तो अनंत नांवाचा देव मायेला क्षोभ उत्पन्न करितो. शिवाला रुद्र असें नांव पडण्यास कारण हें कीं, ‘ रुद् ’ ह्मणजे दुःख किंवा दुःखाचें कारण याला तो पळवितो ह्मणून प्रभूला ‘ रुद्र ’ हें नांव प्राप्त झालें आहे. (३६) जगाचा परम कारण जो शिव त्यालाच रुद्र अशी संज्ञा आहे असें ज्ञानी लोकांचें मत आहे. तो परशिव शिवतत्वादिकरून पृथ्वीपर्यंत जीं कांहीं तत्वें आहेत तीं, आणि शरीर, घट वगैरे हे सर्व पदार्थ (३७) व्यापून ही किंचित् अधिक होऊन रहातो. त्या नंतर अकरा रुद्र इ-

मूर्त्यात्मनामपि ॥३७॥ पितृभावेण सर्वेषां पितामह उदीरितः॥ निदानज्ञो यथा वैद्यो रोगस्य विनिवर्तकः ॥३८॥ उपायैर्भेषजैस्तद्वल्लयभोगाधिकारतः॥ संसारस्येश्वरो नित्यं समूलस्य निवर्तकः ॥३९॥ संसारवैद्य इत्युक्तः सर्वतत्वार्थवेदिभिः॥ दशार्थज्ञानसिद्ध्यर्थमिन्द्रियेष्वेषु सत्स्वपि ॥४०॥ त्रिकालभाविनो भावान्स्थूलान्सूक्ष्मानशेषतः ॥ अणवो नैव जानन्ति मायाणवमलावृताः ॥४१॥ असत्स्वपि च सर्वेषु सर्वार्थज्ञानहेतुषु ॥ यद्यथावस्थितं वस्तु तत्तथैव सदाशिवः ॥४२॥ अयत्नेनैव जानाति तस्मात्सर्वज्ञ उच्यते ॥ सर्वात्मा परमैरेभिर्गुणैर्नित्यसमन्वयात् ॥४३॥ स्वस्मात्परात्मविरहात्परमात्मा शिवः स्वयम् ॥ नामाष्टकमिदं चैव लब्ध्वाचार्यप्रसादतः ॥४४॥ निवृत्या-

---

कडे तिकडे आपआपले स्थानावर रहातात. हे एकादश रुद्र शिवाच्याच मूर्ति असून सृष्टिकर्ते असल्यामुळें जगाला बापासारखे आहेत. (३८) त्या एकादश रुद्रांचा बाप हा परमेश्वर असल्याकारणानें हा जगाचा पितामह ह्मणजे आजा होतो. रोगाचें निदान जाणणारा वैद्य (३९) औषधादि उपचारांनीं ज्याप्रमाणें रोग नाहींसा करतो. त्याप्रमाणें हा परमेश्वर जगाला भोग देणें. व जगाचा लय करणें या अधिकारांनीं मुळासकट या संसाराची निवृत्ति करतो. (४०) ह्मणून परमेश्वरास तत्ववेत्यांनीं संसारवैद्य असें ह्मटलें आहे जीवाला पदार्थज्ञान होण्याकरितां परमेश्वरानें दहा इंद्रियें दिलीं असून देखील (४१) जीव हे भूत व भविष्यकालचे स्थूल पदार्थ व सर्व सूक्ष्म पदार्थ व अणु पदार्थ यांस जाणण्यास समर्थ होत नाहींत; कारण हे जीव मायारूपी जीवाच्या मलानें आच्छादन केलेले आहेत. (४२) पदार्थज्ञानाची साधनें जीं इंद्रियें, तीं परमात्म्याला नसून देखील तो परमात्मा तीनही कालांतील सूक्ष्म, स्थूल व अणु वगैरे सर्व पदार्थ यथार्थरीतीनें (४३) जाणतो ह्मणून तो सर्वज्ञ होय असें शास्त्रांत प्रतिपादन केलें आहे. वर सांगितलेले गुण शिव परमात्म्याच्या ठिकाणीं नेहमीं असल्यावरून (४४) व त्याच्याहून दुसरा वेगळा आत्मा नसल्यामुळें शिवास सर्वात्मा असें ह्मटलें आहे गुरुजी सेवा करून गुरु प्रसन्न झाल्यानंतर, शिवादि आठ नांवांचा गुरूपासून उपदेश घेऊन (४९) निवृत्ति वगैरे ज्या कला त्याहेत. त्या कलांच्या ग्रन्थी-

दिकलाग्रन्थीञ्छिवाद्यैः पंचनामभिः ॥ यथास्वं क्रमशः स्मृत्वा शोधयित्वा यथागुणम् ॥४५॥ गुणितैरेव सोद्धातैर्निरुद्धातैरथापि वा ॥ हृत्कण्ठतालुभ्रूमध्यब्रह्मरन्ध्रसमन्वितान् ॥४६॥ भित्वा पुर्यष्टकाकारं स्वात्मानं च सुषुम्नया ॥ द्वादशान्तःस्थितस्येन्दोर्नीत्वोपरि शिवौजसि ॥४७॥ संत्दृत्य वा न वा पश्चाद्यथास्त्रं कारणे लयात् ॥ शाक्तेनामृतवर्षेण संसिक्तायां तनौ पुनः ॥४८॥ अवतार्य स्वमात्मानममृतात्माकृतिं त्दृदि ॥ द्वादशान्तःस्थितस्येन्दोः परस्ताच्छ्वेतपंकजे ॥४९॥ अर्ध्दनारीश्वरं देवं निर्मलं मधुराकृतिम् ॥ शुध्दस्फटिकसंकाशं प्रसन्नं शीतलद्युतिम् ॥५०॥ ध्यात्वा नामाष्टकेनैव भावपुष्पैः समर्चयेत् ॥ अभ्यर्चनान्ते तु पुनः प्राणानायम्य मानवः ॥५१॥ स-

---

मध्यें अनुक्रमानें शिव वगैरे पांच मूर्ति आहेत असें जाणून त्याठिकाणीं त्या त्या मूर्तीचें नामस्मरण करून, आपल्या शक्तीप्रमाणें प्राणायामाचें आवर्तन करावें. (४६) कुंभक किंवा रेचक या दोन प्रकारच्या प्राणायामाच्या अभ्यासानें, हृदय, कंठ, तालु, भौवयांचा मध्यभाग, व ब्रह्मरंध्र, या स्थानासहित, निवृत्ति वगैरे कला ग्रंथीचें शोधन करावें. (४७) मग शरीरामध्यें आठ दलांच्या पद्माचें भेदन करून, सुषुम्ना नाडीच्या द्वारानें, द्वादश दलाच्या पद्मांत असलेल्या चंद्राच्या ऊर्ध्वभागीं जें सुखकारक चंद्राचें तेज आहे त्याठिकाणीं आपल्या आत्म्याला न्यावें. (४८) तेथें त्या त्या तत्वाचा लय त्या त्या कारणाच्या ठिकाणीं चिंतून, मग आरंभिलेल्या प्राणायामाचा उपसंहार करावा, किंवा न करावा. तेथें चंद्राच्या ठिकाणीं असणाऱ्या अमृताच्या वृष्टीनें शरीरास सिंचन होतें. (४९) पुनः अमृतरूप ज्याला प्राप्त झालें आहे अशा आपल्या आत्म्याला हृदयामध्यें, व बारा दळांच्या पद्मांत असलेल्या चंद्राच्या ऊर्ध्वभागीं श्वेत कमलामध्यें उतरवून (५०) त्याठिकाणीं अर्धनारीश्वर महादेवाची मूर्ति आहे तिचें ध्यान करावें. ती मूर्ति निर्मळ दर्शनीय, स्फटिकाप्रमाणें शुभ्र, प्रसन्न व शीतळ अशी आहे. (५१) आठ नांवानीं, व भावरूपी पुष्पानें त्या मूर्तीची मानस पूजा करावी. पूजा संपल्यानंतर पुनः प्राणायाम करून (५२) उत्तम रीतीनें एकाग्र मन करून,

म्यक्चित्तं समाधाय सार्थं नामाष्टकं जपेत् ॥ नाभौ चाष्टाहुतीर्हुत्वा पूर्णां हुत्वा नमस्ततः ॥५२॥ अष्टपुष्पप्रदानेन कृत्वाभ्यर्चनमन्तिमं॥ निवेदयेत्स्वमात्मानं चुलुकोदकवर्त्मना ॥५३॥ एवं कृत्वा चिरादेव ज्ञानं पाशुपतं शुभम् ॥ लभेत तत्प्रतिष्ठां च व्रतं चानुत्तमं तथा ॥५४॥ योगं च परमं लब्ध्वा मुच्यते नात्र संशयः ॥५५॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागेऽष्टाविंशोऽध्यायः ॥२८॥

---

अर्थानुसंधानपूर्वक आठ नांवांचा जप करावा. मग प्रत्येक मूर्तीच्या नांवानें आठ आहुतींचा होम करून पूर्णाहुति करून नमस्कार करावा. (९३) आठ पुष्पें समर्पण करून शेवटची पूजा करावी. त्या पूजेमध्यें आपल्या ओंजळींत असलेल्या पाण्याप्रमाणें आपल्या आत्म्याचें समर्पण करावें. (९४) अशा रीतीनें केलें असतांना शिवज्ञान प्राप्त होऊन स्थिर राहील व शैव व्रत ही कधीं न ढळतांना स्थिर राहील. (९९) या रीतीनें अभ्यास करतां करतां मनुष्याला श्रेष्ठ योग प्राप्त होतो. त्या योगाच्या बलानें मनुष्य संसार बंधनांतून मुक्त होतो, यांत कांहीं संशय नाहीं.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील पूर्वभागांतील अठ्ठाविसावा अध्याय संपला.

---

## अथ एकोनत्रिंशोऽध्यायः

ऋषय ऊचुः ॥ भगवञ्छ्रोतुमिच्छाम व्रतं पाशुपतं परम् ॥ ब्रह्मादयोऽपि यत्कृत्वा सर्वे पाशुपताः स्मृताः ॥१॥

वायुरुवाच ॥ रहस्यं वः प्रवक्ष्यामि सर्वपाशनिकृन्तनम् ॥ व्रतं पाशुपतं श्रौतमथर्वशिरसि श्रुतम् ॥२॥ कालश्चित्रापौर्णमासी देशः शिवपरिग्रहः ॥ क्षेत्रारामादिरन्यो वा प्रशस्तः शुभलक्षणः ॥३॥ तत्र पूर्वं त्रयोदश्यां सुस्नातः सुकृताह्निकः ॥ अनुज्ञाप्य स्वमाचार्यं सम्पूज्य प्रणिपत्य च ॥४॥ पूजां वैशेषिकीं कृत्वा शुक्लाम्बरधरः स्वयम् ॥ शुक्लयज्ञोपवीती च शुक्लमाल्यानुलेपनः ॥५॥ दर्भासने समासीनो दर्भमुष्टिं प्रगृह्य च ॥ प्राणायामत्रयं कृत्वा प्राङ्मुखो वाप्युदङ्मुखः ॥६॥ ध्यात्वा देवञ्च देवीञ्च तद्विज्ञापनवर्त्मना ॥ व्रतमेत-

---

ऋषि बोलले—हे भगवन् वायो, पाशुपत नांवाचें व्रत कसें करावें? हें सांगा कारण हें पाशुपतव्रत करूनच ब्रह्मादिदेव सर्व पाशुपत या नांवानें प्रसिद्ध झाले.

वायु बोलला–(२) ज्याच्यापासून सर्व पाश तुटून पडतात, अशा त्या रहस्याला सांगतों श्रुतींमध्यें (वेदांत) प्रसिद्ध झालेलें हें पाशुपतव्रत अथर्वण वेदाच्या शिरोभागावर (डोक्यावर) आहे. (३) हें पाशुपतव्रत करावयास योग्य काल, चित्रा पौर्णिमा उत्तम मानिली आहे. आणि शिवक्षेत्र, क्षेत्र, (इतर क्षेत्र) बाग वगैरे स्थलें श्रेष्ठ मानिलीं आहेत. व इतर शुभलक्षणांनीं युक्त स्थलही व्रतास योग्य मानिलें आहे. (४) प्रथमतः त्रयोदशी तिथीच्या दिवशीं स्नान करून आन्हिक सर्व आटोपून घेऊन नंतर आपल्या आचार्यांची (गुरूची) आज्ञा घेऊन त्यांची पूजा नमस्कार वगैरे करून (५) पुनः विशेषेंकरून पूजा करून शुभ्र वस्त्र नेसून शुभ्र यज्ञोपवीत घालून शुभ्र माळ घालून (६) दर्भासनावर बसून नंतर हातांत दर्भाची मुष्टि घेऊन उत्तराभिमुख किंवा प्राङ्मुख बसून तीन प्राणायाम करावेत. (७) आचार्यांच्या ज्ञानोपदेशाच्या मार्गानें देवाचें किंवा देवीचें ध्यान करून दीक्षा घेतलेल्या

त्करोमीति भवेत्सङ्कल्प्य दीक्षितः ॥७॥ यावच्छरीरपातं वा द्वादशाब्दमथापि वा ॥ तदर्द्धं वा तदर्द्धं वा मासद्वादशकन्तु वा ॥८॥ तदर्द्धं वा तदर्द्धं वा मासमेकमथापि वा ॥ दिनद्वादशकं वाथ दिनषट्कमथापि वा ॥९॥ तदर्द्धं दिनमेकं वा व्रतसंकल्पनावधि ॥ अग्निमाधाय विधिवद्विरजाहोमकारणात् ॥१०॥ हुत्वाज्येन समिद्भिश्च चरुणा च यथाक्रमम् ॥ पूर्णाद्याः पुरतो भूयस्तत्वानां शुध्दिमुद्दिशन् ॥११॥ जुहुयान्मूलमन्त्रेण तैरेव समिदादिभिः ॥ तत्वान्येतानि मद्देहे शुध्दयन्तामित्यनुस्मरन् ॥१२॥ पंचभूतानि तन्मात्राः पंच कर्मेन्द्रियाणि च ॥ ज्ञानकर्मविभेदेन पंच पंच विभागशः ॥१३॥ त्वगादिधातवः सप्त पंच प्राणादिवायवः ॥ मनोबुध्दिरहंख्यातिर्गुणाः प्रकृतिपूरुषौ ॥१४॥ रागो विद्या कला चैव नियतिः काल ए-

---

प्राण्यानें नंतर 'मी व्रत करितों' असा संकल्प करावा. (८)तो संकल्प असा करावा कीं, माझा देह असें पर्यंत व्रत करितों, किंवा बारा वर्षेंपर्यंत व्रत करितों, किंवा सहा वर्षेंपर्यंत व्रत करितों, किंवा तीन वर्षेंपर्यंत व्रत करितों, किंवा एक वर्षपर्यंत व्रत करितों, अशा तऱ्हेनें यांत शक्य तो संकल्प करावा. (९)किंवा सहा महिने, तीन महिने, एक महिना, बारा दिवस, सहा दिवस, (१०).तीन दिवस, किंवा एक दिवस, यांमध्यें शक्य तितक्या मुदतीचा संकल्प करावा. निदान व्रत समाप्तीच्या वेळेपर्यंत तरी संकल्प करावा. नंतर विरजाहोमाकरतां अग्नीचें आधान करावें. (११) नंतर आज्यानें (तुपानें), समिधांनीं, चरूनें (अन्नानें) क्रमाला अनुसरून होम करावेत ( यांच्या आहुति द्याव्या ) तत्वांच्या शुद्धीकरितां पुनः पूर्णादि आहुती द्याव्या (१२) मूल मंत्रानें समिधा अग्नींत घालाव्या. माझ्या देहांतलीं सर्व तत्वें शुद्ध होवोत असें स्मरण करून आहुति घालाव्या. (१३) पांच महाभूतें, त्यांच्या पांच मात्रा पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें ज्ञान व कर्म या विभागानें दहा इंद्रियें पांच पांच विभागांनीं गणिलीं आहेत. (१४) त्वगादि सप्त धातु, प्राणादि पांच वायु, मन, बुध्दि, अहंकार, ख्याति, सत्वादि गुण, प्रकृति, पुरुष (१९) राग, विद्या, कला, नियति, काल, माया,

व च ॥ माया च शुध्दविद्या च महेश्वरसदाशिवौ ॥१५॥ शक्तिश्च शिवतत्वं च तत्वानि क्रमशो विदुः ॥ मन्त्रैस्तु विरजैर्हुत्वा होतासौ विरजो भवेत ॥१६॥ अथ गोमयमादाय पिण्डीकृत्याभिमन्त्र्य च ॥ न्यस्याग्नौ तच्चसंरक्ष्य दिने तस्मिन्हविष्यभुक् ॥१७॥ प्रभाते तु चतुर्दश्यां कृत्वा सर्वं पुरोदितम् ॥ दिने तस्मिन्निराहारः कालशेषं समापयेत् ॥१८॥ प्रातःपर्वणि चाप्येवं कृत्वा होमावसानतः ॥ उपसंत्हृत्य रुद्राग्निं ग्रह्णीयाद्भस्म यत्नतः ॥१९॥ ततस्तु जटिलो मुण्डः शिखैकजट एव वा ॥ भूत्वा स्नात्वा पुनर्वीतलज्जश्चेत्स्याद्दिगम्बरः ॥२०॥ अन्यः काषायवसनश्चर्मचीराम्बरोऽथ वा ॥ एकाम्बरो वल्कली वा भवेद्दण्डी च मेखली ॥२१॥ प्रक्षाल्य चरणौ पश्चाद्द्विराचम्यात्मनस्तनुम् ॥ सङ्कलीकृत्य तद्भस्म विरजानलसम्भवम्

---

शुध्दविद्या, महेश्वर, सदाशिव, (१६) शक्ति, शिवतत्व वगैरे तत्वें ते जाणतात ( इत्यादि तत्वांचें स्मरण करून होमकर्त्यानें होम करावा ). विरज मंत्रांनीं कर्त्यानें होम केला असतां होताही विरज (निर्मल) होतो. (१७) नंतर कर्त्यानें गोमय ( गायीचें शेण ) घेऊन त्याचा गोळा करून मग अभिमंत्रण करून तो गोळा अग्नींत ठेवून त्या दिवशीं यजमानानें हविष्यान्न भोजन करून अग्नीचें रक्षण करावें. (१८) दुसऱ्या दिवशीं ह्मणजे चतुर्दशीच्या दिवशीं प्रातःकालीं उठून शास्त्रांत सांगितलेलें पूर्वोक्त सर्व कर्म करून त्या दिवशीं यागकर्त्यानें निराहार करावा. तात्पर्य हें कीं याप्रमाणें, तो दिवस निराहारानें घालवावा. (१९) नंतर दुसऱ्या दिवशीं ह्मणजे पौर्णिमेच्या दिवशीं याप्रमाणेंच होमसमाप्तीपर्यंत कर्म करून रुद्राग्नीचा उपसंहार करून भस्म घेऊन सर्वांगाला लावावें. (२०) नंतर जटिल, मुंड, शिखी, एकजटी, यांपैकीं कोणत्याही अवस्थेंत कर्त्यानें असून स्नान करून लाज़ सोडून दिगंबर ( नग्न ) व्हावें. (२१) किंवा काषायवस्त्र ( शाटी ) चर्म ( हरिणाचें कातडें ), चीरवस्त्र ( तागाचें वस्त्र ), वल्कल वगैरे कांहीं तरी नेसून कर्त्यानें हातांत दंड घ्यावा, व कंबरेला मेखला बांधावी. (२२) नंतर पादप्रक्षालन ( पाय धुऊन ) करून दोन वेळ आचमन करून आपला सर्व देह

॥२२॥ अग्निरित्यादिभिर्मन्त्रैः षड्भिराथर्वणैः क्रमात् ॥ विमृज्याङ्गानि मूर्द्धादिचरणान्तश्च संस्पृशेत् ॥२३॥ ततस्तेन क्रमेणैव समुद्धृत्य च भस्मना ॥ सर्वाङ्गोध्दूलनं कुर्यात्प्रणवेन शिवेन वा ॥२४॥ ततस्त्रिपुण्ड्रं रचयेत्त्रियायुषसमाह्वयम् ॥ शिवभावं समागम्य शिवयोगं समाचरेत् ॥२५॥ कुर्यात्त्रिसन्ध्यमप्येवमेतत्पाशुपतं व्रतम् ॥ पूजनीयो महादेवो लिंगमूर्तिः सनातनः ॥२६॥ पद्ममष्टदलं हैमं नवरत्नैरलंकृतम् ॥ कर्णिकाकेशरोपेतमासनं परिकल्पयेत् ॥२७॥ विभवे तदभावे तु रक्तं सितमथापि वा ॥ पद्मं तस्याप्यभावे तु केवलं भावनामयम् ॥२८॥ तत्पद्मकर्णिकामध्ये कृत्वा लिंगं कनीयसम् ॥ स्फाटिकं पीठिकोपेतं पूजयेद्धि ततः क्रमात् ॥२९॥ प्रतिष्ठाप्य विधानेन तल्लिंगं कृतशोधनम् ॥ परिकल्प्यासनं मूर्तिं पंचवक्त्रप्रकारतः ॥३०॥ पंचगव्यादिभिः पुण्यैर्यथाविभवविस्तरैः ॥ स्नापयेत्कलशैः

---

सावरून मग विरजाग्नीचें तें भस्म एकीकडे करून (२३) अथर्वण वेदांत असलेल्या अग्नि इत्यादि सहा मंत्रांनीं क्रमानें डोक्यापासून पायांपर्यंत सर्व अंगाला त्या भस्मानें मर्दन करावें. (२४) नंतर त्याच क्रमानें भस्म घेऊन प्रणव मंत्रानें किंवा शिवमंत्रानें सर्व अंगावर तें भस्म उधळून घ्यावें (२५) नंतर भस्माचें त्रिपुंड्र लावावें. त्रिपुंड्र धारण करीत असतांना त्रियायुष मंत्राचा उच्चार करावा. नंतर शिवाच्या ठिकाणीं भाव ठेवून शिवयोगाचा अभ्यास करावा. (२६) याप्रमाणें तीन वेळ करावें. यालाच पाशुपतव्रत ह्मणतात. नंतर पुरातन लिंगमूर्ति शिवाची पूजा करावी. (२७) नव्या नव्या रत्नांनीं सुशोभित असें अष्टदल ( आठ पाकळ्यांचें ) पद्म काढावें. त्यांत कर्णिका ( करंड ) केसर वगैरे करावेत. तात्पर्य कीं असें पद्मासन करावें. (२८) वैभव असेल तर अशा तऱ्हेचें आसन करावें. नाहीं तर तांबडें, पांढरें असें आसन मनांतच कल्पनेनें रचावें. (२९) त्या कमलासनाच्या करंड्यामध्यें लहान लिंगाची स्थापना करावी. तें लिंग स्फटिकाचें केलेलें असून त्याला पीठही करावें, नंतर क्रमानें पूजा करावी. (३०) शोधन केलेलें लिंग विधानपूर्वक ठेवून नंतर आसनाची कल्पना करून पांच तोंडाच्या मूर्तीला आसनावर बसवून (३१) वैभवानुरूप पंचगव्यादि क्रमानें स्नान

पूर्णैः सहस्रादिषु सम्भवैः ॥३१॥ गन्धद्रव्यैः सकर्पूरैश्चन्दनाद्यैः सकुंकुमैः ॥ सवेदिकं समालिप्य लिंगं भूषणभूषितम् ॥३२॥ बिल्वपत्रैश्च पद्मैश्च रक्तश्वेतैस्तथोत्पलैः ॥ नीलोत्पलैस्तथान्यैश्च पुष्पैस्तैस्तैः सुगन्धिभिः ॥३३॥ पुण्यैश्च शतपत्रैश्च चित्रैर्दूर्वाक्षतादिभिः ॥ समभ्यर्च्य यथालाभं महापूजाविधानतः ॥३४॥ धूपं दीपं तथा चार्घ्यं नैवेद्यं च समादिशेत् ॥ निवेदयित्वा विभवे कल्याणं च समाचरेत् ॥३५॥ इष्टानि च विशिष्टानि न्यायेनोपार्जितानि च ॥ सर्वद्रव्याणि देयानि व्रते तस्मिन्विशेषतः ॥३६॥ श्रीपत्रोत्पलपद्मानां संख्या साहस्रिकी मता ॥ प्रत्येकमपरा संख्या शतमष्टोत्तरं द्विजाः ॥३७॥ तत्रापि च विशेषेण न त्यजेद्बिल्वपत्रकम् ॥ हैममेकं परं प्राहुः पद्मं पद्मसहस्रकात् ॥३८॥ नीलोत्पलादिष्वप्येतत्समानं बिल्वपत्रकैः ॥ पुष्पान्तराण्यनियमाद्यथालाभं निवेदयेत् ॥३९॥ अष्टांगमर्घ्यमुत्कृष्टं धू-

---

घालून नंतर भरलेल्या सहस्र कलशांनीं स्नान घालावें. (३२) नंतर लिंगमूर्तीला अलंकार घालून गंध, द्रव्य, कापूर, चंदन, कुंकुम वगैरे त्यावर वाहावें, व वेदीवर सुद्धां वाहावें. (३३) नंतर बिल्वपत्र, पद्म, रक्तकमल, श्वेतकमल, नीलकमल, आणि इतर सुवासिक फुलें, (३४) पुण्यकर शतपत्र कमल, दूर्वा, अक्षता यांनीं किंवा यांत मिळतील त्या फुलांनीं शिवाची महापूजा विधानोक्त करावी. (३५) नंतर शिवाला धूप, दीप, अर्पण करून नंतर नैवेद्य दाखवावा. वैभवानुरूप सर्व कांहीं शिवाला अर्पण करून मग मंगलकर स्तोत्रपाठ ह्मणावा. (३६) या व्रतांत आपल्यास प्रिय असलेल्या सर्व पदार्थांचें दान करावें. आणि न्यायानें मिळविलेल्या द्रव्याचीं अनेक दानें या व्रतांत विशेषेंकरून करावींत (३७) श्रीपत्र, उत्पल, पद्म हीं फुलें हजार हजार संख्येनें वाहावींत, इतर फुलें एकशे आठ संख्येनें वाहावींत. (३८) यांतही विशेषेंकरून बिल्वपत्र सोडूं नये. हजार कमळें वाहण्यापेक्षां एक सोन्याचें पद्म करून वाहणें जास्त श्रेयस्कर आहे, असें ह्मणतात. (३९) नीलोत्पलादि फुलें वाहण्यापेक्षां बेलाचीं दळें वाहिलीं तर श्रेयस्कर आहे तरी इतर फुलें जशीं मिळतील तशीं शिवास अर्पण करावींत. (४०) नंतर शिवास अष्टांग अर्घ्य द्यावेत, व विशेषेंकरून धूप, लेप अर्पण करा-

॥२२॥ अग्निरित्यादिभिर्मन्त्रैः षड्भिराथर्वणैः क्रमात् ॥ विमृज्याङ्गानि मूर्द्धादिचरणान्तश्च संस्पृशेत् ॥२३॥ ततस्तेन क्रमेणैव समुद्धृत्य च भस्मना ॥ सर्वाङ्गोध्दूलनं कुर्यात्प्रणवेन शिवेन वा ॥२४॥ ततस्त्रिपुण्ड्रं रचयेत्त्रियायुषसमाह्वयम् ॥ शिवभावं समागम्य शिवयोगं समाचरेत् ॥२५॥ कुर्यात्त्रिसन्ध्यमप्येवमेतत्पाशुपतं व्रतम् ॥ पूजनीयो महादेवो लिंगमूर्तिः सनातनः ॥२६॥ पद्ममष्टदलं हैमं नवरत्नैरलंकृतम् ॥ कर्णिकाकेशरोपेतमासनं परिकल्पयेत् ॥२७॥ विभवे तदभावे तु रक्तं सितमथापि वा ॥ पद्मं तस्याप्यभावे तु केवलं भावनामयम् ॥२८॥ तत्पद्मकर्णिकामध्ये कृत्वा लिंगं कनीयसम् ॥ स्फाटिकं पीठिकोपेतं पूजयेद्धि ततः क्रमात् ॥२९॥ प्रतिष्ठाप्य विधानेन तल्लिंगं कृतशोधनम् ॥ परिकल्प्यासनं मूर्तिं पंचवक्त्रप्रकारतः ॥३०॥ पंचगव्यादिभिः पुण्यैर्यथाविभवविस्तरैः ॥ स्नापयेत्कलशैः

---

सावरून मग विरजाग्नीचें तें भस्म एकीकडे करून (२३) अथर्वण वेदांत असलेल्या अग्नि इत्यादि सहा मंत्रांनीं क्रमानें डोक्यापासून पायांपर्यंत सर्व अंगाला त्या भस्मानें मर्दन करावें. (२४) नंतर त्याच क्रमानें भस्म घेऊन प्रणव मंत्रानें किंवा शिवमंत्रानें सर्व अंगावर तें भस्म उधळून घ्यावें (२५) नंतर भस्माचें त्रिपुंड्र लावावें. त्रिपुंड्र धारण करीत असतांना त्रियायुष मंत्राचा उच्चार करावा. नंतर शिवाच्या ठिकाणीं भाव ठेवून शिवयोगाचा अभ्यास करावा. (२६) याप्रमाणें तीन वेळ करावें. यालाच पाशुपतव्रत ह्मणतात. नंतर पुरातन लिंगमूर्ति शिवाची पूजा करावी. (२७) नव्या नव्या रत्नांनीं सुशोभित असें अष्टदल ( आठ पाकळ्यांचें ) पद्म काढावें. त्यांत कर्णिका ( करंड ) केसर वगैरे करावेत. तात्पर्य कीं असें पद्मासन करावें. (२८) वैभव असेल तर अशा तऱ्हेचें आसन करावें. नाहीं तर तांबडें, पांढरें असें आसन मनांतच कल्पनेनें रचावें. (२९) त्या कमलासनाच्या करंड्यामध्यें लहान लिंगाची स्थापना करावी. तें लिंग स्फटिकाचें केलेलें असून त्याला पीठही करावें, नंतर क्रमानें पूजा करावी. (३०) शोधन केलेलें लिंग विधानपूर्वक ठेवून नंतर आसनाची कल्पना करून पांच तोंडाच्या मूर्तीला आसनावर बसवून (३१) वैभवानुरूप पंचगव्यादि क्रमानें स्नान

पूर्णैः सहस्रादिषु सम्भवैः ॥३१॥ गन्धद्रव्यैः सकर्पूरैश्चन्दनाद्यैः सकुंकुमैः ॥ सवेदिकं समालिप्य लिंगं भूषणभूषितम् ॥३२॥ बिल्वपत्रैश्च पद्मैश्च रक्तश्वेतैस्तथोत्पलैः ॥ नीलोत्पलैस्तथान्यैश्च पुष्पैस्तैस्तैः सुगन्धिभिः ॥३३॥ पुण्यैश्च शतपत्रैश्च चित्रैर्दूर्वाक्षतादिभिः ॥ समभ्यर्च्य यथालाभं महापूजाविधानतः ॥३४॥ धूपं दीपं तथा चार्घ्यं नैवेद्यं च समादिशेत् ॥ निवेदयित्वा विभवे कल्याणं च समाचरेत् ॥३५॥ इष्टानि च विशिष्टानि न्यायेनोपार्जितानि च ॥ सर्वद्रव्याणि देयानि व्रते तस्मिन्विशेषतः ॥३६॥ श्रीपत्रोत्पलपद्मानां संख्या साहस्रिकी मता ॥ प्रत्येकमपरा संख्या शतमष्टोत्तरं द्विजाः ॥३७॥ तत्रापि च विशेषेण न त्यजेद्बिल्वपत्रकम् ॥ हैममेकं परं प्राहुः पद्मं पद्मसहस्रकात् ॥३८॥ नीलोत्पलादिष्वप्येतत्समानं बिल्वपत्रकैः ॥ पुष्पान्तराण्यनियमाद्यथालाभं निवेदयेत् ॥३९॥ अष्टांगमर्घ्यमुत्कृष्टं धू-

---

घालून नंतर भरलेल्या सहस्र कलशांनीं स्नान घालावें. (३२) नंतर लिंगमूर्तीला अलंकार घालून गंध, द्रव्य, कापूर, चंदन, कुंकुम वगैरे त्यावर वाहावे, व वेदीवर सुद्धां वाहावे. (३३) नंतर बिल्वपत्र, पद्म, रक्तकमल, श्वेतकमल, नीलकमल, आणि इतर सुवासिक फुलें, (३४) पुण्यकर शतपत्र कमल, दूर्वा, अक्षता यांनीं किंवा यांत मिळतील त्या फुलांनीं शिवाची महापूजा विधानोक्त करावी. (३५) नंतर शिवाला धूप, दीप, अर्पण करून नंतर नैवेद्य दाखवावा. वैभवानुरूप सर्व कांहीं शिवाला अर्पण करून मग मंगलकर स्तोत्रपाठ ह्मणावा. (३६) या व्रतांत आपल्यास प्रिय असलेल्या सर्व पदार्थांचें दान करावें. आणि न्यायानें मिळविलेल्या द्रव्याचीं अनेक दानें या व्रतांत विशेषेंकरून करावींत (३७) श्रीपत्र, उत्पल, पद्म हीं फुलें हजार हजार संख्येनें वाहावींत, इतर फुलें एकशे आठ संख्येनें वाहावींत. (३८) यांतही विशेषेंकरून बिल्वपत्र सोडूं नये. हजार कमळें वाहण्यापेक्षां एक सोन्याचें पद्म करून वाहणें जास्त श्रेयस्कर आहे, असें ह्मणतात. (३९) नीलोत्पलादि फुलें वाहण्यापेक्षां बेलाचीं दळें वाहिलीं तर श्रेयस्कर आहे तरी इतर फुलें जशीं मिळतील तशीं शिवास अर्पण करावींत. (४०) नंतर शिवास अष्टांग अर्घ्य द्यावेत, व विशेषेंकरून धूप, लेप अर्पण करा-

पालेपौ विशेषतः ॥ कृष्णागुरुमघोराख्ये वक्त्रे सद्ये मनःशिलाम् ॥ ॥४०॥ चन्दनं वामदेवाख्ये हरितालं च पौरुषे ॥ ईशाने भसितं के- चिदालेपनमितीदृशं ॥४१॥ न धूप इति मन्यन्ते धूपान्तरविधानतः॥ सितागुरुमघोराख्ये मुखे कृष्णागुरुं पुनः ॥४२॥ पौरुषे गुग्गुलं स- द्ये सौम्ये सौगंधिकं मुखे ॥ ईशानेऽपि उशीरादि दद्याध्दूपं विशेषतः ॥४३॥ शर्करामधुकर्पूरकपिलाघृतसंयुतम् ॥ चन्दनागुरुकाष्ठाद्यं सा- मान्यं सम्प्रचक्षते ॥४४॥ कर्पूरवर्तिराज्याढ्या देया दीपावली ततः॥ अर्घ्यमाचमनं देयं प्रतिवक्त्रमतःपरं ॥४५॥ प्रथमावरणे पूज्यौ क्रमा- ध्देरम्बषण्मुखौ ॥ ब्रह्मांगानि ततश्चैवं प्रथमावरणेऽर्चिते ॥४६॥ द्वि- तीयावरणे पूज्या विघ्नेशाश्चक्रवर्तिनः ॥ तृतीयावरणे पूज्या भवा- द्याश्चाष्टमूर्तयः ॥४७॥ महादेवादयस्तत्र तथैकादशमूर्तयः ॥ चतुर्था-

---

वेत. अघोर वक्त्राला कृष्णागरूचा धूप, सद्योजातवक्त्राला मनशीळाचा धूप द्यावा, (४१) वामदेव मुखाला चंदनाचा धूप द्यावा, व पौरुष मुखाला (त- त्पुरुष मुखाला ) हरितालाचा धूप द्यावा. अशा तऱ्हेनें धूप समर्पण करून याच पदार्थांचा गंध अनुक्रमानें त्या त्या मुखाला लावावा. ईशान मुखाला मात्र भस्मलेपन करावें. याप्रमाणें लेपनविधि जाणावा. (४२) कांहीं लोक हा धूपाचा क्रम मानीत नाहींत, धूपाचा क्रम दुसराच सांगतात. अघोरमु- खाला सितागरूचा धूप द्यावा, व कृष्णागरूचा धूप द्यावा, (४३) तत्पुरु- षमुखाला गुग्गुळाचा धूप, सौम्य अशा सद्योजातमुखाला सौगंधिक धूप द्यावा, व ईशान मुखाला वाळा वगैरे पदार्थांचा धूप द्यावा. (४४) साखर, मध, कापूर, काळ्या गायीचें तूप, यांनीं युक्त चंदन अगरु वगैरे लांकडां- चे धूप सामान्य आहेत, असें पंडितांचें मत आहे. (४५) नंतर कापूर किं- वा फुलवाती यांची दीपावली ( दीपांची रांग ) देवापुढें करावी. प्रत्येक मु- खाला अर्घ्य आचमन द्यावें. (४६) प्रथमावरणामध्यें गणपति षण्मुख यां- ची पूजा करून शिवपरब्रह्मस्वरूपाच्या अंगांची पूजा करावी. याप्रमाणें प्र- थमावरणाची पूजा झाल्यानंतर (४७) द्वितीयावरणांत चक्रवर्ति विघ्नेशांची पूजा करावी. तृतीयावरणांत भवादि अष्टमूर्तींची पूजा करावी. (४८) तसेंच महादेवादि अकरा मूर्तींची पूजा करावी. चतुर्थावरणांत सर्व गणेश्वरांची पू-

वरणे पूज्याः सर्वएव गणेश्वराः ॥४८॥ बहिरेव तु पद्मस्य पञ्चमावरणे क्रमात् ॥ दशदिक्पतयः पूज्याः सास्त्राः सानुचरास्तथा ॥४९॥ ब्रह्मणो मानसाः पुत्राः सर्वेऽपि ज्योतिषां गणाः ॥ सर्वे देवाश्च देव्यश्च सर्वाः सर्वेऽपि खेचराः ॥५०॥ पातालवासिनश्चान्ये सर्वे मुनिगणा अपि ॥ योगिनो मुख्यतः सर्वे पञ्चमे मातरस्तथा ॥ ॥५१॥ क्षेत्रपालश्च सगणः सर्वं चैतच्चराचरम् ॥ अथावरणपूजान्ते सम्पूज्य परमेश्वरम् ॥ साज्यं सव्यञ्जनं हृद्यं हविर्भक्त्या निवेदयेत्॥ ॥५२॥ मुखवासादिकं दत्वा ताम्बूलं सोपदंशकम् ॥५३॥ अलंकृत्य च भूयोऽपि नानापुष्पविभूषणैः ॥ नीराजनान्ते विस्तीर्णं पूजाशेषं समापयेत् ॥५४॥ चन्द्रसंकाशहारश्च शयनीये समर्पयेत् ॥ आढ्यं नृपोचितं हृद्यं तत्सर्वमनुरूपतः ॥५५॥ कृत्वा च कारयित्वा च हुत्वा च प्रतिपूजनम् ॥ स्तोत्रं व्यपोहनं जप्त्वा विद्यां पंचाक्षरीं जपेत् ॥५६॥ प्रदक्षिणं प्रणामं च कृत्वात्मानं समर्चयेत् ॥ ततः पुर-

---

जा करावी. (४९) पद्मासनाच्या बाहेर पंचमावरणांत क्रमानें सशस्त्र अनुचरांसहित दिक्पतींची पूजा करावी. (५०) ब्रह्मदेवाचे सर्व मानसपुत्र, सर्व ज्योतिर्गण, सर्व देव, सर्व देवी, सर्व खेचर (आकाशांत फिरणारे), (५१) पातालवासी, सर्व मुनिगण, सर्व योगी, सर्व मातृगण, (५२) गणसहित क्षेत्रपाल यांची पूजा पंचमावरणांत करावी. फार काय ? सर्व जगाची पूजा त्यांत करावी. नंतर आवरण पूजा संपल्यानंतर परमेश्वराची पूजा करावी. (५३) मग तुपासहित, व्यंजनसहित हविष्यान्नाचा नैवेद्य दाखवावा. नंतर मुखवास समर्पण करून त्रयोदशगुणी तांबूल द्यावा. (५४) नंतर पुनः अनेक पुष्पांच्या माळा करून शिवाला द्याव्या. मग पुष्कळ नीराजन (आरति) करून राहिलेली पूजा समाप्त करावी. (५५) मग शय्येवर चंद्राप्रमाणें पांढरा हार करून अर्पण करावा. योग्यतेनुरूप राजोपभोग्य सुंदर सुंदर पदार्थ शिवास अर्पण करावेत. (५६) याप्रमाणें स्वतः पूजा करून दुसऱ्याकडून करवून नंतर होम करावा. नंतर व्यपोहनस्तोत्र ह्मणून पंचाक्षरीविद्येचा जप करावा. (५७) नंतर प्रदक्षिणा घालून नमस्कार करून मग आ-

स्ताद्देवस्य गुरुविद्ये च पूजयेत् ॥५७॥ दत्वार्घ्यमष्टौ पुष्पाणि देवमुद्वास्य लिंगतः ॥ अग्नेश्चाग्निं सुसंरक्ष्य उद्वास्य च तमप्युत ॥५८॥ प्रत्यहं जन इत्येवं कुर्यात्सर्वं पुरोदितम् ॥ ततस्तत्सांबुजं लिंगं सर्वोपकरणान्वितम् ॥५९॥ समर्पयेत्स्वगुरवे स्थापयेद्वा शिवालये ॥ सम्पूज्य च गुरूनन्यान्व्रतिनश्च विशेषतः ॥६०॥ भक्तान्द्विजांश्च शक्तश्चेद्दीनानाथांश्च तोषयेत् ॥ स्वयञ्चानशनप्रायः फलमूलाशनोऽथ वा ॥६१॥ पयोव्रतो वा भिक्षाशी भवेदेकाशनस्तथा ॥ नक्तं युक्ताशनो नित्यं भूशय्यानिरतः शुचिः ॥६२॥ भस्मशायी तृणे शायी चीराजिनशयोऽथ वा ॥ ब्रह्मचर्यरतो नित्यं व्रतमेतत्समाचरेत् ॥६३॥ अर्कवारे तथार्द्रायां पंचदश्यां च पक्षयोः॥अष्टम्यां च चतुर्दश्यां शक्तस्तूपवसेदपि ॥६४॥ पाषण्डपतितोदक्यासूतिकान्त्यजपूर्वकान् ॥ व-

---

त्मपूजा करावी. नंतर देवाच्या पुढें गुरूची व विद्येची पूजा करावी (५८) नंतर आठ अर्घ्य देऊन हातांत फुलें घेऊन लिंगापासून देवाची (शिवाची) उद्वासना ( विसर्जन ) करावी. नंतर अग्नीपासून अग्नीचें रक्षण करून त्या अग्नीचीही उद्वासना ( विसर्जन ) करावी. (५९) याप्रमाणें प्रतिदिवशीं लोकांनीं शिवाची पूर्वोक्त पूजा करावी. नंतर सर्व साधनांनीं सहित पद्मसहित तें लिंग (६०) गुरूला देऊन टाकावें, किंवा शिवालयांत त्याची स्थापना करावी. नंतर गुरूची व व्रतस्थ लोकांची पूजा करावी. (६१) नंतर शक्ति असेल तर शिवभक्त ब्राह्मणांना दीन अनाथलोकांना दान देऊन संतोष करावा. स्वतः आपण फलमूल भक्षण करून निरशनाप्रमाणें असावें. (६२) किंवा दूध प्यावें. भिक्षान्न भक्षण करावें. किंवा एकाशन ( एकवेळ जेवण ) तरी करावें. अथवा नक्तभोजन करून निरंतर जमिनीवर निजावें. (६३) किंवा भस्मावर निजून रात्र काढावी. किंवा गवत, चीरवस्त्र, कृष्णाजिन यावर निजून रात्र काढावी. तात्पर्य हें कीं, ब्रह्मचर्यानें राहून हें व्रत करावें. (६४) आदित्यवार, आर्द्रा, पौर्णिमा, दोन्ही पक्षांतली अष्टमी, चतुर्दशी इतक्या दिवशीं बलवानानें उपोषण करावें. (६५) पाखंड, पतित, सोदकी, सूतकी, अंत्यज इत्यादि लोकांपासून दूर राहावें. फार काय ? मनानें, कर्मा-

र्जयेत्सर्वयत्नेन मनसा कर्मणा गिरा ॥६५॥ क्षमादानदयासत्याहिंसाशीलः सदा भवेत् ॥ सन्तुष्टश्च प्रशान्तश्च तपोध्यानरतः सदा ॥ ॥६६॥ कुर्यात्रिषवणस्नानं भस्मस्नानमथापि वा ॥ पूजां वैशेषिकीं चैव मनसा कर्मणा गिरा ॥६७॥ बहुनात्र किमुक्तेन नाचरेदशिवं व्रती ॥ प्रमादात्तु तथाचारे निरूप्य गुरुलाघवम् ॥६८॥ उचितां निष्कृतिं कुर्यात्पूजाहोमजपादिभिः ॥ आसमाप्तेर्व्रतस्यैवमाचरेन्न प्रमादतः ॥६९॥ गोदानं च वृषोत्सर्गं कुर्यात्पूजां जपं सदा ॥ सामान्यमेतत्कथितं व्रतस्यास्य समासतः ॥७०॥ प्रतिमासं विशेषं च प्रवक्ष्यामि यथाक्रमम् ॥ वैशाखे वज्रलिंगं तु ज्येष्ठे मारकतं शुभम् ॥ ॥७१॥ आषाढे मौक्तिकं विद्याच्छ्रावणे नीलनिर्मितम् ॥ मासे भाद्रपदे चैव पद्मरागमयं परम् ॥७२॥ आश्वयुज्यां च विधिवद्गोमेदकमयं शुभम् ॥ कार्त्तिक्यां वैद्रुमं लिंगं वैदूर्यं मार्गशीर्षके ॥७३॥ पुष्परागमयं पौषे माघे द्युमणिजं तथा ॥ फाल्गुन्यां चन्द्रकान्तोत्थं

---

नें, वाणीनें सुद्धां प्रयत्नपूर्वक त्या लोकांना सोडून द्यावें. (६६) क्षमा, दान, दया, सत्य, अहिंसा, यांचा स्वीकार करावा. व्रतकर्त्यानें संतोषानें, शांतपणानें असावें. तप, ध्यान यांमध्यें आसक्त असावें. (६७) व्रतस्थ मनुष्यानें त्रिकाल जलस्नान करून भस्मस्नान करावें विशेषेंकरून मनानें, कर्मानें वाणीनें शिवाची पूजा करावी. (६८) विशेष सांगण्यांत काय मतलब आहे ? तात्पर्य हें आहे कीं, व्रतस्थानें अमंगळ आचरण करूं नये. कदाचित् प्रमादामुळें मोठा किंवा लहान असा दोष घडला तर (६९) क्रमानें योग्य प्रायश्चित्त घ्यावें. प्रायश्चित्तही पूजारूप, होमरूप, जपरूप असेंच घ्यावें. व्रत समाप्त होईपर्यंत प्रमादानें ( बेसावधपणानें ) वागू नये. (७०) व्रतस्थ मनुष्यानें गोदान, वृषोत्सर्ग, पूजा जप वगैरे करावे, ब्राह्मणहो, या व्रताचें संक्षेपानें सामान्य लक्षण सांगितलें, (७१) आतां प्रत्येक महिन्याचें क्रमानें विशेष लक्षण सांगतों. वैशाखांत वज्राचें, जेष्ठांत मरकतमण्याचें, (७२) आषाढांत मोत्याचें, श्रावणांत नीलमण्याचें, भाद्रपदांत पद्मरागाचें (७३) आश्विनांत विधानोक्त गोमेदाचें, कार्तिकांत पोंवळ्याचें, मार्गशीर्षांत वैदुर्याचें, (७४) पौषांत पुष्परागाचें, माघांत सूर्यकांतमण्याचें, फाल्गुनांत चंद्र-

चैत्रे तद्व्यत्यययोऽथ वा ॥७४॥ सर्वमासेषु रत्नानामलाभे हैममेव वा॥ हैमाभावे राजतं वा ताम्रं शैलजमेव वा ॥७५॥ मृण्मयं वा यथालाभं क्षणिकं चान्यदेव वा ॥ सर्वगन्धमयं वाथ लिङ्गं कुर्याद्यथारुचि ॥७६॥ व्रतावसानसमये समाचरितनैत्यकः ॥ कृत्वा वैशेषिकीं पूजां हुत्वा चैव यथा पुरा ॥७७॥ सम्पूज्य च सदाचार्यं व्रतिनश्च विशेषतः ॥ दैशिकेनाभ्यनुज्ञातः प्राङ्मुखो वाप्युदङ्मुखः ॥ ॥७८॥ दर्भासनो दर्भपाणिः प्राणापानौ नियम्य च ॥ जपित्वा शक्तितो मूलं ध्यात्वा साम्बं त्रियम्बकम् ॥७९॥ अनुज्ञाप्य यथापूर्वं नमस्कृत्य कृतांजलिः ॥ समुत्सृजामि भगवन्व्रतमेतत्त्वदाज्ञया॥८०॥ इत्युक्त्वा लिंगमूलन्तु दर्भानुत्तरतस्त्यजेत् ॥ ततो दण्डजटाचीरमेखलाद्यपि चोत्सृजेत् ॥८१॥ पुनराचम्य विधिवत्पंचाक्षरमुदीरयेत्॥

---

कांत मण्याचें, चैत्रांत सूर्यकांताचें लिंग करावें. (७५) सर्व महिन्यांत रत्नें मिळालीं नाहींत तर सोन्याचें लिंग करावें. सोनें न मिळाल्यास रुप्याचें करावें. नाहींतर तांब्याचें किंवा शिळेचें लिंग करावें. (७६) किंवा मातीचें लिंग करावें. अथवा दुसऱ्या कशाचें तरी एक क्षणभर टिकेल असें लिंग करून पूजा करावी. ज्याची आवड जशी असेल त्या मानानें सर्व सौगंधिक पदार्थ घेऊन त्यांचें लिंग करावें. (७७) व्रतसमाप्तीच्या वेळेस नित्य कर्म उरकून घेऊन पूर्वी सांगितल्याप्रमाणें होम करून नंतर विशेष पूजा करावी. (७८) सर्वदा आचार्यांची ( गुरूंची ) पूजा करीत असून विशेषेंकरून व्रतस्थांची पूजा करावी. नंतर सद्गुरूंच्या आज्ञेनें पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करून (७९) दर्भासनावर बसून हातांत दर्भ घेऊन प्राणापान वायूचें नियमन करावें. नंतर त्रियंबकाचें ध्यान करून मूलमंत्राचा जप करावा. (८०) पूर्वोक्त विधीनें गुरूची आज्ञा घेऊन दोन्ही हात जोडून नमस्कार करून ‘ महाराज आपल्या आज्ञेप्रमाणें हें व्रत मी सोडतों ’ असें ह्मणावें. (८१) असें ह्मणून लिंगाच्या बुडाला असणारे दर्भ उत्तरेकडे फेंकून द्यावेत. नंतर दंड, जटा, चीर, मेखला, यांचेंही विसर्जन करावें. (८२) नंतर पुनः आचमन करून पंचाक्षरी मंत्राचा उच्चार करावा. याप्रमाणें देह

यः कृत्वात्यन्तिकीं दीक्षामादेहान्तमनाकुलः ॥८२॥ व्रतमेतत्प्रकुर्वीत स तु वै नैष्ठिकः स्मृतः ॥ सोऽत्याश्रमी च विज्ञेयो महापाशुपतस्तथा ॥८३॥ स एव तपतांश्रेष्ठः स एव च महाव्रती ॥ न तेन सदृशः कश्चित्कृतकृत्यो मुमुक्षुषु ॥८४॥ यतिर्यो नैष्ठिको जातस्तमाहुर्नैष्ठिकोत्तमम् ॥ योऽनश्नन्द्वाशाहं वा व्रतमेतत्समाचरेत् ॥८५॥ सोऽपि नैष्ठिकतुल्यः स्यात्तीव्रव्रतसमन्वयात् ॥ घृताक्तो यश्चरेदेतद्व्रतं व्रतपरायणः ॥८६॥ द्वित्रैकदिवसं वापि स च कश्चन नैष्ठिकः ॥ कृत्यमित्येव निष्कामो यश्चरेद्व्रतमुत्तमम् ॥८७॥ शिवार्पितात्मा सततं न तेन सदृशः क्वचित् ॥ भस्मच्छन्नो द्विजो विद्वान्महापातकसम्भवैः ॥८८॥ पापैर्विमुच्यते सद्यो मुच्यते नात्र संशयः ॥ रुद्राग्नेर्यत्परं वीर्यं तद्भस्म परिकीर्तितम् ॥८९॥ तस्मात्सर्वेषु कालेषु वीर्यवान्भस्मसंयुतः ॥ भ-

---

असेपर्यंत आळस न करितां ही आत्यंतिकी दीक्षा व्याकुळ न होतां जो घेतो, (८३) आणि हें व्रत जो करितो, त्याला जगामध्यें नैष्ठिक असें ह्मणतात. तोच अत्याश्रमी आणि महापाशुपत आहे, असा जाणावा. (८४) आणि तोच महातपस्वी, तोच महाव्रती, जाणावा. मुमुक्षुलोकांमध्यें कृतकृत्य असा त्याच्याप्रमाणें दुसरा कोणी नाहीं, असें समजावें. (८५) जो यति (संन्यासी) असून नैष्ठिक होतो (व्रत करणारा होतो), तो याति नैष्ठिकश्रेष्ठ समजावा. जो प्राणी बारा दिवस कांहीं न खातां हें व्रत करतो, (८६) तोही नैष्ठिकाच्या बरोबरीचा समजावा. कारण हें तीव्र व्रत तो करतो. व्रतांत आसक्त असलेला प्राणी घृताक्त होऊन जो व्रत करितो, (८७) दोन, तीन, एक यांपैकीं कितीही दिवसांचें व्रत केलें तरी तो नैष्ठिक ह्मणवितो. जो प्राणी मनांत कांहीं इच्छा न धरतां हें व्रत करितो, (८८) आणि देह सुद्धां शिवास अर्पण करितो, त्याच्या तोडीचा दुसरा नाहीं. जो विद्वान ब्राह्मण त्या भस्माचें लेपन करितो, त्याचीं महापातकें असलीं तरी (८९) तात्काळ त्या पातकांपासून मुक्त होतो. यांत संशय नाहीं. रुद्राग्नीचें, जें श्रेष्ठ वीर्य आहे, तें भस्मच आहे असें जाणावें. (९०) ह्मणून सार्वकाळ भस्मधारण करणारा मोठा समर्थ जाणावा. भस्मनिष्ठ प्राण्यांमध्यें भस्माग्नीचा संबंध असल्यामुळें

स्मनिष्ठस्य दह्यन्ते दोषा भस्माग्निसङ्गमात् ॥९०॥ भस्मस्नानविशुद्धात्मा भस्मनिष्ठ इति स्मृतः॥भस्मना दग्धसर्वाङ्गो भस्मदीप्तत्रिपुंड्रकः ॥९१॥ भस्मशायी च पुरुषो भस्मकल्मषभक्षणात् ॥ भूतिर्भूतिकरी पुंसां रक्षा रक्षाकरी परम् ॥९२॥ किमन्यदिह वक्तव्यं भस्ममाहात्म्यकारणम् ॥ व्रती च भस्मना स्नातः स्वयं देवो महेश्वरः ॥९३॥ परमास्त्रश्च शैवानां भस्मैतत्पारमेश्वरम् ॥ धौम्याग्रजस्य तपसि ह्यापदो यन्निवारिताः ॥९४॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन कृत्वा पाशुपतं व्रतम् ॥ धनवद्भस्म संगृह्य भस्मस्नानरतो भवेत् ॥९५॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे पूजाविधिनिरूपणं नामैकोनत्रिंशोऽध्यायः ॥२९॥

---

लौकर त्याचे दोष जळून जातात. (९१) भस्मस्नानानें ज्याचा आत्मा शुद्ध झाला आहे, तोच भस्मनिष्ठ होय. ज्याचा देह भस्मानें चर्चित झाला आहे, ज्याच्या अंगावर भस्माचे त्रिपुंड्र असतील, (९२) जो भस्मशायी असेल, जो भस्म भक्षण करितो, तो सर्व दोषांपासून मुक्त होतो. तें भस्म पुरुषांना ऐश्वर्य देतें, ह्मणून भस्माला भूति ह्मणतात. प्राण्याचें रक्षण करितें ह्मणून रक्षा ह्मणतात. (९३) भस्ममाहात्म्य फार काय सांगावयाचें आहे? जो व्रतस्थ राहून भस्मस्नान करितो, तो साक्षात महेश्वर देवच समजावा. (९४) शैवांचें मोठें अस्त्र हें भस्मच होय. कारण धौम्यऋषीच्या जेष्ठ बंधूच्या तपश्चर्येच्या वेळेस भस्माच्या योगानें मोठमोठ्या विपत्ति दूर झाल्या. (९५) ह्मणूनच सर्व प्रयत्नानें हें पाशुपत व्रत करून धनाप्रमाणें त्याच्या ( व्रताच्या ) होमांतलें भस्म संग्रहास ठेवून भस्मस्नानांत मनुष्यानें रत व्हावें.

याप्रमाणें शैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील पूर्वभागापैकीं पूजाविधि निरूपण नांवाचा एकुणतिसावा अध्याय संपला.

---

## अथ त्रिंशोऽध्यायः

ऋषय ऊचुः ॥ धौम्याग्रजेन शिशुना क्षीरार्थं हि तपः कृतम् ॥ यस्मात्क्षीरार्णवो दत्तस्तस्मै देवेन शूलिना ॥१॥ स कथं शिशुको लेभे शिवशास्त्रप्रवक्तृताम् ॥ कथं वा शिवसद्भावं ज्ञात्वा तपसि निष्ठितः ॥२॥ कथञ्च लब्धं विज्ञानं तपश्चरणपर्वणि ॥ रुद्राग्नेर्यत्परं वीर्यं लेभे भस्म स्वरक्षकम् ॥३॥

वायुरुवाच ॥ न ह्येष शिशुकः कश्चित्प्राकृतः कृतवांस्तपः ॥ मुनिवर्यस्य तनयो व्याघ्रपादस्य धीमतः ॥४॥ जन्मान्तरेण संसिद्धः केनापि खलु हेतुना ॥ स्वपदप्रच्युतो दिष्ट्या प्राप्तो मुनिकुमारताम् ॥५॥ महादेवप्रसादस्य भाग्यायत्तस्य भाविनः ॥ दुग्धाभिलाषप्रभवं द्वारतामगमत्तपः ॥६॥ अत एव गणेशत्वं कुमारत्वञ्च शाश्वतम् ॥

---

ऋषि बोलतात.— (१) बाळपणीं धौम्याच्या भावानें दुधाकरितां तप केलें, ह्मणून त्रिशूलधारी शंभूनें प्रसन्न होऊन क्षीरसमुद्रच त्यास देऊन टाकिला. (२) तर त्याला बाळपणींच शिवशास्त्राचें अध्ययन कसें झालें? (शिवशास्त्र अवगत कसें झालें?) व शिवाच्या ठिकाणीं त्या अल्पवयांत भाव कसा उत्पन्न झाला? आणि इतक्या वयांत तपश्चर्येवर निष्ठा कशी उत्पन्न झाली? (३) त्या तपश्चर्येंत त्याला शिवाचें ज्ञान कसें झालें? स्वशरीराला रक्षण करणारें साक्षात शंकराचें वीर्य जें भस्म, तें याला कसें मिळालें?

वायु बोलला.—(४) बाबांनो, हा बालक इतर मुलांप्रमाणें प्राकृत समजूं नका. अर्थात त्याच्या तपश्चर्येविषयीं मनांत शंका आणूं नका. हा मुलगा बुद्धिमान व्याघ्रपाद ऋषिश्रेष्ठाचा होय. (५) जन्मांतरामध्यें कोणीएक सिद्ध पुरुष असून कांहीं कारणानें आपल्या पदापासून भ्रष्ट होऊन दैवयोगानें मुनीच्या जन्माला आला. (६) पुढच्या भाग्यावर अवलंबून असणाऱ्या महादेवाच्या प्रसादाचें जणूं दारच कीं काय? दुधाकरतां असें तप करावयास त्या बालकास बुद्धि सुचली. (७) ह्मणूनच श्रीशंकरानें त्याच्या तपाला भुलून क्षीरसमुद्र दिला आणि गणाधीशत्व व नेहमीचें बाळपणही दि-

सह दुग्धाब्धिना तस्मै प्रददौ शंकरः स्वयम् ॥७॥ तस्माज्ज्ञानागमोऽप्यस्य प्रसादादेव शांकरात् ॥ कौमारं हि परं साक्षाज्ज्ञानं शक्तिमयं विदुः ॥८॥ शिवशास्त्रप्रवक्तृत्वमपि तस्य हि तत्कृतम् ॥ कुमारमुखतो लब्धज्ञानाब्धेरिव नन्दिनः ॥९॥ दृष्टन्तु कारणन्त्वस्य शिवज्ञानसमन्वये ॥ स्वमातृवचनं साक्षाच्छोकजं क्षीरकारणात् ॥१०॥ सावदत्किलशोचन्ती सहसा दुःसहं वचः ॥

मातोवाच ॥ क्व दुग्धं साधु नो वत्स क्व वयं वनवासिनः॥११॥ कृष्यभावेन दारिद्र्यान्मया ते भाग्यहीनया ॥ मिथ्यादुग्धमिदं दत्तं पिष्टमालोड्य वारिणा ॥१२॥ त्वं मातुलगृहे स्वल्पं पीत्वा दुग्धं पयः शृतम् ॥ ज्ञातास्वादस्त्वपर्याप्तस्तज्जातीयमनुस्मरन् ॥१३॥ दत्तं न पय इत्युक्त्वा रुदन्दुःखाकरोषि माम् ॥ प्रसादेन विना शम्भोः पयस्तव न विद्यते ॥१४॥ पादपंकजयोस्तस्य साम्बस्य सगणस्य

---

लें. (८) अर्थात शंकराच्या प्रसादानें त्या बालकाला शिवाचें ज्ञान मिळालें बाळपणामध्यें शिवाचें ज्ञान होणें हें शक्तिमय आहे असें मोठमोठे पंडित ह्मणतात. (९) षण्मुखापासून शिवशास्त्राचें ज्ञान करून घेतलेल्या नंदिकेश्वरापासून बाल्यावस्थेंत त्याला शिवशास्त्राचें ज्ञान मिळालें. (१०) असलें शिवज्ञान मिळावयाला कारण असें घडून आलें कीं, त्या बालकानें आपल्या मातोश्रीस दूध मागितलें, तेव्हां दारिद्र्यानें गांजलेल्या त्या बालकाच्या मातेनें फार आक्रोश केला, त्यामुळें शिवास प्रसन्न करून घेण्याकरितां तो तपश्चर्येस निघून गेला. (११) दुःख करीत तिनें दुःखवाक्य आपल्या तोंडांतून काढिलें.

माता बोलली.— बाळा, वनांत राहणाऱ्या आह्मा लोकांजवळ दूध कोठून येईल बरें ? (१२) जन्मापासून मी दुर्भागी असून सध्यां दारिद्र्यानें मी फार दुःखी झाल्ये आहें, ह्मणून पाण्यांत पीठ कालवून खोटें दूध करून दिलें. (१३) बालका, तुझ्या मामाच्या घरीं प्रतिदिवशीं खरें दूध पिऊन त्याची गोडी कळली आहे, यामुळें हें कृत्रिम दूध तुला खोटें वाटलें. (१४) नंतर खरें दूध दिलें नाहीं, ह्मणून रडून मला विनाकारण दुःख मात्र देतोस. बाळा, शिवाच्या प्रसादावांचून खरें दूध कोठून मिळेल बरें ?(१५)बालका,

च ॥ भक्त्या समर्पितं यत्तत्कारणं सर्वसम्पदाम् ॥१५॥ धनाद्युद्दिश्य नास्माभिरितः प्रागर्चितः शिवः ॥ अतो दरिद्राः सञ्जाता वयं तस्मान्न तत्पयः ॥१६॥

वायुरुवाच ॥ इति मातृवचः श्रुत्वा तथ्यं शोकादिसूचकम् ॥ बालोऽप्यनुतपन्नन्तः प्रगल्भमिदमब्रवीत् ॥१७॥

उपमन्युरुवाच ॥ शोकेनालमितो मातः साम्बो यद्यस्ति शंकरः॥ तत्प्रसादेन दुग्धाब्धिं साधयिष्यामि शाश्वतम् ॥१८॥

मातोवाच ॥ यद्यस्तीति न वक्तव्यं पुत्रसन्दिग्धकं वचः ॥ सर्वस्मादधिकोऽस्त्येव शिवः परमकारणम् ॥१९॥ तत्कृतं हि जगत्सर्वं ब्रह्माद्यास्तस्य किंकराः ॥ तत्प्रसादकृतैश्वर्या दासास्तस्य वयं प्रभोः ॥२०॥ अन्यान्देवान्परित्यज्य कामये मनसा गिरा ॥ तमेव साम्बं सगणं भजे भावपुरःसरम् ॥२१॥ तस्य देवाधिदेवस्य शिवस्य शि-

---

गणसहित सांबाच्या चरणकमलांच्या ठिकाणीं भक्तीनें जें अर्पण करावें, तें सर्व संपत्तीला कारण होतें. (१६) आह्मीं पूर्वजन्मामध्यें द्रव्याचा संकल्प करून शिवाची आराधना केली नाहीं, ह्मणून या जन्मांत आह्मी दरिद्री झालों, तर बाळा, आमच्यापाशीं दूध कोठून येईल ?

वायु बोलला.—(१७) याप्रमाणें मातोश्रीचें दुःखसूचक खरें वाक्य ऐकून बालकाचें मनही कळवळलें, मग गंभीरवाणीनें बोलूं लागला.

उपमन्यु बोलला.—(१८)मातोश्री दुःख पुरें कर. उत्तम ऐश्वर्याला देणारा सांब शंकर जर आहे, तर त्याचा प्रसाद मिळवून शाश्वत क्षीरसमुद्राला त्याच्यापासून मागून घेतों.

माता बोलली.—(१९) बाळा, “ जर शिव असेल तर मी मागून घेतों” असें संशयाचें बोलणें कधींही बोलूं नये. कारण, परमकारण शिव हा सर्वांपेक्षां श्रेष्ठ असून जगांत आहेच आहे. (२०) या जगाची सृष्टि त्यानेंच केली आहे. ब्रह्मादि देव हे त्याचे दास आहेत, आणि त्याच्याच प्रसादानें त्यांना ऐश्वर्य मिळालें आहे. बालका, आह्मीसुद्धां त्या प्रभूचे दास अहोंत. (२१) इतर सर्व देवांना सोडून मनानें वाणीनें त्या शिवाचीच इच्छा करिजे, भक्तिपूर्वक गणसहित सांबालाच भजसें. (२२) कल्याण करणाऱ्या

वदायिनः ॥ साक्षान्नमःशिवायेति मन्त्रोऽयं वाचकः स्मृतः ॥२२॥ सप्तकोटिमहामन्त्राः सर्वे सप्रणवाः परे ॥ तस्मिन्नेव विलीयन्ते पुनस्तस्माद्विनिर्गताः ॥२३॥ सुप्रसादाश्च ते मन्त्राः स्वाधिकारव्यपेक्षया ॥ सर्वाधिकारस्त्वेकोऽयं मन्त्र एवेश्वराज्ञया ॥२४॥ यथानिकृष्टानुत्कृष्टान्सर्वानप्यात्मनः शिवः ॥ क्षमते रक्षितुं तद्वन्मन्त्रोऽयमपि सर्वदा ॥२५॥ प्रबलश्च तथा चायं मन्त्रो मन्त्रान्तरादपि ॥ सर्वरक्षाक्षमो ह्येष नापरः कश्चिदिष्यते ॥२६॥ तस्मान्मन्त्रान्तरं त्यक्त्वा पञ्चाक्षरपरो भव ॥ तस्मिञ्जिव्हान्तरगते न किञ्चिद्दुर्लभं मतम् ॥ ॥२७॥ अघोरास्त्रश्च शैवानां रक्षाहेतुरनुत्तमम् ॥ तच्च तत्प्रभवं मत्वा तत्परो भव नान्यथा ॥२८॥ भस्मेदन्तु मया लब्धं पितुरेव तवोत्तमम्॥विरजानलसंसिद्धं महाव्यापन्निवारणम्॥२९॥मन्त्रश्च ते मया दत्तं गृहाण मदनुज्ञया॥अनेनैवाशु जप्तेन रक्षा तव भविष्यति॥३०॥

---

देवाधिदेव शिवाचा मंत्र 'ॐ नमः शिवाय' हाच होय. मंत्राचा अर्थही शिवच आहे. (२३) प्रणवसहित सात कोटि महामंत्राचा अर्थ शिवच असून ते सर्व मंत्र शिवामध्येंच लपून राहतात, योग्य वेळेस बाहेर येतात. (२४) आपआपल्या अधिकारानुसार सर्व मंत्र उत्तम प्रसादयुक्त आहेत. ईश्वराच्या आज्ञेमुळें सर्व अधिकाराचा शिवमंत्र एकच आहे. (२५) उत्तम, मध्यम, कनिष्ठ अशा सर्व लोकांचें रक्षण शिव जसा करितो, त्याप्रमाणें सर्वदा हा मंत्रही सर्वांचें रक्षण करावयास समर्थ आहे. (२६) इतर मंत्रांपेक्षां हा मंत्र प्रबळ असून सर्वांना रक्षण करण्यामध्यें तर याच्याप्रमाणें दुसरा कोणताही नाहीं. (२७) ह्मणून इतर मंत्रांचा त्याग करून पंचाक्षराचा जप कर. तो मंत्र जिभेवर राहिला ह्मणजे कोणतीही वस्तु दुर्लभ नाहीं, असें समज. (२८) शिवभक्तांना रक्षण करावयास श्रेष्ठ अघोरास्त्रच आहे असें मान. याप्रमाणें त्याचें सामर्थ्य समजून त्यांत रत हो. (२९) विरजाग्नींत तयार झालेलें आपत्तीला दूर करणारें हें भस्म तुझ्या बापापासून मला मिळालें आहे, तें घे. (३०) आणि माझ्या आज्ञेनें माझ्यापासून या मंत्राचाही स्वीकार कर. या मंत्राचा जप केला असतां तुझा रक्षक हा मंत्रच होईल.

वायुरुवाच ॥ एवं मात्रा समादिश्य शिवं तेऽस्त्वित्युदीर्य च ॥ विसृष्टस्तद्वचो मूर्ध्नि कुर्वन्नेव सदा मुनिः ॥३१॥ तां प्रणम्यैवमुक्त्वा च तपः कर्तुं प्रचक्रमे ॥ तमाह च तदा माता शुभं कुर्वन्तु ते सुराः ॥३२॥ अनुज्ञातस्तत्र तया तपस्तेपे सुदुश्चरम् ॥ हिमवत्पर्वतं प्राप्य वायुभक्षः समाहितः ॥३३॥ अष्टेष्टकाभिः प्रासादं कृत्वा लिंगंच मृण्मयम् ॥ तत्रावाह्य महादेवं साम्बं सगणमव्ययम् ॥३४॥ भक्त्या पंचाक्षरेणैव पत्रैः पुष्पैर्वनोद्भवैः॥समभ्यर्च्य परं कालं चचार परमं तपः ॥३५॥ तथा तपश्चरन्तं तं बालमेकाकिनं कृशम्॥पुरा मरीचिना शप्ताः केचिन्मुनिपिशाचकाः ॥३६॥ सम्पीड्य राक्षसैर्भावैस्तपसो विघ्नमाचरन् ॥ स च तैः पीड्यमानोऽपि तपः कुर्वन्कथंचन ॥३७॥ सदा नमःशिवायेति क्रोशतिस्मार्तनादवत् ॥ तन्नादश्रवणादेव तपसो

---

वायु बोलला.—(३१) याप्रमाणें ती माता बोलून तुझें कल्याण असो. असा आशीर्वाद देऊन आपल्या मुलाला तिनें तप करावयास आज्ञा दिली. नंतर तिचें तें वचन मुनीनें शिरसा मान्य करून (३२) तिला नमस्कार करून शांतपणें बोलून तप करावयास निघाला, व तपाला आरंभ केला. तेव्हां सर्व देव तुझें कल्याण करोत असा आशीर्वाद मातेनें दिला. (३३) अशी तिची आज्ञा घेऊन भयंकर तपश्चर्या त्यानें केली. हिमालय पर्वतावर तपास आरंभ केल्याबरोबर समाधान चित्तानें निरंतर वायु भक्षण करून कालक्रमणा तो करीत असे. (३४) आठ विटा घेऊन दुमजला प्रासाद बांधून मातीचें लिंग करून त्यांत प्रमथगण व पार्वतीसहित शिवाची आवाहना केली. (३५) पंचाक्षरी मंत्रानें भक्तिपूर्वक पत्र, पुष्प यांनीं पूजा करून अशा तपश्चर्येंत पुष्कळ काल घालविला. (३६) याप्रमाणें दुश्चर तप करून कृश झालेल्या एकट्या बालमुनीला पाहून पूर्वीं मरीचि ऋषीनें शप्त झालेले कांहीं मुनिवेष घेतलेले पिशाच (३७) राक्षसीकृतीनें त्याच्या तपश्चर्येला विघ्न करूं लागले. अशीं विघ्नें जरी पुष्कळ आलीं, तथापि त्यांना न जुमानतां कडक तप त्यानें केलें. (३८) जेव्हां फारच त्रास होऊं लागला, तेव्हां मात्र उंच स्वरानें ‘नमः शिवाय’ असें ओरडूं लागला. हा शब्द ऐ-

विघ्नकारिणः ॥३८॥ तत्तद्भावं समुत्सृज्य मुनयस्तमुपाचरन् ॥ तपसा तस्य विप्रस्य प्रदीपितमभूज्जगत् ॥३९॥ प्रणम्याहुश्च तत्सर्वं हरये देवसत्तमाः॥ श्रुत्वा तेषां तदा वाक्यं भगवान्पुरुषोत्तमः॥४०॥ किमिदन्त्विवति संचिंत्य ज्ञात्वा तत्कारणं च सः॥ जगाम मन्दरं तूर्णं महेश्वरदिदृक्षया ॥४१॥ दृष्ट्वा देवं प्रणम्यैवं प्रोवाच च कृताञ्जलिः ॥

हरिरुवाच ॥ भगवन्ब्राह्मणः कश्चिदुपमन्युरिति श्रुतः॥४२॥ क्षीरार्थमदहत्सर्वं तपसा तं निवारय ॥४३॥

वायुरुवाच ॥ एतस्मिन्नन्तरे देवः पिनाकी परमेश्वरः ॥ शक्रस्य रूपमास्थाय गन्तुं चक्रे मतिं तदा ॥४४॥ वृत्तम्॥ अथ जगाम मुनेस्तु तपोवनं गजवरेण सितेन तदा शिवः ॥ सहसुरासुरसिद्धमहोरगैरमरराजतनुं स्वयमास्थितः ॥४५॥ सहैव चारुप्रभचामरेण विवीज्य वालव्यजनेन दिव्यम् ॥ दधार शच्या सहितं सुरेंद्रं करेण वा-

---

कूनच विघ्न करणारे लोक (३९) त्याच्या वाटेला न जातां उलट त्याची सेवा करूं लागले. अशा त्या तपाच्या योगानें सर्व जग जळूं लागलें. (४०) इतक्यांत सर्व देव गडबडून श्रीविष्णूला शरण गेले. त्या देवांच्या वाणीला ऐकून श्रीविष्णूनें (४१) हें काय ? हें काय ? असा विचार करून त्याचें कारणही जाणून श्रीशंकराला पाहण्याकरितां लौकरच त्याच्या मंदिराला तो विष्णु गेला. (४२) तेथें देवाधिदेवाला नमस्कार करून हात जोडून बोलला.

हरि बोलतो.—भगवन् कोणीएक उपमन्यु नांवाचा ब्राह्मण (४३) दुधाकरतां तप करून त्रैलोक्याला जाळतो आहे, त्याचें निवारण करा.

वायु बोलतो.—इतक्यांत पिनाकधारी परमेश्वरानें इंद्राचें रूप घेऊन उपमन्यूकडे जावयाचा विचार केला. (४९) नंतर ठरल्याप्रमाणें पांढऱ्या हत्तीवर बसून उपमन्यु मुनीच्या आश्रमाला साक्षात शिव गेले. तेव्हां सगळे देव बरोबर होते, व श्रीशंकरानें अमरेंद्राचा वेष घेतला होता. (४६) सुंदर किरणें ज्याचीं चोंहोकडे पसरलीं आहेत, असें चामर ज्याच्यावर वारीत होते. दोन्ही बाजूला वाळ्याचे पंखे घेऊन श्रीशंकरास देव वारा घालीत होते. शचीसहित सुरेंद्रावर ( पार्वतीसह शंकरावर ) छत्र धरिलें होतें.

मेन सितातपत्रम् ॥४६॥ रराज भगवान्सोमः शक्ररूपी तदा शिवः॥ तेनातपत्रेण यथा चन्द्रविम्बेन मन्दरः ॥४७॥ आस्थायैवं हि शक्रस्य स्वरूपं परमेश्वरः॥ जगामानुग्रहं कर्तुमुपमन्योस्तमाश्रमम् ॥४८॥ तं दृष्ट्वा परमेशानं शक्ररूपधरं शिवम् ॥ प्रणम्य शिरसा प्राह मुनिर्मुनिवरः स्वयम् ॥४९॥

उपमन्युरुवाच ॥ पावितश्चाश्रमः सोऽयं मम देवेश्वरः स्वयम् ॥ प्राप्तः शक्रो जगन्नाथो भगवान्भानुसप्रभः ॥५०॥

वायुरुवाच ॥ एवमुक्त्वा स्थितं प्रेक्ष्य कृतांजलिपुटं द्विजम् ॥ प्राह गम्भीरया वाचा शक्ररूपधरो हरः ॥५१॥

शक्र उवाच ॥ तुष्टोऽस्मि ते वरं ब्रूहि तपसानेन सुव्रत ॥ ददामि चेप्सितान्सर्वान्धौम्याग्रज महामुने ॥५२॥

वायुरुवाच ॥ एवमुक्तस्तदा तेन शक्रेण मुनिसत्तमः ॥ वरयामि

---

त्याची काठी डाव्या हातानें श्रीशंकरानें धरिली होती. (४७) इंद्ररूप धारण करणारे श्रीशिव त्या छत्रामुळें पार्वतीसहित फार शोभूं लागले. चंद्रबिंब आकाशांत असतां मंदर पर्वत जसा शोभावा तसे शिव दिसले. (४८) याप्रमाणें परमेश्वरानें इंद्राचें रूप घेऊन उपमन्यूवर अनुग्रह करावयास त्याच्या आश्रमाला गेले. (४९) शक्ररूप धारण करणाऱ्या त्या श्रेष्ठ ईशाला पाहून शिरसा प्रणिपात करून स्वतः ऋषिश्रेष्ठ उपमन्यु बोलला.

उपमन्यु बोलतो.—(५०) देवा, आपण येथपर्यंत येऊन आमचा आश्रम पुनीत केला. जगाचा प्रभु, सूर्याप्रमाणें तेजस्वी अशा देवेंद्राची स्वारी गरीब ऋषीच्या आश्रमाला आल्यानंतर मी फार धन्य आहें.

वायु बोलतो.—(५१) असें बोलून हात जोडून उभा राहिलेल्या त्या ब्राह्मणाला पाहून शक्ररूपधारी शंकर गंभीरवाणीनें बोलले.

शक्र बोलतो.— (५२) हे सुव्रता, तुझ्या तपानें मी प्रसंन आहे, वर माग. धौम्यबंधो, मुने, वाटेल तें इच्छित वर माग. देतों.

वायु बोलतो.—(५३) असें शक्ररूपधारी शिवाचें वाक्य ऐकून तो ऋषि बोलला. देवा, आपण मजवर प्रसन्न जर झालां असाल तर श्रीशिवाच्या

शिवे भक्तिमित्युक्त्वा तपते पुनः ॥५३॥ तस्य तीव्रं तपो ज्ञात्वा शक्ररूपधरो हरः॥आगत्य स्वगुणाभासैः स्वमात्मानमनिन्दत ॥५४॥ मुनिस्तु तमविज्ञाय शक्ररूपधरं हरम् ॥ शिवनिन्दाश्रुतेत्येव मर्तुं व्यवसितः स्वयम् ॥५५॥ क्षीरे वाञ्छामपि त्यक्त्वा निहन्तुं शक्रमुद्यतः ॥ भस्मादाय तदा घोरमघोरास्त्राभिमन्त्रितम् ॥५६॥ विसृज्य शक्रमुद्दिश्य स्वदेहं दग्धुमुद्यतः ॥ आग्नेयीं धारणां बिभ्रदुपमन्युरवस्थितः ॥५७॥ तां तस्य धारणां देवो निरीक्ष्यावारयत्स्वयम् ॥ तद्विसृष्टमघोरास्त्रं नन्दीश्वरनियोगतः ॥५८॥ जगृहे मध्यतः क्षिप्रं नन्दी शंकरवल्लभः ॥ ददृशेऽथ महादेवो देव्या सार्द्धं वृषोपरि ॥५९॥ गणेश्वरैस्त्रिशूलाद्यैर्दिव्यास्त्रैरपि संवृतः ॥ देवदुन्दुभयो नेदुः पुष्पवृ-

---

ठिकाणीं दृढ भक्ति द्यावी, एवढीच इच्छा मी करतों, असें बोलून पुनः तप करावयास आरंभ केला. (९४) त्याचें खडतर तें तप पाहून शक्रवेषधारी शंकरांनीं आपल्याच ठिकाणीं दोषारोप देऊन आपलीच निंदा त्या पुढें शिवानें केली. (९९) इकडे मुनीला तें न समजून व शक्रवेषधारी शिवाला न जाणून मनांत ह्मणाला कीं व्यर्थ शिवनिंदा ऐकली, आतां देह ठेवून उपयोग नाहीं असा विचार करून तो ऋषि मरण्यास तयार झाला. (९६) दुधावरची इच्छा सोडून इंद्रवेषधारी शिवावर मारण्याकरतां त्यानें भयंकर अस्त्र सोडिलें. हातांत भस्म घेऊन अघोरास्त्राच्या मंत्राचा उच्चार करून अभिमंत्रण केलें. (९७) तें अस्त्र इंद्रावर सोडून आपला देह जाळावयास त्यानें आरंभ केला, व उपमन्यूनें त्याकरतांच आग्नेयी धारणा केली, नंतर तो स्वस्थ राहिला. (९८) अशा आग्नेयी धारणेला पाहून व त्या मुनीनें सोडलेल्या अघोरास्त्रालाही पाहून नंदीश्वराला आज्ञा करून तें अस्त्र शिवानें निवारण करविलें व स्वतः त्या मुनीला त्या धारणापासून सोडविलें. (९९) तेव्हां शंकरप्रिय नंदीनें शिवाची आज्ञा घेऊन मधल्यामध्यें तें अस्त्र धरिलें, नंतर शिवानें इंद्राचा वेष टाकून नंदीवर देवीसहित आरोहण केलें. (६०) त्रिशूलादि आयुधें व दिव्य अस्त्रें हातांत घेऊन सभोंवती गणेश्वर उभे राहिले, इतक्यांत देवांनीं नगारे वाजविले, व शिवावर पुष्पवृष्टि

ष्टिः पपात च ॥६०॥ ब्रह्मेन्द्रविष्णुप्रमुखैर्देवैश्छन्ना दिशो दश॥ अथोपमन्युरानन्दसमुद्रोर्मिभिराहतः ॥६१॥ पपात दण्डवद्भूमौ भक्तिनिघ्नेन चेतसा ॥ एह्येहीति तमाहूय शिवः शीतांशुभूषणः॥६२॥ मूर्ध्न्याघ्राय सुतस्तेऽयमिति देव्यै न्यवेदयत् ॥ देवी च गुहवत्प्रीत्या मूर्ध्नि तस्य कराम्बुजम् ॥६३॥ विन्यस्य प्रददौ तस्मै कुमारपदमव्ययम् ॥ क्षीराब्धिरथसाकारः क्षीरं स्वादुकरे दधत् ॥६४॥ उपस्थाय ददौ तस्मै पिण्डीभूतमनश्वरम् ॥ समृद्धिं धनदस्तद्वद्ददावाप्रलयस्थिताम् ॥६५॥ ततः समृध्दमभवध्दनैर्धान्यैस्तपोवनम् ॥ व्रतं पाशुपतं ज्ञानं व्रतयोगं च तत्वतः ॥६६॥ दत्वा तस्मै प्रवक्तृत्वं पादुके च चिरं परम् ॥ सर्वज्ञत्वपदं दत्वा देवश्चान्तरधीयत ॥६७॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायां पूर्वभागे त्रिंशोऽध्यायः ॥३०॥ ॥ समाप्तोऽयंपूर्वभागः ॥

---

केली. (६१) ब्रह्मा, विष्णु, इंद्र वगैरे मुख्य मुख्य देवांनीं दिशा सर्व आच्छादिल्या गेल्या. नंतर उपमन्यूला मोठा आनंद झाला, (६२) इतक्यांत भक्तियुक्त मनानें मुनीनें दंडाकार नमस्कार केला. नंतर चंद्रशेखर शिवानें त्याला ह्मटलें, कीं बालका, इकडे ये, ये; (६३) असें बोलून त्याला जवळ घेऊन मस्तक हुंगून हा तुझा मुलगा आहे, असें देवीला शिवानें ह्मटलें. देवीनेंसुद्धां तें ऐकून षण्मुखाप्रमाणें त्याच्यावर प्रीति ठेवून त्याच्या डोक्यावर वरदहस्त ठेविला. (६४) व त्याला 'कुमार' अशी पदवी कायमची तिनें दिली. इतक्यांत क्षीरसमुद्रानें मूर्तिमंत पुढें येऊन सुरस दूध हातांत घेऊन (६५) त्याचें स्तोत्र करून मुनीला अनश्वर पिंडाकार असें तें दूध दिलें, व प्रलयापर्यंत राहणारी समृद्धि दिली. (६६) नंतर शिवाच्या प्रभावानें त्या मुनीचें तपोवन धनधान्य यांनीं समृध्द झालें. नंतर पाशुपतव्रत, पाशुपज्ञान, व्रतयोग, (६७) वक्तृत्व, पादुका, चिरकाल सर्वज्ञत्व इत्यादि देऊन शिव अंतर्धानाला पावले.

याप्रमाणें शैवपुराणांतील वायवीयसंहितेंतील पूर्वभागांतील तिसावा अध्याय संपला.

---

## डाक्तर भाऊदाजी इत्याख्यसंबंधिहस्तलिखितशिवरहस्यस्य-सप्तमांशे देवीस्तवनपद्यावलिषु पठिते शिवगौरीसंवादे चतुर्दशाध्याये

गतरत्नकिरीटाश्च विष्णुमुख्याः सुरास्तदा ॥ प्रत्दृष्टवदनां देवीं तुष्टुवुर्विविधैस्तवैः ॥ देवा ऊचुः ॥ नमो देव्यै नमो देव्यै नमो देव्यै नमो नमः ॥ नमो नमो जगद्धात्र्यै जगद्धात्र्यै नमो नमः ॥२॥ नमो नमस्ते कल्याण्यै मंगलायै नमो नमः॥नमो नमस्ते शर्वाण्यै सुखदायै नमो नमः ॥३॥ नमो नमस्ते भद्रायै शोभनायै नमो नमः ॥ नमो नमस्ते शुद्धायै शांभव्यै ते नमो नमः ॥४॥ नमो नमो नमो मातर्नमो मातर्नमो नमः॥ नमस्ते परमेश्वर्यै परमायै नमो नमः ॥५॥ नमस्ते मुक्तिदायिन्यै मुक्तिदायै नमो नमः ॥ नमस्ते विश्वरूपिण्यै विश्वमात्रे नमो नमः ॥६॥ नमस्ते लिंगधारिण्यै भूतिदायै नमो नमः ॥ नमः संतुष्टचित्तायै पुष्टिदायै नमो नमः ॥७॥

---

## डाक्तर भाऊदाजी यांनीं लिहिलेल्या शिवरहस्याच्या सातव्या अंशांतील देवीस्तवन पद्यावलींमध्यें असलेल्या शिवगौरी-संवादांतील चौदाव्या अध्यायांतील श्लोकांचा अर्थ.

(१) रत्नमय किरीट शिरावर धारण केलेल्या विष्णुप्रमुख देवांनीं अनेक तऱ्हेनें प्रसन्नमुख देवीची स्तुति केली. (२) देव बोलले हे देवि, देवि, तुला नमस्कार असो, नमस्कार असो. जगाचें पोषण करणारे देवि, जगाचें धारण करणारे देवि, तुला नमस्कार असो. (३) हे कल्याणि, हे मंगले, तुला नमस्कार असो, नमस्कार असो. हे शर्वाणि, हे सुखदायिनि, तुला नमन असो, नमन असो. (४) हे भद्रे, हे शोभने, तुला नमस्कार असो, नमस्कार असो. हे शुद्धे, हे शांभवि, तुला नमन असो नमन असो. (५) हे माते, हे माते, तुला नमन असो, नमन असो. हे परमेश्वरि, हे परमे, तुला नमन असो, नमन असो. (६) मुक्तिदायिनि, मुक्ति देणारे देवि, तुला नमन असो, नमन असो. विश्वरूपिणि, विश्वमाते, तुला नमन असो, नमन असो. (७) इष्टलिंग धारण करणारे देवि, ऐश्वर्य देणारे देवि, तुला नमन असो, नमन असो. आनंद मनाचे हे देवि, पुष्टि देणारे हे देवि, तुला नमन असो, नमन असो.

॥ श्रीशिवाय नमः ॥



# पंचाचार्यपंचमोत्पत्तिक्रमवर्णन.

वीरशैवलिंगिब्राह्मणांना आपलें सूत्र, गोत्र, शाखा, प्रवर वगैरे समजणें अवश्यक आहे. ह्मणून, *सुप्रबोधागमांत श्रीपरमेश्वराचीं पांच मुखें **सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान** यापासून **रेवणाराध्य, मरुळाराध्य, एकोरामाराध्य, पंडिताराध्य,** आणि **विश्वाराध्य** हे पांचजण आचार्य अनुक्रमें उत्पन्न झाले. त्यांची जन्मभूमि, सिंहासनाधिपत्यस्थानें, त्यांचीं गोत्रें, त्यांचीं महासूत्रें, प्रवर, शाखा, कळशांचे धातु, त्यांचीं तत्वें, बीजमंत्र (बीजाक्षर), व प्रत्येक महासूत्राचीं उपसूत्रें सांगितलीं आहेत. त्याचप्रमाणें पंचवक्त्र गणाधीश्वराचीं पांच मुखें **सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष, ईशान** यापासून अनुक्रमें **मखारि, कालारि, पुरारि, स्मरारि, वेदारि** हे मुख्य-पंचम उत्पन्न झाले. त्यांचे गुरु, त्यांचीं गोत्रें, सूत्रें, प्रवर, शाखा वगैरे क्रमवार माहिती सांगितली आहे ती ज्याची त्यास समजावी यासाठीं पुढील पृष्ठावर दिली आहे.

---

* पाशुपत तंत्र वगैरे ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, सद्योजातमुखापासून मरुळाराध्य, वामदेव मुखापासून एकोरामाराध्य, अघोरमुखापासून रेवणाराध्य, तत्पुरुषमुखापासून पंडिताराध्य, आणि ईशानमुखापासून विश्वाराध्य, उत्पन्न झाले. परंतु आह्मांस तर सुप्रबोधागमावरून, पंचतत्वावरून व पंचप्रणवांवरून (बीजाक्षर मंत्रावरून) असें दिसतें कीं, सद्योजातमुखापासून रेवणाराध्य व वामदेवमुखापासून मरुळाराध्य, अघोरमुखापासून एकोरामाराध्य, तत्पुरुषमुखापासून पंडिताराध्य आणि ईशानमुखापासून विश्वाराध्य उत्पन्न झाले हेंच खरें आहे.

| परमेश्वराचीं पांच मुखें. | सद्योजात. | वामदेव. | अघोर. | तत्पुरुष. | ईशान. |
|---|---|---|---|---|---|
| पंचाचार्यांचीं नांवें. | रेवणाराध्य. | मरुळाराध्य. | एकोरामाराध्य. | पंडिताराध्य. | विश्वाराध्य. |
| त्यांची जन्मभूमि. | कोल्लिपाकी क्षेत्रांत सोमेश लिंगापासून जन्म. | वटक्षेत्रांत सिद्धेश लिंगापासून जन्म. | धातुकुंड क्षेत्रांत श्रीमल्लिकार्जुन लिंगापासूनजन्म | द्राक्षाराम क्षेत्रांत रामनाथ लिंगापासून जन्म. | काशी क्षेत्रांत विश्वेश्वर लिंगापासून जन्म. |
| सिंहासनाधिपत्यस्थानें. | रंभापुरी (वाळी हळ्ळी) | उज्जयनीपुरी | श्रीशैलपर्वत | हिमवत्केदार | कोल्लिपाकी ( काशी ) |
| त्यांचीं गोत्रें. | वीर. | नंदि. | वृषभ. | भृंगि. | स्कन्द |
| त्यांचें सूत्र. | पडविडि. | वृष्टि. | मुक्तागुच्छ. | लंवन. | पंचवर्ण |
| त्यांचे प्रवर. | वीरशैव. | वीरशैव. | वीरशैव. | वीरशैव. | वीरशैव |
| त्यांच्याशाखा | ऋग्वेद. | यजुर्वेद. | सामवेद. | अथर्वणवेद. | अजपवेद |
| कलशांचे धातु. | सोनें. | रुपें. | तांबें. | लोखंड. | शिसें |
| त्यांचें तत्व. | पृथ्वी. | अप् | तेज. | वायु. | आकाश |
| त्यांचे वीजमंत्र (वीजाक्षर) | नकार. | मकार. | शिकार. | वाकार. | यकार |
| महामतांचीं उपमतें. १ | पुराण | लोहकंथा | गोणीकंथा | त्रिपुटी | पंचवर्ण |
| २ | पच्छकंथा | स्वर्णकंथा | दंती | रज्जु | कंवाल |
| ३ | षडंग | श्रृंगी | जठर | कंथा | वृषभ |
| ४ | सुरगि | मसणी | त्रिगुण | भस्मी | दशवक्त्र |
| ५ | महिषी | कुठार | केशकंथा | शिखरी | जरत्कंथा |
| ६ | दिगंवर | मैत्री | ललाट | रौप्यक | पंचमुख |
| ७ | वेणी | कठार | व्याघ्रकंथा | चंद्रगुंड | गुह्याग्र |
| ८ | भित्ति | चामरी | लोचन | मृत्कंथा | गोचर |
| ९ | मोरट | कवाट | भगिनी | काष्टक | गगन |
| १० | नाटी | कुक्षकंथा | जालकंथा | पवन | मुसली |
| ११ | शौरी | ज्वलत्कंथा | नटन | रामगिरि | लगुड |
| १२ | मुसडी | सिंही | वदडि | खड्गी | शिथिली |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पंचवक्त्र गणाधीश्वराचीं पांच मुखें. | सद्योजात | वामदेव | अघोर | तत्पुरुष | ईशान |
| मुख्य पंचमांचीं नांवें. | मखारि | कालारि | पुरारि | स्मरारि | वेदारि |
| पंचमांचे गुरु. | रेवणाराध्य. | मरुळाराध्य | एकोरामारा० | पंडिताराध्य | विश्वाराध्य |
| पंचमांचीं गोत्रें | वीर | नंदि | वृषभ | भृंगि | स्कन्द |
| पंचमांचीं सूत्रें | पडिविडि | वृष्टि | मुक्तागुच्छ | लंवन | पंचवर्ण |
| पंचमांचे प्रवर | वीरशैव | वीरशैव | वीरशैव | वीरशैव | वीरशैव |
| पंच. शाखा. | ऋग्वेद | यजुर्वेद | सामवेद | अथर्वणवेद | अजपवेद |
| पंचमांचे कलशांचे धातु. | सोनें | रुपें | तांवें | लोखंड | शिसें |
| पंचमांची तत्वें | पृथ्वी | आप् | तेज | वायु | आकाश |
| त्यांचे वीजमंत्र (बीजाक्षर) | नकार | मकार | शिकार | वाकार | यकार |
| पंचमांचे उपपंचम १ | शतांग | केशराक्ष. | अग्नियुक्त | सहस्रशीर्ष | पश्चाद्दक् |
| २ | प्रमुख | मृगारि | हारीत | पीतांग | विश्वपुष्ट |
| ३ | शर्कर | नाकेश | जावाल | नगमाल | गोमुख |
| ४ | वृषभ | वृषण | निर्जर | निराशन | गिरिवक्त्र |
| ५ | सहस्राक्ष | शिलांग | निशित | यमद्युति | सुवर्णनखर |
| ६ | धर्म | शृंगशीर्ष | शशांक | सप्तांग | अजांघ्रि |
| ७ | विषम | नीलांवर | ललाटाक्ष | लतांग | दशानन |
| ८ | मोचक | कुहासन | कराक्षक | मृत्युनाशन | विषानन |
| ९ | वृकभेदी | शतवाहु | पादास्य | अतनु | उग्रदेह |
| १० | कुंजरारि | बहुजिव्ह | विकटांग | घोटवक्त्र | शतपद |
| ११ | शेष | नागदंत | शिलाद | नीरोग | सहस्रस्कंद |
| १२ | शिखिहरित् | षणावपु | हरिन्मुख | भव | त्रिमुखस्कंद |

*पंचमांच्या गुरूंचे जें सूत्र, गोत्र वगैरे आहे तेंच सूत्र, गोत्र वगैरे त्या पंचमांपासून उत्पन्न झालेल्या उपपंचमांचें आहे असें समजावें.

## विक्रीस तयार.

| | | |
|---|---|---|
| १. | शिवपरअभंग.... ... ... ... ... | ८७. |
| २. | शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी भाग १ ला. ... ... | ८५. |
| ३. | ,, भाग २ रा. ... ... | ८५. |
| ४. | ,, भाग ३ रा. ... ... | ८४. |
| ५. | मराठी सिद्धरामेश्वर चरित्र. ... ... ... | ८७. |



यावें पटल पांचवें किंमत ८१, सहावें किंमत ८१, सातवें ८१। नववें किंमत ८८९ हीं निराळीं छापविलीं आहेत.

२०. **संक्षिप्त लिंगपूजाविधिः**—कित्येकांना रोज समग्र लिंगपूजा करितां येत नाहीं, सबब थोड्या वेळांत ( १५–२० मिनिटांत ) लिंगपूजा करतां यावी ह्मणून हा लहानसा ग्रन्थ तयार केला आहे. किंमत ८८९.

२१. **वीरशैवलिंगिब्राह्मण वंशावलिपटः**—किंमत ८१.

२२. **व्यापारसाम्राज्य पूर्वार्धः** किंमत १ रुपया.

२३. **शिवपरअभंगः**—किंमत ७ आणे.

२४. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणीः**—भाग १ ला. किंमत ५ आणे.

२५. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणीः**— भाग २ रा. किंमत ५ आणे.

२६. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणीः**—भाग ३ रा. किंमत ४ आणे.

२७. **मराठी सिद्धरामेश्वर चरित्रः**—किंमत ७ आणे.

२८. **वीरशैवदीक्षाविधि वीरमाहेश्वरदीक्षाविधिः**—वीरशैव सदाचारसंग्रहांतील प्रकरण ११ वें... किंमत १ आणा.

२९. **शिष्यवर्गसंप्रदायनिरूपणः**—( शिष्य कोणाला करावा याचा विचार ) वीरशैवसदाचारसंग्रहांतील प्रकरण १४ वें. किंमत १ आणा.

३०. **शिवपुराण वायवीयसंहिता उत्तरभागः**—मराठी अर्थासह किंमत २ रुपये.

३१. **भारतसारसंग्रहः**—मराठी तात्पर्यासह किंमत ८६.

यांपैकीं कोणत्याही ग्रंथाच्या एकदम दहा प्रती घेणारास एक प्रत बक्षिस मिळेल.

---

## छापत असलेले ग्रंथ.

१. **बसवेश्वरपुराणः**—(व्यासकृत भाग २ रा). २. **संक्षिप्तविवाहविधि.**
३. **अनादिवीरशैवसारसंग्रहः**—भाग २ रा. ४. **दशकर्मपद्धति.**

वरील ग्रंथ मराठी अर्थासह लौकरच तयार होतील.

---

## ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें.

सोलापूर येथें रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांचे दुकानीं व याशिवाय मुंबई, विजापूर व कलबुर्गी येथें रावसाहेब वारद यांचे दुकानीं विकत मिळतील.

